# भारतवर्षीय भूवर्णन

प्राचीन




हा ग्रंथ,



## शंकर बाळकृष्ण दीक्षित

ह्यांनीं लिहिला.




प्रकाशक

बळवंत गणेश दाभोळकर



पुणें:

शकवर्षे १८२१—इ० सन १८९९.




# अनुक्रमणिका

---




# भारतवर्षीय भूवर्णन

## प्राचीन

## उपोद्घात

" सर्वेषामेव राजेंद्र प्रियं भारत भारतं "

महाभारत, भीष्मपर्व, अ० ९ श्लो० ९.

आपण ज्या देशांत राहतों त्या ह्या देशाचें सांप्रतचें विशेष प्रचारांतलें नांव हिंदुस्थान हें आहे. परंतु हें नांव अर्वाचीन आहे. व तें तरी आपल्या लोकांनीं दिलेलें नाहीं. आपल्या धर्मग्रंथांत व इतरहि संस्कृत ग्रंथांत तर हें नांव कोठे येत नाहींच. परंतु पन्नास वर्षांपूर्वींच्या प्राकृत पद्यात्मक ग्रंथांतहि हें नांव कोठे योजिलेलें आढळत नाहीं. तथापि मुसलमान राजांचा या देशांत अंमल झाल्यापासून हें नांव प्रचारांत आलें असावें. या देशाचें आपलें नांव भारतवर्ष हें आहे. भरतखंड असेंहि कोठे आढळतें. आपल्या पुराणादि ग्रंथांत पृथ्वीचे जे भाग-प्रविभाग सांगितले आहेत त्यांची परिपाटी बहुतेक केवळ काल्पनिक दिसते. तरी त्यांतूनच भारतवर्ष हें नांव निघालें आहे म्हणून त्या परिपाटीचें एथे दिग्दर्शन करणें अवश्य आहे.

वर्तमान वराहकल्पाच्या आरंभीं नारायणानें ब्रह्मरूप धारण करून सृष्टिरचना पूर्वकल्पाप्रमाणें केली. त्यांत पृथ्वीचे द्वीपसंज्ञक सात भाग केले.

भुवि भागं ततः कृत्वा सप्तद्वीपान् यथा तथा ।
भूराद्यांश्चतुरो लोकान् पूर्ववत् समकल्पयत् ॥

विष्णुपुराण, अंश १ अध्याय ४ श्लो० ४८.

या द्वीपांचीं नांवें वगैरे त्याच पुराणांत अशीं सांगितलीं आहेत:—

जंबूप्लक्षाह्वयौ द्वीपौ शाल्मलिश्चापरो द्विज ।
कुशः क्रौंचस्तथा शाकः पुष्करश्चैव सप्तमः ॥४॥
एते द्वीपाः समुद्रैस्तु सप्त सप्तभिरावृताः ।
लवणेक्षुसुरासर्पिर्दधिदुग्धजलैः समं ॥ ५ ॥

अंश २ अ० २.

जंबू, प्लक्ष, शाल्मलि, कुश, क्रौंच, शाक, व पुष्कर हे सात द्वीप होत. ह्या प्रत्येकास एकेका समुद्राचें आवरण आहे. असे लवण, इक्षुरस, सुरा, सर्पि ( तूप ), दधि, दुग्ध, व जल यांचे सात समुद्र आहेत.

जंबू-द्वीपाच्या मध्यभागीं मेरुपर्वत आहे आणि भोंवतीं क्षारसमुद्र आहे. हिमवत्, हेमकूट, निषध, नील, श्वेत, शृंगवान्, माल्यवान् आणि गंधमादन हे दुसरे पर्वत आहेत. त्यांच्या योगानें जंबूद्वीपाचे नऊ विभाग झाले आहेत. त्या प्रत्येकास वर्ष म्हणतात. त्यांचीं नांवें:—भारतवर्ष, किंपुरुषवर्ष, हरिवर्ष, इलावृत, रम्यक, हिरण्मय, उत्तरकुरु, भद्राश्व, केतुमाल. यांत भारतवर्ष हें सर्वांच्या दक्षिणेस आहे. त्याचे उत्तरेस हिमालय पर्वत आहे. भारतवर्षास अजनाभ असेंहि नांव आहे.

पुनः भारतवर्षाचे नऊ विभाग आहेत. त्यांस खंडें

म्हणतात. त्यांचीं नांवें:—इंद्रद्वीप*, कसेरु, ताम्रपर्ण, गभस्तिमान्, नागद्वीप, सौम्य, गंधर्व, वारुण, कुमारिका.

पृथ्वीचे जे हे भाग यांची उत्पत्ति, यांचीं नांवें आणि पृथ्वीवर यांचीं स्थानें यांविषयीं पुराणादिकांत जें वर्णन आहे त्याची सर्वांशीं एकवाक्यता नाहीं. उदाहरणार्थ विष्णुपुराणांतच सांगितलें आहे कीं स्वायंभुव मनूचा पुत्र प्रियव्रत यानें पृथ्वीचीं सात द्वीपें करून तीं आपल्या सात पुत्रांस †दिलीं. भागवतांत सांगितलें आहे कीं सूर्याच्या प्रकाशानें पृथ्वीचें अर्ध मात्र प्रकाशित होतें, अर्धावर काळोख पडतो तो न पडावा म्हणून प्रियव्रत हा आपल्या तेजस्वी व सूर्यरथा इतक्या वेगवान् रथामध्यें बसून सात वेळ सूर्यामागून फिरला. त्याच्या रथाच्या चाकांनीं ज्या परिखा पडल्या ते सात समुद्र झाले व त्यांनीं सात द्वीपें ‡झालीं. जंबूद्वीपाचे जे वर्षसं-

---

* इंद्रद्वीपः कसेरुश्च ताम्रपर्णो गभस्तिमान् । नागद्वीपस्तथा सौम्यो गंधर्वस्त्वथ वारुणः । अयं तु नवमस्तेषां द्वीपः सागरसंवृतः ( मत्स्यपुराण, अ० ११३ श्लोक ९–१० ). यांत अयं शब्दानें भरतखंड असेंहि घेतात. यावरून भरतखंड हा भारतवर्षाचा एक भाग होतो. भास्कराचार्यांनीं भरतखंड न सांगतां कुमारिकाखंड सांगितलें आहे. व त्यांत मात्र वर्णव्यवस्था आहे. अन्यत्र यवनादिक राहतात असें सांगितलें आहे.

† प्रियव्रतो ददौ तेषां सप्तानां मुनिसत्तम ।
विभज्य सप्तद्वीपानि मैत्रेय सुमहात्मनाम् ॥ २–१–७.

‡ तदनभिनंदन् समजवेन रथेन ज्योतिर्मयेन रजनीमपि दिनं करिष्यामीति सप्तकृत्वस्तरणीमनुपर्यक्रामत् द्वितीय इव पतंगः । एवं कुर्वाणं प्रियव्रतमागत्य चतुराननस्तवाधिकारोऽयं न भवतीति

ङ्गक विभाग ते निरनिराळ्या प्रकारांनीं सांगितले आहेत. महाभारतांत जंबूद्वीपाचीं सातच वर्षें सांगितलीं आहेत. व त्यांचीं नांवेंहि कांहीं भिन्न आहेत. परंतु एकंदर वर्णनावरून नऊ सांगितलीं आहेत असेंहि म्हणतां येईल*.

---

( मागील पृष्ठावरून )

निवारयामास ॥ ३० ॥ ये वा उ ह तद्रथचरणनेमिकृतपरिखातास्ते सप्त सिंधव आसन् यतएव कृताः सप्तभुवो द्वीपाः ॥ ३१ ॥ स्कंध ५ अध्याय १.

१. भीष्मपर्व, अध्याय ६ वा.

* वर्षांचीं नांवें व विशेषतः त्यांचीं स्थानें याविषयीं पुराणांतील वर्णन कसें आहे हें पुढील उताऱ्यांवरून लक्षांत येईल.

**महाभारत, भीष्मपर्व, अध्याय ६**—प्रागायता महाराज षडेते वर्षपर्वताः। अवगाढा ह्युभयतः समुद्रौ पूर्वपश्चिमौ ॥३॥ हिमवान् हेमकूटश्च निषधश्च नगोत्तमः। नीलश्च वैदूर्यमयः श्वेतश्च शशिसंनिभः ॥ ४ ॥ सर्वधातुविचित्रश्च शृंगवान्नामपर्वतः। ... ॥५॥ एषामंतरविष्कंभो योजनानि सहस्रशः। तत्र पुण्या जनपदास्तानि वर्षाणि भारत ॥६॥ इदं तु भारतं वर्षं ततो हैमवतं परं...॥ ७ ॥ हेमकूटात्परं चैव हरिवर्षं प्रचक्षते। दक्षिणेन तु नीलस्य निषधस्योत्तरेण च ॥ ८ ॥ प्रागायतो महाभाग माल्यवान्नामपर्वतः। ततः परं माल्यवतः पर्वतो गंधमादनः ॥ ९ ॥ परिमंडलस्तयोर्मध्ये मेरुः कनकपर्वतः। ... तस्य पार्श्वेष्वमी द्वीपाश्चत्वारः संस्थिता विभो ॥ १२ ॥ भद्राश्वः केतुमालश्च जंबूद्वीपश्च भारत। उत्तराश्चैव कुरवः कृतपुण्यप्रतिश्रयाः ( अत्र जंबूशब्दो भारतवर्षपर इति चतुर्धरः ) ॥१३॥...मेरोस्तु पश्चिमे पार्श्वे केतुमालो महीपते ॥ ३१॥ ...नीलात्परतरं श्वेतं श्वेताद्धैरण्यकं परं। वर्षमैरावतं राजन्नानाजनपदावृतं ॥ ३७ ॥ धनुः संस्थे महाराज वर्षे द्वे दक्षिणोत्तरे। इलावृतं मध्यमं तु पंच वर्षाणि चैवहि ॥ ३८ ॥

तसेंच त्यांत भारतवर्षांतले देश* सांगितले आहेत; परंतु त्यांचीं नऊ खंडें असल्याचें सांगितलें नाहीं. अर्थात् त्यांचीं नांवेंहि नाहींत. कांहीं पुराणांत खं-

---

( मागील पृष्ठावरून )

**भागवत, स्कंध ५, अध्याय १६**—यो वायं द्वीपः (जंबू द्वीपः) कुवलयकमलकोशाभ्यंतरकोशः नियुतयोजनविशालः समवर्तुलो यथा पुष्करपत्रं ॥ ५ ॥ यस्मिन्नव वर्षाणि नवयोजनसहस्रायामान्यष्टभिर्मर्यादागिरिभिः सुविभक्तानि भवंति ॥ ६ ॥ एषां मध्ये इलावृतं नामाभ्यंतरवर्षं यस्य नाभ्यामवस्थितः सर्वतः सौवर्णकुलगिरिराजो मेरुर्द्वीपायाम समुन्नाहः कर्णिकाभूतः कुवलयकमलस्य ॥ ७ ॥ मूर्द्धनि द्वात्रिंशत्सहस्रयोजनविततो मूले षोडशसहस्रं तावतांऽतर्भूम्यां प्रविष्टः उत्तरोत्तरेणेलावृतं नीलः श्वेतः शृंगवानिति त्रयो रम्यक हिरण्मय कुरूणां वर्षाणां मर्यादागिरयः प्रागायताः उभयतः क्षारोदावधयः द्विसहस्र पृथव एकैकशः पूर्वस्मात्पूर्वस्मादुत्तर उत्तरो दशांशाधिकांशेन दैर्घ्य एव ऱ्हसंति ॥ ८ ॥ एवं दक्षिणेनेलावृतं निषधो हेमकूटो हिमालय इति प्रागायता यथा नीलादयः अयुतयोजनोत्सेधा हरिवर्षकिंपुरुषभारतानां यथा संख्यम् ॥ ९ ॥ तथैवेलावृतमपरेण पूर्वेणच माल्यवद्गन्धमादना वा नीलनिषधा यतौ द्विसहस्रं पप्रथतुः ॥ १० ॥ केतुमालभद्राश्वयोः सीमानं विदधाते॥११॥ मंदरो मेरुमंदरः सुपार्श्वः कुमुद इति अयुतयोजनविस्तारोन्नाहा मेरोश्चतुर्दिशमवष्टंभगिरय उपक्लृप्ताः ॥ १२ ॥ चतुर्ष्वेतेषु चूतजंबूकदंबन्यग्रोधाश्चत्वारः पादपप्रवराः पर्वतकेतव इवाधिसहस्रयोजनोन्नाहास्तावद्विटपाविततयः शतयोजनपरिणाहाः ॥ १३ ॥ ऱ्हदाश्चत्वारः पयोमध्विक्षुरसमृष्टजला यदुपस्पर्शिन उपदेवगणा योगैश्वर्याणि स्वाभाविकानि भरतर्षभ धारयंति ॥ १४ ॥ देवोद्यानानि च भवंति चत्वारि नंदनं चैत्ररथं वैभ्राजिकं सर्वतोभद्रमिति ॥ १५ ॥

---

* भीष्मपर्व, अध्याय ९.

डांचीं नांवें वर सांगितलेल्या नांवांहून भिन्न आहेत*.

वराहमिहिरानें बृहत्संहितेंत भारतवर्षांतले देश सांगितले× आहेत. ते, मध्यभाग व आठ दिशांकडले आठ भाग मिळून नऊ विभागांतील प्रत्येकांतले सांगितले आहेत. परंतु नऊ खंडें व त्यांचीं वर सांगितलेलीं नांवें अशी व्यवस्था त्यानें सांगितली नाहीं.

भास्कराचार्यांनीं द्वीपादि भाग सांगितले† आहेत. परंतु त्यांनीं सांगितलेली रचना विशेष सयुक्तिक व स्पष्ट समजण्यासारखी आहे. पृथ्वीचें उत्तर गोलार्ध हें जंबूद्वीप; विषुववृत्त हें जंबूद्वीप आणि इतर सहा द्वीपें यांची मर्यादा; इत्यादि रचना त्यांनीं ‡सांगितली आहे.

---

* प्रियव्रतानें सात पुत्रांस सात द्वीपें दिलीं. त्यांत आग्नीध्र याच्या वांट्यास जंबूद्वीप आलें. त्यानें आपल्या नाभि इत्यादि नऊ पुत्रांस नऊ वर्षें दिलीं. पुत्रांच्या नांवांवरून द्वीपांस नांवें पडलीं. नाभि यास अजनाभवर्ष दिलें. नाभीचा पुत्र ऋषभदेव यानें अजनाभवर्षाचे नऊ भाग करून आपल्या नऊ पुत्रांस दिले. व पुत्रांचींच नांवें त्या नऊ खंडांस ठेविलीं. तीं अशीं:—कुशावर्त, इलावर्त, ब्रह्मावर्त, मलय, केतु, भद्रसेन, इंद्रस्पृक्, विदर्भ, आणि कीकट. या सर्वांवर अर्थात् अजनाभ वर्षावर आधिपत्य आपल्या भरत नामक पुत्रास दिलें. पुढें त्याच्याच नांवावरून अजनाभवर्षास भारतवर्ष नांव पडलें. व त्याच्या एका खंडास भरतखंड हें नांव पडलें. ( भागवत, स्कंध ५, अ० २–२०, २१ व ५–४–९, १० व ५–७–१ पहा. )

× बृहत्संहिता, अध्याय १४ वा.

† सिद्धांतशिरोमणि, गोलाध्याय ३. २१–४२ (भुवनकोशवर्णन).

‡ पुढील पृष्ठावर पहा.

परंतु विस्तार होईल म्हणून एथे सांगत नाहीं. सप्त द्वीप, नव वर्षें आणि नव खंडें यांचीं नांवें त्यांनीं सांगितलीं आहेत त्यांत कांहीं नांवें वर सांगितलेल्या नांवांहून भिन्न आहेत.

यांतून आपल्यास भारतवर्षाविषयीं विचार करावयाचा. हिमवत् पर्वताच्या दक्षिणचें तें भारतवर्ष याविषयीं बहुधा मतभेद नाहीं.

उत्तरं यत्समुद्रस्य हिमाद्रेश्चैव दक्षिणं ।
वर्षं तद्भारतंनाम भारती यत्र संततिः ॥

विष्णुपुराण, २-३-१.

हिमालयाच्या दक्षिणचें व समुद्राच्या उत्तरचें तें भारतवर्ष.

इदं तु भारतं वर्षं ततो हैमवतं परं

महाभारत, भीष्मपर्व, ६-७.

संजय धृतराष्ट्रास सांगतोः—हें भारत वर्ष. [ याच्या पलीकडे हिमवत् पर्वत ] आणि त्याच्या पलीकडे हैमवत वर्ष. अर्थात् भारतवर्ष हें हिमालयाच्या दक्षिणेस आहे.

देशोऽयं भारतं वर्षं ।

अमरकोश, कां० २, भूवर्ग.

हा देश भारतवर्ष होय.

भरत या नांवापासून भारतवर्ष हें नांव पडलें हें स्पष्टच आहे. भरताची संतति एथे राहते म्हणून यास भारत म्हणतात असें, विष्णुपराणांतील एक श्लोक वर दिला आहे त्यावरून होतें. लिंगपुराणांतहि हेंच कारण सांगितलें आहे.

हिमाद्रेर्दक्षिणं वर्षं भरताय न्यवेदयत् ।

तस्मात्तु भारतं वर्षं तस्य नाम्ना विदुर्बुधाः ॥

अ० ४७, श्लो० २३.

हिमाद्रीच्या दक्षिणचें वर्ष भरतास दिलें म्हणून त्यास भारतवर्ष म्हणतात.

भागवतावरूनहि तेंच कारण दिसतें. हा भरत स्वायंभुव मनूचा सहावा वंशज होय.

वर सांगितलेली द्वीपादि व्यवस्था वेदांत कोठे आढळत नाहीं. पुरुषसूक्तांत सृष्ट्युत्पत्ति सांगितली आहे. त्यांत विराड्रूपाच्या पायांपासून* भूमि उत्पन्न झाली इत्यादि वर्णन आहे. परंतु द्वीपादिकांविषयीं त्यांत कांहीं नाहीं. तैत्तिरीय श्रुतींत परमात्म्यानें आकाश, अंतरिक्ष, सूर्यचंद्र, पृथ्वी, इत्यादि पूर्व कल्पाप्रमाणें केलीं असें सांगितलें† आहे. त्यांतहि द्वीपादि व्यवस्था नाहीं. ‡मनुस्मृतींतहि भूमि, नद्या, समुद्र, पर्वत, इत्यादि उत्पन्न केलीं इतकेंच वर्णन आहे. तेव्हां श्रुतिस्मृत्युत्तरकालीन ग्रंथांत ही रचना कोणत्या आधारानें आली हें समजत नाहीं. ऋग्वेदांत " सप्त सिंधवः ( सात सिंधु )" असे शब्द पुष्कळ ठिकाणीं आलेले आहेत. सिंधु श-

---

* पद्भ्यां भूमिः ऋग्वेदसं० १०-९०-१४.

† ऋतं च सत्यं चाभीद्धात्तपसोऽध्यजायत । ततो रात्रिरजायत ततः समुद्रो अर्णवः । समुद्रादर्णवादधिसंवत्सरो अजायत ॥ अहोरात्राणि विदधद्विश्वस्य मिषतो वशी । सूर्याचंद्रमसौ धाता यथा पूर्वमकल्पयत् । दिवं च पृथिवीं चांतरिक्षमथो सुवः ॥

‡ ताभ्यां स शकलाभ्यां च दिवं भूमिं च निर्ममे । मध्ये व्योम दिशश्चाष्टावपां स्थानं च शाश्वतं ॥ १३ ॥...सरितः सागरान् शैलान् समानि विषमाणि च ॥ २४ ॥ अध्याय १.

ब्दाचे 'नदी' 'समुद्र' इत्यादि अर्थ वेदांत प्रसिद्ध आहेत. तेव्हां सप्तसिंधु म्हणजे सप्तसमुद्र ह्या कल्पनेवरून पूर्वोक्त सर्व रचना कल्पिली असें कांहीं पंडितांचें मत आहे.

कसेंहि असलें तरी भारतवर्ष हें नांव पुष्कळ प्राचीन आहे ह्यांत संशय नाहीं. तशांत तें आपलें आहे. आणि आजपर्यंत चालत आलेलें आहे. शिरोभागीं लिहिलेल्या श्लोकांत व त्याच्या पूर्वींच्या श्लोकांत वर्णिल्याप्रमाणें भारती युद्धाच्या पूर्वींच्या अनेक प्राचीन राजांस व त्यावेळीं जमलेल्या असंख्य राजांस जें प्रिय होतें, व यदर्थच तें महायुद्ध उद्भवलें, ज्याकरितां अनेक परकीय राजेहि लोभाविष्ट झाले, तें भारतवर्ष तन्निवासी आपणा सर्वांस अत्यंत प्रिय होय हें स्पष्ट आहे.

भारतवर्षाच्या भूगोलाचे तीन भाग होतील. प्राचीन, मध्यावधीचा, आणि अर्वाचीन. श्रुतिस्मृतिपुराणादि ग्रंथांत जें देशादिकांचें वर्णन आहे तें प्राचीन, शिकंदराच्या नंतरचे ग्रीक ग्रंथकार व चिनी प्रवासी इत्यादि परदेशीय लोकांनीं लिहिलेलें वर्णन हें मध्यावधीचें, आणि महमद गजनवी यानंतरचें वर्णन तें अर्वाचीन असें माझें मत आहे. पहिल्या भागांत सामान्यतः ख्रिस्ती शकाच्या पूर्वींचा काळ घ्यावा. पुराणांची रचना प्राचीन हें म्हणणें युरोपियन लोकांस संमत नाहीं. कितीएक पुराणांस तर १७ व्या शतकापर्यंत त्यांनीं आणून सोडिलें आहे. परंतु असें म्हणणें

* नारदपुराण १६ व्या किंवा १७ व्या शतकांत रचलें असें विल्सनचें म्हणणें आहे.

साहसाचें आहे. तें पाश्चात्यांसच शोभतें. जगदुत्पत्ति होऊन काय तीं सहा हजार वर्षें झालीं. त्यांतहि जलप्रलयानंतर इतिहासादिकांस आरंभ. तेव्हां सुमारें चार हजार वर्षांत सगळा खेळ. त्याच्या पलीकडे गेलें कीं बस्तान बिघडलें. तेव्हां आमच्या वेदासारख्या ग्रंथांसहि ते आणवेल तितकें अर्वाचीनत्व आणूं पाहतात. परंतु आमच्या लोकांनीं विचार न करितां त्यांच्या मतांचें सर्वस्वीं अवलंबन करणें योग्य नाहीं. जगदुत्पत्तीस सहा हजारांहून जास्त वर्षें झालीं नाहींत, या ख्रिस्ती शास्त्राच्या मतांत कांहीं अर्थ नाहीं असें कांहीं युरोपियनांसहि वाटूं लागलें आहे. व आमची कालव्यवस्था जरी काल्पनिक तरी ती अगदींच निरर्थक नाहीं; भारती युद्धास फक्त सुमारें ३३०० वर्षें झालीं असें युरोपियनांचें मत आहे, परंतु तें खोटें; त्या युद्धास पांच हजारांहून जास्त वर्षें झालीं असें अर्वाचीन विद्वानांस मान्य होई अशा प्रकारें चांगल्या आधारानें उपपत्तिपूर्वक सिद्ध करितां येतें. तेव्हां महाभारताची रचना इसवी सनाच्या तिसऱ्या शतकांत झाली, या म्हणण्यांत फारसा अर्थ नाहीं. आतां सर्वच पुराणांचे सर्वच भाग प्राचीन असें म्हणतां येणार नाहीं, हें खरें. त्यांचे बरेच भाग प्रक्षिप्त असतील अशी शंका येण्यास जागा आहे. थोडासा आधार असला तर त्यावर कोणी अतिशयोक्ति करील; परंतु मूळ कांहीं तरी असलें पाहिजे. निदान देशनदीग्रामांचीं सर्व नांवें काल्पनिक रचिलीं असें म्हणणें साहस होय. तेव्हां पुराणांची रचना अर्वाचीन असें घटकाभर कबूल केलें तरी त्यांत

वर्णिलेली स्थिति प्राचीन असली पाहिजे. महाभारतांतील देशवर्णन पांडवांच्या वेळचें म्हणून केलेलें आहे. व त्यांतील पुष्कळ देशांचीं नांवें वेदांत आढळतात. तेव्हां पुराणांत जीं वर्णनें आढळतात तीं कल्यांचीं पदरचीं असें म्हणण्यापेक्षां कोणत्या तरी आधारानें लिहिलीं असतील हें म्हणणें सयुक्तिक आहे. महाभारतांतील ज्या नद्या सकृद्दर्शनीं कविकपोलकल्पित दिसतात, त्यांपैकीं कांहीं शिकंदराच्यावेळीं प्रसिद्ध होत्या असें युरोपियन ग्रंथकारांचे लेखांवरून दिसतें. असो. बरेंच विषयांतर झालें. एकंदरींत पुराणांतलें वर्णन प्राचीन म्हणण्यास हरकत नाहीं. वराहमिहिरानें भारतवर्षांतील देश सांगितले आहेत. वराहमिहिर हा इ० स० च्या ६ व्या शतकाच्या सुमारें होता, असें युरोपियन पंडितांचें मत आहे. परंतु तो इ० स० पूर्वी ६ व्या शतकांत झाला असें म्हणण्यास आधार आहेत. तसें नसलें तरी त्यानें देशादिकांचें वर्णन पाराशरतंत्राच्या आधारें केलें असें म्हणणें आहे. तेव्हां तें प्राचीनच होय.

वरील मत मान्य धरिलें नाहीं तरी वर्णनाच्या सोयीसाठीं तसे दोन भाग केलेच पाहिजेत. पुराणादिकांतील वर्णनाचें धोरण निराळें व परदेशीयांच्या वर्णनाचें निराळें. आमच्या ग्रंथांत जें वर्णन आहे, तें सांप्रत भूगोलवर्णनाची जी पद्धति आहे त्या पद्धतीचें नाहीं. तसेंच देशवर्णनाच्याच मात्र हेतूनें तें लिहिलेलें नाहीं. कथासंदर्भ जुळण्याकरितांच कोठे कोठे तें केलेलें असतें. यामुळें तें अगदीं थोडक्यांत व मोघम अ-

सतें. आणि कोठे कोठे तर इतिहासांत जे स्वाभाविकरीत्या स्थलांचे उल्लेख असतील त्यांवरून तें काढावें लागतें. आणखी असें कीं त्या वर्णनांत दिशाक्रम असतो तरी हिंदुस्थानासारख्या विस्तीर्ण देशांतलें एक नगर घेऊन त्याच्या अनुरोधानें दिशा सांगणें म्हणजे त्या बहुतेक सांगून न सांगून सारख्याच होतात. तसेंच एक महत्त्वाची न्यूनता त्यांत ही असते कीं अंतरें मुळींच नसतात. यामुळें वर्णिलेल्या स्थलांचा स्थाननिश्चय करण्यास त्याचा विशेष उपयोग होत नाहीं. परदेशीयांनीं केलेलीं वर्णनें जीं प्रस्तुत आपल्या सुदैवानें उपस्थित झालीं आहेत, तीं याहून सूक्ष्म आहेत. त्यांत अंतरें दिलीं आहेत यामुळें स्थाननिश्चय करण्यास त्याचा जास्त उपयोग होतो. म्हणून असे दोन भाग करणें अवश्य आहे.

प्राचीन आणि अर्वाचीन असे दोन भाग केले तरी चालतील. पहिल्यांत मुसलमानांचा या देशांत संचार होण्यापूर्वीचा म्हणजे सुमारें इ० स० १००० च्या पूर्वींचा काल व दुसऱ्यांत त्यानंतरचा काल घ्यावा. तरी पहिल्याचे दोन भाग केलेच पाहिजेत.

पहिल्या विभागांप्रमाणें दोन म्हणजे प्राचीन व मध्यावधि हे काल किंवा दुसऱ्या विभागाप्रमाणें घेतलें तर प्राचीन काल; या काळचें या देशाचें भूवर्णन या ग्रंथांत मुख्यतः करावयाचें आहे.

कोणी या देशाच्या भूगोलवर्णनाचे असे तीन भाग करितातः—पहिला भाग वैदिक काल; म्हणजे ज्यावेळीं वैदिक धर्माचा या देशांत भरभराट होता, बौद्ध

धर्म सुरू झाला नव्हता, तो काळ. याच्या वर्णनास आधार वेदांचा. या काळचा विश्वसनीय इतिहास थोडाच आहे, म्हणून यास इतिहासपूर्वकाल असेंहि म्हणतात. दुसरा बौद्ध किंवा प्राचीन काल. यांत बुद्धापासून म्हणजे इ० स० पू० ४९३ पासून महमदाच्या स्वारीपर्यंत काल, ज्याच्या पुष्कळ भागांत बौद्धधर्माचें या देशांत वर्चस्व होतें, तो घेतात. व तिसरा अर्वाचीन*.

या ग्रंथांत मुख्यत्वें इ० स० १००० पर्यंतच्या कालाचें भारतवर्षीय भूवर्णन करावयाचें हें वर सांगितलेंच आहे. त्याचे दोन भाग केले आहेत. पहिल्या भागांत वेद, पुराणें इत्यादि एतद्देशीय ग्रंथांवरून मिळालेली माहिती दिली आहे. दुसरा मुख्यत्वें इंग्रजी ग्रंथांवरून लिहिला आहे.

वर सांगितल्या तीन काळांपैकीं वैदिक काळासंबंधें भूगोल एम्. व्हिव्हेन डी. सेंट मार्टिन † यानें लिहिला आहे. दुसऱ्याचा एच्. एच्. विल्सन आणि प्रोफेसर लासन यांनीं× लिहिला आहे. परंतु या दोहोंत फक्त वायव्य हिंदुस्थानचें वर्णन आहे. परंतु लासन यानें दोन्ही काळचे सर्व देशाचे वर्णनाचीं दुसरीं पुस्तकें लिहिलीं आहेत. आणि त्याहूनहि विस्तारानें व्हि. डी. सेंट मार्टिन यानें दोन प्रसिद्ध निबंध लिहिले आहेत. परंतु

---

* कनिंगह्यामचा भूगोल पहा.

† पारीस–१८५९.

× अनुक्रमें Ariana Antiqua आणि Pentapotamia Indica या पुस्तकांत.

ह्यांतील बहुतेक पुस्तकें फ्रेंच व जर्मन भाषेंत आहेत. यामुळें त्यांचा आह्मांस उपयोग नाहीं.

दुसऱ्या भागाचे म्हणजे बौद्धकालाचे वर्णनावर अलेक्झांडर कनिंगह्यॅम ह्यानें एक मोठें पुस्तक* १८७१ मध्यें इंग्लंडांत प्रसिद्ध केलें आहे. मुख्यत्वें ह्याच्याच आधारानें या पुस्तकाचा दुसरा भाग लिहिला आहे.

कनिंगह्यॅमनें सदरील पुस्तक शिकंदराच्या स्वारीचीं व त्यानंतर दुसऱ्या ग्रीक ग्रंथकारांनीं लिहिलेलीं वर्णनें आणि मुख्यत्वें हुएनसंग नामक चिनी प्रवाशानें लिहिलेला वृत्तांत यांच्या आधारानें लिहिलें आहे.

शिकंदरानें आणि त्याच्या अनुयायांनीं मिळविलेली माहिती, आणि त्यानंतरच्या सीरियाच्या राजांच्या स्वाऱ्या आणि वकिलाती ह्यांपासून मिळालेली माहिती ही मुख्यत्वें गंगेच्या उत्तरभागचा प्रदेश आणि हिंदुस्थानचा पूर्व-पश्चिम किनारा यांविषयीं आहे. तींत देशाच्या अंतर्भागांतील स्थलांचें वर्णन क्वचित् आहे. हुएनचें वर्णन इ० स० च्या सातव्या शतकांतलें आहे. टालमीचा भूगोलहि फार उपयोगी आहे. कारण तो वरील दोघांच्या मधल्या काळचा ( इ० स० १५० ) आहे.

अनुक्रमें ५ व्या ६ व्या आणि ७ व्या शतकांत तिघे चिनी प्रवासी हिंदुस्थानांत आले होते. पहिला फाहिआन हा इ० स० ३९९ पासून ४१३ पर्यंत सिंधूच्या वरील भागापासून गंगेच्या मुखापर्यंत फिरला. त्याचें वर्णन थोडें आहे. परंतु त्यानें कांहीं स्थलांमधील

---

* Ancient Geography of India.

अंतरें ( योजनात्मक ) दिलीं आहेत. दुसरा संगयून हा इ० स० ५०२ मध्यें वायव्य हिंदुस्थानांत फिरला. परंतु त्यानें फारसें वर्णन केलें नाहीं. हे दोघे बुद्धधर्मी उपाध्याय होते. ह्या दोघांच्या वृत्तांतांची चिनींतून इंग्रजींत भाषांतरें रे० बील यानें केलीं आहेत. हुएन हा वरील दोघांप्रमाणें चीन देशांतला बौद्धधर्माचा उपाध्याय होता. तो बुद्धाचें मूलस्थान पहावें, धर्मग्रंथांचें अध्ययन करावें, धर्मसंबंधें प्रसिद्ध अशीं स्थलें पहावीं, या हेतूनें इ० स० ६२९ पासून ६४५ पर्यंत सर्व हिंस्थानामध्यें फिरला. त्या वेळेस हिंदुस्थानांत ८० राज्यें होतीं असें त्यानें लिहिलें आहे. त्या प्रत्येकाचें नांव, घेर, मुख्य शहराचें नांव व वर्णन इत्यादि, आणि तो ज्या ज्या स्थलीं गेला, त्या सर्व स्थलांमधील अंतरें व दुसरीहि पुष्कळ माहिती त्यानें दिली आहे. तो उत्तरेकडून काबुलांतून येऊन ६३१ मध्यें उहिंद एथे सिंधु उतरला. पुढें तक्षशिला एथे कांहीं महिने राहिला. तेथून काश्मीरांत गेला. तेथे ग्रंथ पढण्यास दोन वर्षे राहिला. नंतर चिनापटी एथे १४ महिने व जालंदर एथे ४ महिने राहून ६३५ मध्यें सतलज उतरला. पुढें बराच फिरून मथुरेस गेला. तेथून परत वायव्येस २०० मैलांवर स्थानेश्वर एथे गेला. नंतर यमुना, गंगाद्वार यांवरून उत्तरपंचाल ( सांप्रतचें रोहिलखंड ) ची राजधानी अहिछत्रा एथे गेला. पुनः गंगा उतरून संकास्या, कनोज, कोशांबी या मार्गानें गेला. नंतर उत्तरेस अयोध्या, श्रावस्ती एथे गेला. नंतर पूर्वेस कपिल[illegible]तु, बुद्धाचें जन्मस्थान यावरून कुशीनगरास जाऊन तेथून

काशीस आला. तेथून तिरहूत प्रांतांतील वैशाली एथे गेला. तेथून नेपाळांत जाऊन परत येऊन भागीरथी उतरून पाटलीपुत्र एथे गेला. नंतर गया, बुद्धगया इत्यादि पाहून मगध देशाच्या प्राचीन राजधान्या कुसागरपूर, राजगृह, या पाहून १९ महिने संस्कृत शिकण्यास वगैरे नालंद एथे राहून ६३८ च्या अखेरीस पूर्वेस वळला. मोदागिरि, चंपा (अंगदेशाची राजधानी) हीं पाहून गंगा उतरून पौंड्रवर्धन आणि कामरूप या देशांत गेला.

याप्रमाणें अगदीं पूर्वेस जाऊन मग दक्षिणेस वळला. समतट, ताम्रलिप्ति यांवरून ओड्र (ओरिसा) एथे ६३९ च्या आरंभीं आला. नंतर गंजाम, कलिंग यांतून जाऊन नंतर वायव्येस कोसल* (हल्लींचें वऱ्हाड) एथे गेला. नंतर दक्षिणेस आंध्र देशांतून धनककट एथे गेला. तेथे पुनः बरेच महिने बौद्ध ग्रंथांचें अध्ययन करण्यास राहून ६४० च्या आरंभीं द्रविड देशांत कांचीपुरी एथे गेला. तेथे सिंहलद्वीपाचा राजा नुकताच मेला असें त्यानें† ऐकिलें. म्हणून तिकडे जा-

---

* अयोध्या ज्या प्रांतांत आहे तो कोसल देश निराळा.

† चीनचा बादशाहा चिंगकांग याच्या कारकीर्दींत तिसऱ्या वर्षाच्या ८ वे महिन्यांत लिंगचू एथून हुएन निघाला. या बादशाहाच्या सनावरून हुएननें सांगितलेलीं अंतरें आणि मधील मुक्कामांचे दिवस यांच्या आधारानें तो अमुक महिन्यांत अमुक स्थानीं गेला असें कनिंगहॅम ह्यानें ठरविलें आहे. त्यावरून ६४० च्या आरंभीं तो कांचीस गेला असें निघतें. तेथे त्यानें सीलोनचा राजा मारला गेला असें ऐकिलें. ६३९ मध्यें तेथील राजा बुनमुगलान (Buna Mugalan) मारला गेला. ह्यावरून कनिंगहॅमनें ठरविलेल्या तारखा व वर्षें खरीं असें तो म्हणतो.

ण्याचा बेत रहित करून तो कोंकण आणि महाराष्ट्र या देशांतून नर्मदेवर भरुच एथे आला. तेथून उज्जनी आणि वल्लभी हीं पाहून सिंध प्रांतांत मुलतान एथे ६४१ च्या अखेरीस गेला. तेथून पुनः मगधमध्यें नालंद एथे गेला. कामरूप देशांत दुसऱ्यानें गेला. ६४३ च्या आरंभीं पाटलीपुत्र एथे पुनः गेला. तेथे हर्षवर्धन ( शिलादित्य ) याचा पांच वार्षिक उत्सव चालला होता. त्यास १८ मांडलिक राजे जमले होते. हर्षवर्धनाच्या स्वारीबरोबर तो प्रयाग, कोशांबी यांवरून कनोज ( हर्षाची राजधानी ) एथे गेला. पुढें जालंदरवरून जाऊन उहिंद एथे ६४३ च्या अखेरीस सिंधु उतरला. तेथून लंघन एथे गेला. पुनः दक्षिणेस बानू, काबूल, गजनीवरून कापिसा एथे आला. पुढें काशगार, यार्कंद, या मार्गें ६४९ च्या वसंतांत चिनांत पोंचला.

याच्या वृत्तांताचें भाषांतर चिनी भाषेंतून एम्. स्टानिस्लास जुलियन यानें केलें आहे. जुलियन यानें मुद्दाम या कामाकरितां संस्कृत आणि चिनी भाषा शिकण्याकडे २० वर्षें खर्चिलीं. या पुस्तकाच्या आधारानें कनिंगह्यॅम यानें आपलें पुस्तक लिहिलें आहे. कनिंगह्यॅम हा ३० वर्षें उत्तर हिंदुस्थानांत नोकरीस होता. त्यांत शेवटचीं ४ वर्षें तर तो आर्किआलाजिकल सर्व्हेकडे मुख्य होता. तो पेशावर आणि मुलतान ह्यापासून रंगून, प्रोमपर्यंत आणि लदकपासून नर्मदेपर्यंत सर्व प्रदेशांत फिरला होता. या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत लिहिलेलीं नर्मदेच्या उत्तरचीं बहुतेक सर्व स्थलें त्यानें स्वतः पाहिलीं होतीं. व पुष्कळ ठिकाणीं जुन्या स्था-

नांची त्यानें स्वतः मोजणी केली होती. या व दुसऱ्या पुष्कळ गोष्टींच्या साधनानें त्यानें हुएनसंगनें लिहिलेलीं व त्या पूर्वीच्या प्राचीन इतिहासादिकांतील स्थलें हीं हल्लींचीं कोणतीं याचा निर्णय केला आहे. आतां हें खरें कीं हुएनच्या मूळ लेखांतच चुका असण्याचा संभव आहे. कारण त्यानें विशेषतः लोकांच्या सांगण्यावरून अंतरें, नांवें, प्रांतांचे घेर वगैरे लिहिलेले असले पाहिजेत. स्वदेशाभिमानानें प्रांताचे घेर वगैरे लोकांनीं जास्त सांगितले असतील. दुसरें तेव्हांच्या प्रवासाची व आतांची गोष्ट फार निराळी. तसेंच तो किती झालें तरी चिनी. त्याचे उच्चारांत बराच फरक असण्यांचा संभव आहे. त्यानें कोठे एका राज्यामध्यें मांडलिक राज्यांचा समावेश करून घेर लिहिले असावे. आणखी त्यानें वृत्त लिहिल्यास आज १२०० हून जास्त वर्षें झालीं. इतक्या काळांत त्याच्या मूळ प्रतींत कितीक फेरफार झाले असतील. एक शून्य जास्तकमी पडलें कीं १०० चे हजार किंवा १० होणार. अशा ग्रंथाचें फ्रेंच भाषेंत भाषांतर. व त्यावरून कनिंगह्यमनें इंग्रजींत लिहिलें आहे. चिनी लिपीचें वैलक्षण्य प्रसिद्धच आहे. फ्रेंच, इंग्रजी ह्याहि लिपी उच्चारपद्धतींत तिजहून फार चांगल्या असें नाहीं. अशा तीनचार रूपांतर झालेल्या उच्चारांवरून निर्णय करावयाचा. हुएनच्या एका शब्दाचे दोनतीन प्रकारचे उच्चार होतील असें कनिंगह्यमनेंच दाखविलें आहे. त्यांत आणखी कनिंगह्यमचे कोठे कोठे विलक्षण तर्क; हंसूं येण्याजोगीं स्थलनामादिकांविषयीं अनुमानें; कोठे कोठे

विस्तारानें लिहिलेलीं परंतु सिद्ध करावयाच्या गोष्टीस थोड्याच अंशीं लागू अशीं प्रमाणें, व त्यावरून एकादी सिद्धता; आणि सिद्धतेंत केलेले अन्योन्याश्रय, ह्या गोष्टींची भर. अशा स्थितींत केलेले निर्णय अगदीं बरोबर असतील असें संभवत *नाहीं. तथापि त्याचा स्वतःचा अनुभव फार महत्त्वाचा आहे. हुएननें सांगितलेल्या अंतरादिकांमध्यें त्यानें सुचवलेले फेरफार बहुतेक आवश्यकच आहेत. हुएनसंग व जुलियन हे दोघे संस्कृत भाषा जाणणारे होते. हुएननें पुष्कळ नांवें संस्कृत भाषेंत लिहिलीं आहेत. इत्यादि कारणांनीं कनिंगह्यमच्या निर्णयामध्यें फारशा चुका असण्याचा संभव नाहीं. कांहीं निर्णय तर अगदीं बिनचूक आहेत. कांहीं स्थानांमध्यें अंतर पडलें तर थोड्याशा मैलांचें पडेल. हजार-पांचशें मैलांची चुकी कधीं पडणार नाहीं. †पंचालदेश हस्तिनापूरच्या पूर्वेचा पश्चिमेस तर कधींच जाणार नाहीं.

असो. कनिंगह्यमच्या पुस्तकाचा मीं संक्षेप केला आहे. त्याचीं जीं प्रमाणें दुर्बल वाटलीं तीं टाकलीं आ-

* या विवेचनावरून आपल्या देशांतील देशग्रामादिकांचा स्थाननिर्णय करण्यास आपल्या ग्रंथांचा आधार फार महत्त्वाचा ही गोष्ट स्पष्ट दिसून येईल. तो आधार अर्वाचीन असला तरी परंपरागत म्हणून महत्त्वाचा होय. प्राचीनाविषयीं सांगावयासच नको.

† आमचे भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश करणारे गोडबोले हे हस्तिनापूरच्या पश्चिमेस एक पंचाल देश होता, तेथेंच द्रुपद राजा होता असें लिहितात! परंतु ती चुकी आहे. एवढें सिद्ध करण्याला भारताहून दुसरा पुरावा नको.

हेत. कांहीं सविस्तर माहिती आहे ती थोडक्यांत लिहिली आहे. आणि कोठे कोठे पुराणादि ग्रंथांच्या आधारानें जास्त माहिती घातली आहे. कनिंगह्यमनेंहि पुराणादिकांचे आधार कोठे कोठे घेतले आहेत. तथापि अंतरें, मापें, घेर आणि हुएननें लिहिलेलें स्थल हें सांप्रतचें अमुकच हा निर्णय, इतक्या गोष्टी कनिंगह्यॅमच्याच पुस्तकांतून मीं घेतल्या आहेत. तेव्हां या प्रत्येकाबद्दल प्रतिस्थलीं टिपांत आधार दिले नाहींत. तथापि प्रसंगवशात् दिले आहेत.

हुएननें अंतरें ' ली ' नामक मापानें दिलीं आहेत. फाहिआननें योजनात्मक दिलीं आहेत. पुष्कळ प्रसिद्ध स्थलांच्या अंतरावरून सहा ' ली ' म्हणजे एक मैल असें कनिंगह्यमनें सिद्ध केलें आहे. एका योजनाचे हुएननें व फाहिआननेंहि ४० ' ली ' धरले आहेत. यावरून योजन म्हणजे सरासरी ७ मैल होतात. कनिंगह्यॅमनें 'ली' व मैल अशा दोन्ही मापांनीं अंतरें इत्यादि सांगितलीं आहे. मीं बहुतेक स्थलीं मैल मात्र लिहिले आहेत. क्वचित् प्रसंगवशात् ' ली ' सांगितले आहेत.

---

# भाग पहिला

आपले जे सर्वांत प्राचीन ग्रंथ वेद त्यांत भारतवर्षांतील नदीदेशादिकांचें काय वर्णन आलें आहे याविषयीं प्रथमतः विचार करूं. त्यांतहि सर्वमतें प्राचीनतम जो ऋग्वेद त्यांत काय आहे तें प्रथम पाहूं.

ऋग्वेदसंहितेंत पंजाबांतील नद्या, दुसऱ्या कांहीं नद्या आणि एकदोन देश इतक्यांचा काय तो उल्लेख आला आहे. नद्यांविषयीं ऋग्वेदांत फार महत्त्वाचें वर्णन म्हटलें म्हणजे १० व्या मंडळांतील ७५ वें सूक्त होय. तें सर्वच प्रथमतः एथे सांगून नंतर इतर स्थळींचे उल्लेख पाहूं.

प्रसुव आपो महिमानमुत्तमं कारुर्वोचाति सदने विवस्वतः। प्रसप्त सप्त त्रेधाहि चक्रमुः प्रसृत्वरीणामति सिंधुरोजसा ॥ १ ॥ प्रतेरदद्‌ वरुणो यातवे पथः सिंधो प्रद्वाजां अभ्यद्रवस्त्वं । भूम्या अधिप्रवता यासि सानुना यदेषामग्रं जगतामिरज्यसि ॥ २ ॥ दिवि स्वनो यतते भूम्योपर्यनंतं शुष्ममुदियर्ति भानुना । अभ्रादिव प्रस्तनयंति वृष्टा सिंधुर्यदेति वृषभो न रोरुवत्‌ ॥ ३ ॥ अभित्वा सिंधो शिशुभिन्नमातरो वाश्रा अर्षंति पयसेव धेनवः। राजेव युध्वा नयसि त्वमित्‌ सिचौ यदा सामग्रं प्रवतामिनक्षसि ॥ ४ ॥ इमं मे गंगे यमुने सरस्वति शतद्रु स्तोमं सचता परुष्ण्या । असिक्न्या मरुद्वृधे वितस्तयार्जीकीये शृणुह्यासुषोमया ॥ ५ ॥ तृष्टामया प्रथमं यातवे सजूः सुसर्त्वा रसया श्वेत्यात्या। त्वं सिंधो कुभया

गोमतीं क्रुमुं मेहत्न्वा सरथं यामिरीयसे ॥६॥ ऋज्रीत्येनीरुशती महित्वा परिज्रयांसि भरते रजांसि । अदब्धा सिंधुरपसामपस्तमाऽश्वा न चित्रा वपुषीव दर्शता ॥ ७ ॥ स्वश्वा सिंधुः सुरथा सुवासा हिरण्मयी सुकृता वाजिनीवती । ऊर्णावती युवतिः सीलमावतीत्युताधिवस्ते सुभगा मधुवृधं ॥ ८ ॥ सुखं रथं युयुजे सिंधुरश्विनं तेन वाजं सनिषदस्मिन्नाजौ । महान्ह्यस्य महिमा पनस्यतेऽदब्धस्य स्वयशासोविरप्शिनः ॥ ९ ॥

अर्थः*—हे उदकांनो, उपासकाच्या गृहामध्यें कवि तुमचा श्रेष्ठ महिमा वर्णो. सात सात नद्या तीन मार्गांनीं गेल्या. सर्व नद्यांस सिंधु आपल्या वेगानें मागें टाकते. १. हे सिंधु, जेव्हां तूं धांवत निघालीस तेव्हां वरुणानें तुझ्या गमनाकरितां मार्ग खणिला. तूं ह्या नद्यांची अग्रेसर होऊन उच्चप्रदेशापासून नीचप्रदेशाकडे वाहतेस. २. पृथ्वीपासून आकाशापर्यंत शब्द जाऊं पाहतो. ( प्रवाह ) मोठ्या सपाट्यानें अति वेग धारण करितो. मेघांतून वृष्टीची गर्जना होते त्याप्रमाणें उदकाची मोठी गर्जना होते. सिंधु गमन करिते तेव्हां वृषभाप्रमाणें गर्जना करिते. ३. हे सिंधु, गाई दुग्धयुक्त होत्सात्या आपल्या वत्साकडे हंबरत जातात त्याप्रमाणें ह्या नद्या आपल्या उदकांसह तुजकडे धांवतात. राजाप्रमाणें तूं ह्या दोहों समुदायांसह त्यांची अग्रेसर होऊन सखल प्रदेशाकडे वेगानें जातेस. ४. हे गंगे, यमुने,

* हें भाषांतर अगदीं शब्दशः आहे असें नाहीं. याचप्रमाणें पुढील सर्व भाषांतरांविषयीं समजावें. कोठे तर श्लोक वगैरे सर्व देऊन त्यांतला कामापुरता मात्र अर्थ घेतला आहे.

सरस्वति, शतद्रु, तुम्ही परुष्णी आणि असिक्नी या नद्यांसह हें माझें स्तोत्र स्वीकारा. हे मरुद्वृधे, तूं वितस्तेसह आणि आर्जीकीये, तूं सुषोमेसह ( माझें स्तोत्र ) ऐक. ५. हे सिंधु, तूं प्रथम तुष्टामा, सुसर्तु, रसा आणि श्वेती यांशीं संगत होतेस. मग कुभा, गोमती, क्रुमु, मेहत्नु यांस घेऊन एका रथांत बसल्याप्रमाणें चालतेस. ६. वेगानें निघणारी, चकाकणारी, भव्यस्वरूपानें शोभणारी, अप्रतिहत, पयस्विनींमध्यें श्रेष्ठ अशी सिंधु चित्रविचित्र अश्विनीप्रमाणें आपलें सुंदर रूप प्रकट करित ह्या रजोमय प्रदेशांत वाहते. ७. उत्तम घोड्यांच्या रथामध्यें बसलेली, उत्तम वस्त्रें परिधान केलेली, सुवर्णमय अलंकारांनीं भूषित, अन्नदात्री, ऊर्णावती, तरुण, ओषधियुक्त, सुभगा, अशी सिंधु मधुवर्धक प्रदेशांतून गमन करिते. ८. सिंधूनें आपला अश्वयुक्त, सुखकारक रथ जोडला आहे. ती आह्मांस या युद्धामध्यें बल देवो. कारण या अप्रतिहत, प्रख्यात व स्तुत्य अशा रथाचा महिमा फार प्रसिद्ध आहे. ९.

हें सूक्त मुख्यत्वें सिंधूविषयींच आहे. ऋग्वेदांत सिंधूचें वर्णन पुष्कळ स्थलीं आलें आहे. ऋग्वेदांत सिंधु शब्दाचे निरनिराळे अर्थ आहेत. एक अर्थ सामान्यतः कोणतीहि नदी असा होतो. दुसरा "सिंधु नामक नदी" असा आहे. सिंधु म्हणजे समुद्र असाहि अर्थ कोठे कोठे येतो. " सप्त-सिंधु " असेहि शब्द अनेक स्थलीं येतात. त्यांचा अर्थ सात नद्या असा होतो. 'सप्तनद्यः' असेहि शब्द आले आहेत. ह्या सात नद्या कोणत्या तें स्पष्ट नाहीं. ह्यां शब्दांचा दुसरा अर्थ सात नद्यांतील

उदकें जेथून येतात तो प्रदेश म्हणजे अंतरिक्ष असा अर्थ होतो.

वरील सूक्तांतील एक खेरीज करून सर्व ऋचांत सिंधूचें नांव आलें आहे. प्रथम प्रथम ती नदीरूपानें वर्णिली आहे. व पुढें पुढें ती देवता कल्पिली आहे. तथापि तिचें देवतारूपानें वर्णन असलें तरी बहुधा मूळ स्वरूप त्यांत गर्भित असतें. १·१२६·१; ३·३३·३; ५·५३·९; १०·६४·९; या ऋचांत सिंधु नामक प्रसिद्ध नदी असा अर्थ विवक्षित दिसतो. आणखीहि १·९४·६; १·१२२·६; १·१८५·५; २·१५·६; ४·३०·१२; ७·३३·३; ८·२०·२५ या ऋचांत सिंधु शब्द आला आहे. परंतु त्याचा सर्वत्र सांप्रतची सिंधु नदी हाच अर्थ आहे असें खात्रीनें म्हणतां येणार नाहीं.

सिंधु ही भारतवर्षांत वायव्येस किंवा पश्चिमेस असल्याचें व ती हिमालयापासून निघाल्याचें वेदोत्तरकालीन पुराणादि ग्रंथांत पुष्कळ उल्लेख आहेत. परदेशी यांच्या ग्रंथांतहि ही प्रसिद्ध आहे. युरोपियन लोकांस इंडस या नांवानें ही माहीत आहे. शिकंदराची स्वारी व त्यानंतरच्या हिंदुस्थानसंबंधी इतिहासांत ग्रीक ग्रंथकारांनीं इंडसचा पुष्कळ उल्लेख केला आहे. एकंदरींत वेदांतील सिंधु ही सांप्रतची हिमालयापासून निघणारी व पंजाब आसि सिंध प्रांतांतून वाहणारी सिंधुच होय याविषयीं कांहीं संशय नाहीं.

ऋग्वेदांत सिंधूबरोबर दुसऱ्या पुष्कळ नद्यांचें वर्णन आहे. त्यांपैकीं ज्या, सिंधूच्या ह्या आंगुच्या असें सिद्ध करितां येतें, त्यांविषयीं प्रथम विवेचन करूं.

वर लिहिल्या नऊ ऋचांच्या सूक्तांतील पांचवींत शतद्रु, आर्जीकीया, परुष्णी, असिक्नी, वितस्ता, हीं नांवें आलीं आहेत. इरावतीस परुष्णी असें नांव होतें आणि आर्जीकीयेस विपाट् किंवा विपाशा हें नांव होतें असें निरुक्तांत* आहे.

शतद्रुश्च विपाशाच तृतीयेरावती तथा ।
चंद्रभागा वितस्ताच सिंधु षष्ठा बहिर्गिरेः ॥ ३२ ॥

महाभारत, कर्णपर्व, अ० ४४.

या श्लोकावरून शतद्रु, विपाशा, इरावती, चंद्रभागा आणि वितस्ता, ह्या सिंधूच्या शाखा असें म्हणण्यास अगदीं हरकत नाहीं. मत्स्यपुराण अध्याय ११३ यांत ज्या हिमालयोत्पन्न नद्या आहेत त्यांत ह्यांपैकीं विपाशा खेरीज करून बाकी पांचहि आहेत.

टालमी वगैरे प्राचीन युरोपियन ग्रंथकारांनीं पंजाबांतल्या नद्यांचा उल्लेख केलेला आहे. त्यांत पूर्वेकडून सिंधूपर्यंत पांच नद्यांचीं नांवें पाहिलीं असतां अशीं आढळतातः—

| ग्रीक नांवें | ग्रीक नांवें | सांप्रतचीं नांवें क्रमानें |
|---|---|---|
| Hesudrus किंवा Hesidrus | सुद्रु / सिद्रु | सतलज |
| Hyphasis | फासि | ब्यास |
| Hydraoti | राओती | रावी |
| Akesines किंवा Sandobaga | अकिसिनी / सांडोबागा ‡ | चिनाब |

* यास्कः—इरावतीं परुष्णीत्याहुः । ...आर्जीकीयां विपाळित्याहुः । निरुक्त ९. २६.

‡ Sandobaga हें नांव टालमीनें लिहिलें आहे. ती चंद्रभागा होय.

| | | |
|---|---|---|
| Hydaspes किंवा Bidaspes | आस्पी बिडास्पी | बेहाट ( झेलम ) |

ऋग्वेदांतील प्रथम दिलेलीं नांवें, यास्काच्या वेळचीं दोन नांवें आणि भारतांतील नांवें तसेंच इ० स० च्या आरंभापूर्वींचीं दोन-तीन शतकांतील किंवा नंतरच्या एक-दोन शतकांतील ग्रीकांनीं लिहिलेलीं नांवें, व हल्लींचीं नांवें या सर्वांची तुलना करूं गेलें असतां पुष्कळ साम्य दृष्टीस पडतें. तेव्हां यांचें ऐक्य आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. यांत एक फार चमत्काराची गोष्ट अशी कीं भारतांतील जो श्लोक वर दिला आहे, त्यांतील नांवें अगदीं क्रमानें सांप्रतच्या सतलजपासून क्रमानें सर्व नद्यांच्या नांवांशीं जुळतात. तेव्हां भारतांतील क्रम हा साहजिक आला असेल असें म्हणतां येत नाहीं. तर वर्णन करण्याच्या वेळीं तशीं नांवें क्रमानें सहा नद्यांस असावीं, असें निश्चयानें म्हणतां येतें. यांत चिनाबला महाभारतांतील नांव चंद्रभागा येतें. व तिलाच ग्रीक नांव अकिसिनी व चंद्रभागा आहे. यावरून चंद्रभागा* आणि असिक्नी ह्या एकच असें स्पष्ट दिसतें. तर मग आतां पुढें लिहिल्याप्रमाणें निर्णय ठरतो.

| ऋग्वेद | निरुक्त (यास्क) | महाभारत. | ग्रीकांनीं लिहिलेलीं नांवें. | सांप्रतचीं नांवें |
|---|---|---|---|---|
| शतद्रु | | शतद्रु | सुद्रु | सतलज |
| आर्जीकीया | विपाशा विपाट् | विपाशा | फासी | ब्यास |

* हल्लींचें नांव चिनाब हा चंद्रभागा याचा अपभ्रंश होय.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| परुष्णी | इरावती | इरावती | राओती<br>रावती | रावी |
| असिक्नी | | चंद्रभागा | अकिसिनी | चिनाब |
| वितस्ता | | वितस्ता | विडास्पी | विहात (झेलम) |

ऋग्वेदसंहितेंतील शतद्रु इत्यादि पांच नद्या म्हणजे सांप्रतच्या कोणत्या हें दाखविलें. त्यांचा ऋक्संहितेंत वर सांगितला त्याशिवाय आणखी कोठे उल्लेख आला आहे हें सांगून मग इतर नद्यादिकांचा विचार करूं.

शतद्रूचा उल्लेख ऋ०सं०३.३३.१ या ऋचेंत आला आहे.
विपाशा „ „ ३.३३.१,२ आणि ४.३०.११ „
परुष्णी „ „ ७.१८.८,९ आणि ८.६३.१५ „
असिक्नी „ „ ८.२०.२५ „

पूर्वोक्त “ तुष्टामया ” ( १०.७५.६ ) या ऋचेंत सिंधूस प्रथम तुष्टामा, सुसर्तु, रसा, श्वेती, ह्या नद्या मिळतात. नंतर कुभा, गोमती, क्रुमु, मेहत्नु, ह्या नद्या मिळतात असें सांगितलें आहे.

यांपैकीं एकीचेंहि नांव पुराणांत कोठे आढळत नाहींत.

एरियन नामक ग्रीक ग्रंथकार लिहितो* कीं “ सिंधूला पश्चिमेकडून प्युकेला ओती ( पुष्कलावती ) प्रांतांतून कोफी नदी येऊन मिळते. ती मालोंतू, सोआस्तु आणि गारोई ह्या नद्यांसह येते. ” यांतील कोफी ही ऋग्वेदांतील सिंधूस मिळणारी कुभा म्हणजे सांप्रतची काबूल नदी असें युरोपियन पंडितांचें मत आहे. तसेंच वरील ऋचेंतील कुभेच्या पुढें सांगितले-

* एरियन इंडिका ४.११.

ऱ्या गोमती आणि क्रुमु ह्यांचें सिंधूस सांप्रत पश्चिमेकडून मिळणाऱ्या गोमल आणि कुरम यांशीं ऐक्य दिसतें. कुभा, गोमती आणि क्रुमु यांचें सांप्रतच्या काबूल, गोमल आणि कुरम यांशीं ऐक्य मानलें तर, पूर्वोक्त ( १०.७५.६ ) ऋचेंत कुभा इत्यादिकांच्या अगोदर सिंधूस मिळतात म्हणून सांगितलेल्या ज्या तुष्टामा, सुसर्तु, रसा, श्वेती, ह्या काबूल नदीच्या वर (उत्तरेस) सिंधूला मिळणाऱ्या नद्या असल्या पाहिजेत, हें उघड आहे.

मा वो रसाऽनितभा कुभा क्रुमुर्मा वः सिंधुर्निरीरमत्।
मा वः परिष्ठात् सरयुः पुरीषीण्यस्मे इत् सुम्नमस्तुवः ॥

ऋ० सं० ५.५३.९.

हे मरुतांनो, रसा, अनितभा, कुभा, क्रुमु, सिंधु ह्या तुम्हांस प्रतिबंध न करोत. उदकमय सरयु तुम्हांस न थांबवो.

यांत रसा इत्यादिकांबरोबर अनितभा, सरयु ह्या आणखी आल्या आहेत. अनितभा, रसा, व पूर्वोक्त ऋचेंतील श्वेती ह्या सांप्रतच्या अबुसिन, बुरिंडू आणि सुद्रुम ह्या होत; असें पूर्वापर संबंधावरून दिसतें, असें प्रोफे० लासन याचें म्हणणें आहे.

वर सांगितलेल्या नद्यांतील गोमती आणि सरयू ह्या सांप्रतच्या या नांवाच्या अयोध्या प्रांतांतील नद्या असें मानण्याची आवश्यकता* नाहीं. एका स्थलींच्या

---

* परंतु असें मानल्यावांचून गत्यंतर नाहीं असें नाहीं. ऋग्वेदांत कीकट ( मगध ) देशाचें नांव आलें आहे. याविषयीं पुढें सांगितलें आहे.

नद्यांचीं नांवें मागाहून दूरच्या दुसऱ्या नद्यांस पड-ल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. गोमती तर सिंधूस मिळते असें वर स्पष्टच आहे, व वर सांगितल्या ऋ-चेंत सरयू ही सिंधु व तिच्या कुभा, क्रुमु, ह्या शाखा ह्यांबरोबर आली आहे. तेव्हां ती त्यांच्या जवळचीच कोणती तरी असली पाहिजे.

ऋ० सं० ८.१९.३७ यांत "सुवास्त्वा*मधितुग्वनि" यांत सुवास्तु नदी आली आहे. महाभारतांत वास्तु, सुवास्तु आणि †गौरी ह्यांचीं नांवें एकत्र आलीं आहेत. आणि वरील एरियनच्या उताऱ्यांत सुवास्तु आणि गौरी ह्या कोफी ( काबूल ) नदीस मिळतात, असें लिहिलें आहे. तेव्हां ह्या दोहोंचा विचार केला असतां सुवास्तु ही सांप्रतची स्वात होय. ती प्रथम पंजकोरा नदीस मिळून तीसह काबूल नदीस उत्तरेकडून येऊन मिळते. पंजकोरा ही ग्रीकांची गाओरी व महाभारतां-तील गौरी होय.

१०.७५.६ यांतील सिंधूच्या शाखा व त्यांजबरो-बर आलेल्या दुसऱ्या नद्या यांचा उल्लेख ऋग्वेदांत आणखी कोठे आला आहे तें पाहूं. कुभा दोन ऋचांत आल्याचें वर सांगितलेंच आहे. आणखी कोठे ती आ-ढळत नाहीं. गोमती ८.२४.३० यांत आली आहे.

---

* अत्र यास्कः—सुवास्तुर्नदी तुग्वतीर्थं भवति. ॥

† गणपत कृष्णाजीच्या छापखान्यांत छापलेलें भारताचें पु-स्तक प्रसिद्ध आहे त्यांत एथे " वस्त्रां सुवस्त्रां गौरीं च " असा पाठ आहे. ( भीष्मपर्व, ९. २६. )

"एषो अपश्रितो वलो गोमतीमवतिष्ठति." रसा-नदी पुष्कळ ऋचांत आली आहे. वर दोन स्थलें सांगितलींच आहेत. आणखी १.११२.१२ यांत उल्लेख आहे. शिवाय ९.४१.१९, ५.४१.६, १०.१०८.१, १०.१२१.४ यांतहि रसा आली आहे. परंतु यांत ती एक काल्पनिक नदी आहे असें कोणाचें मत आहे. यास्क, रसा ही एक नदी सांगतात.*

सरयू–ही वरील दोन स्थलांखेरीज ४.३०.१८ या ऋचेंत आली आहे.

सरस्वती–ही ऋग्वेदसंहितेंत पुष्कळ प्रसिद्ध आहे. सातव्या मंडलांतील ९५ आणि ९६ हीं दोन सूक्तें सरस्वती आणि सारस्वत यांविषयीं आहेत. सरस्वती ही नदीरूपानें वर्णिलेली असते. व देवता असें समजूनहि तिचें वर्णन असतें. तथापि देवतास्वरूपांतहि तिचें मूळरूप गर्भित असतें.‡

सरस्वतीचा उल्लेख पुष्कळ स्थलीं आला आहे. त्यांतून कांहीं प्रसिद्ध स्थलें सांगतों.

नित्वादधे वर आपृथिव्या इळायास्पदे सुदिनत्वे अन्हां
दृषद्वत्यां मानुष आपयायां सरस्वत्यां रेवदग्ने दिदीहि ।

ऋ० सं० ३.२४.४.

हे अग्ने, शुभदिनीं मी तुला पृथ्वीवरच्या पवि-

* निरुक्त ११.२५ पहा.

‡ यास्क–तत्र सरस्वती इत्येतस्या नदीवत् देवतावच्च निगमा भवंति. या शब्दाचें निर्वचन असें केलें आहे:–सरस्वती सर इत्युदकनाम सर्तेस्तद्वती (निरु० ९. २६). सायणहि म्हणतात कीं, द्विविधाहि सरस्वती । विग्रहवद्देवता नदीरूपाच.

त्र स्थानीं स्थापितों. हे संपत्तिमान् अग्ने, तूं दृषद्वती, आपया आणि सरस्वती यांच्या तीरांवरील मनुष्यसमुदायामध्यें प्रकाश.

इयं शुष्मेभिर्बिसखा इवारुजत्सानु गिरीणां तविषेभिरूर्मिभिः
पारावतघ्नीमवसे सुवृक्तिभिः सरस्वतीमाविवासेम धीतिभिः ।

ऋ० सं० ६.६१.२.

हिनें आपल्या वेगवान् आणि तीक्ष्ण अशा लहरींनीं, कमळें तोडणाराप्रमाणें, पर्वताचे कडे तोडले आहेत. रक्षणाकरितां स्तुतींनीं आणि सूक्तांनीं सरस्वतीला बोलावूं या. जी आपलीं तीरें फोडिते.

७.९६.२ आणि ८.२१.१८ ह्यांत तिच्या कांठचे राजे व लोक असा उल्लेख आला आहे. ( चित्रइद्राज राजका इदन्यके यर्के सरस्वतीमनु । )

१०.७५.७ यांत सिंधूला " अपसामपस्तमा " असें विशेषण दिलें आहे, तें ६.६१.३ यांत सरस्वतीला दिलें आहे. ७.९५.१ यांत ही सर्व नद्यांहून श्रेष्ठ म्हटली आहे.

१.१३.९., १.१४२.९., १.१८८.८ इत्यादि आप्रीसूक्तांत इळा, भारती, मही, होत्रा, वरूत्री, धिषणा या देवतांबरोबर सरस्वतीचें वर्णन येतें.

२.४१.१६ यांत सरस्वतीस " अंबितमा, नदीतमा, देवीतमा " ( मातांमध्यें श्रेष्ठ माता, नद्यांमध्यें श्रेष्ठ नदी, देवींमध्यें श्रेष्ठ देवी ) असें म्हटलें आहे.

६.६१.१०. आणि ७.३६.६ यांत सरस्वतीस "सप्तस्वसा, सप्तथी, सिंधुमाता " अशीं विशेषणें आहेत.

५.४३.१३ यांत सरस्वती स्वर्गावरून मोठ्या पर्वतावरून यज्ञांत येवो असें म्हटलें आहे. ( अनो दिवो बृहतः पर्वतादा सरस्वती* यजता गंतु यज्ञं ).६.४.७ यांत सरस्वतीला " पावीरवी कन्या " ( विजेची कन्या ) असें म्हटलें आहे. ६.६३.११,१२ यांत सरस्वती ही ' आपप्रुषी पार्थिवान्युरु रजोंतरिक्षं ( पृथ्वी आणि अंतरिक्ष हीं व्यापणारी ), त्रिसदस्था ( तीन स्थलीं राहणारी ) अशी वर्णिली आहे.

यावरून सरस्वतीचें स्वरूप क्रमपूर्वक दिसून येईल. ती देवता कल्पिल्यावर "†पावका नः सरस्वती ( सरस्वती आह्मांस पवित्र करणारी ) " " हीं [ सरस्वतीचीं ] उदकें[1] आह्मांस पवित्र करोत " " ह्या आपोदेवता अपवित्रता नाहींशी करोत " इत्यादि वर्णन साहजिकच आहे.

एकंदरींत ऋग्वेदांत सरस्वतीचा महिमा मोठा आहे. सांप्रत जशी गंगा तशी पूर्वी सरस्वती[2] होती.

वर एका ऋचेंत ( ३.२४.४ ) सरस्वती आणि दृषद्वती यांच्या पवित्रप्रदेशीं अग्नीची स्थापना केल्याचा उल्लेख आहे. या दोन नद्यांमधील प्रदेशास कुरु-

---

* यांत सरस्वती म्हणजे मध्यमा वाक् असा अर्थ सायण करितात.

† ऋ० सं० १.३.१०.

१. ऋ० सं० १०.१७.१० यापूर्वींच्या ऋचांत सरस्वतीचें वर्णन आहे.

२. महाभारत, वन पर्व, अध्याय ८६—सर्वं कृतयुगे पुण्यं त्रेतायां पुष्करं स्मृतं । द्वापरे च कुरुक्षेत्रं गंगा कलियुगे स्मृता ॥९०॥ यावरून कुरुक्षेत्र म्हणजे सरस्वतीतीरचा प्रदेश. याचें माहात्म्य, गंगेचें माहात्म्य वाढण्याच्या अगोदरच होतें हें स्पष्ट होतें.

क्षेत्र म्हणतात. तें अतिपवित्र मानलेलें आहे. हें सांप्रत यमुनेच्या पश्चिमेस फार* प्रसिद्ध स्थान आहे. याच्या पवित्रतेविषयीं ऋक्संहितेंतहि उल्लेख आला आहे. तसा इतर वेदांतहि आला आहे. वाजसनेय संहिता ४.२ आणि अथर्ववेद ६.५१.२ ह्यांत सरस्वती मला पवित्र करो, इत्यादि वर्णन आहे. ऐतरेय ब्राह्मण २.१९ यांत 'ऋषयो वै सरस्वत्यां सत्रमासत' इत्यादि वर्णन आहे. महाभारतादि वेदोत्तरकालीन ग्रंथांत तर सरस्वती आणि कुरुक्षेत्र यांचें माहात्म्य पुष्कळच आहे. त्या सर्वांस आधारभूत वेद. त्यांतहि मूळ ऋग्वेदसंहिता होय याविषयीं संशय नाहीं. सरस्वतीचे पुराणांत वर्णिलेले सप्तप्रवाह यांचें मूळ सप्तधा, सप्तस्वसा, सप्तथी या शब्दांत आहे. आणि वस्तुतः सांप्रतहि सरस्वतीचे सात प्रवाह आहेत. एकंदरींत सरस्वती व तिच्या समीपचा प्रदेश हीं अति प्राचीन कालापासून परंपरेनें आजपर्यंत परमपूज्य मानित आले आहेत.

दृषद्वती—हिचा उल्लेख वर सांगितलेल्या एका ऋचेशिवाय दुसरे कोठेहि आला नाहीं.

यमुना—१०.७५.५ याखेरीज दोन स्थळीं यमुनेचा उल्लेख आला आहे. ५.५२.१७ (यमुनायामधिश्रुतमुद्राधो गव्यं मृजे निराधो अश्व्यं मृजे) यांत 'यमुनेवरील गोरूप आणि अश्वरूप संपत्ति' असें वर्णन आहे. आणि ७.१८.१९ यांत यमुनेनें इंद्रास रक्षिलें (आवदिंद्रं यमुना)' असें वर्णन आहे.

* याविषयीं सविस्तर वर्णन पुढें येईल.

गंगा—" इमं मे गंगे " या ऋचेंत मात्र गंगा शब्द आला आहे. ६.४५.३१ यांत गांग्य ( गंगेवर राहणारा ) असें विशेषण आलें आहे. ( उरुः कक्षो न गांग्यः ). ऋक्संहितेंत आणखी कोठेहि गंगेचें* नांव नाहीं.

आणखी नद्या—अंशुमती, हरियुपीया, यव्यावती, ह्या ६.२७.५,६ आणि ८.८५.१३ व पुढील ऋचा यांत आल्या आहेत. १.१०४.३ यांत शिफा नामक नदी आली आहे. आणि १.१०४.४ यांत अंजसी, कुलिशी, वीरपत्नी ह्या तीन नद्यांचीं नांवें आहेत. परंतु ह्या सर्व नद्या कोणत्या हें ठरविण्यास वर्णनावरून कांहीं साधन नाहीं.

ऋक्संहितेंतील नद्यांविषयीं सांगितलें. आतां इतर स्थलादिकांविषयीं पाहूं.

असे उल्लेख थोडेच आहेत. १०.१२१.४ ह्यांत ‡हिमालयाचें नांव आलें आहे. " यस्ये मे हिमवंतो महित्वा यस्य समुद्रं रसया सदाहुः ". विंध्यपर्वताचा उल्लेख ऋक्संहितेंत कोठेच नाहीं. तेव्हां त्याच्या दक्षिणेकडील स्थलांविषयीं पहावयासच नको.

ऋ. १०.३४.१ यांत (सोमस्येव मौजवतस्य भक्षः)

---

* तैत्तिरीय श्रुतींत " गंगायमुनयोर्मध्ये ये वसंति... नमो गंगायमुनयोर्मुनिभ्यश्च नमः " इत्यादि उल्लेख आहे.

‡ अथर्ववेदांत पुढील उल्लेख आहे.

गिरयस्ते पर्वता हिमवंतोऽरण्यं ते पृथिवी स्योनमस्तु ।

१२.१.११.

हे पृथ्वि, तुझे पर्वत हिमवंत होवोत. आणि तुझीं अरण्यें सुंदर होवोत.

व इतर स्थलींहि सोमास मूजवानावर उत्पन्न झालेला असें म्हटलें आहे. मूजवान् हा एक पर्वत असें यास्क म्हणतो.*

१.१२६.७ यांत गंधार देशाचा संबंध आला आहे. " सर्वाहमस्मि रोमशा गंधारीणामिवाविका ॥ " ( गंधार देशांतल्या मेंढीप्रमाणें मी सर्वभागीं केशयुक्त आहें )". गंधारदेश कोफीन ( काबूल ) नदीच्या दक्षिणेस होता असें लासनचें मत आहे. ग्रीक ग्रंथकारांनीं गंदारिती लोक ह्याच स्थलीं होते असें लिहिलें आहे. हिराटोडस ह्या प्रख्यात ग्रीक इतिहासकारानें इराणचा बादशहा झरकसीज याच्या सैन्यांत पार्थियन,

* मौजवतो मूजवति जातः मूजवान् पर्वतः ( निरु० ९.८.)
मूजवान् पर्वताचा उल्लेख इतर वेदांतहि आहे.

' एतत्ते रुद्रावासं तेन परो मूजावतो अतीहि ।
अवततधन्वा पिनाकावसः कृत्तिवासा अहिंसन् नः
शिवो अतीहि ॥

वाजसनेय संहिता ३.६१.

हे रुद्रा, हें तुझें अन्न. ह्यासह मूजावतापलीकडे जा.

ह्या मंत्रावरच्या भाष्यांत मूजावत् हें रुद्राचें स्थान असें भाष्यकारानें म्हटलें आहे. महाभा० सौप्तिक पर्व आणि अश्वमेध पर्व यांत शिव मूजावत् पर्वतावर तपश्चर्या करितो इत्यादि वर्णन आहे. शतपथ ब्राह्मणांत मूजावत् हा उत्तरेकडचा पर्वत म्हटला आहे. अथर्ववेद ५.२२ यांत गंधार आणि बाल्हिक या देशांबरोबर ह्याचा उल्लेख आहे. यावरून मूजवत् पर्वत हिंदुस्थानच्या वायव्येकडे असावा. बाल्हिक नांवाची बाक्ट्रीयांतील एक लोकांची जात आहे.

१. याच्या स्थानाविषयीं विशेष विचार पुढें दुसऱ्या भागांत येईल.

सोगाडियन, गंदारियन वगैरे लोक होते असें सांगितलें आहे. विलसन लिहितो कीं गंदारियन लोक सिंधूच्या दोन्ही तीरांवर होते.

ऋ० सं० ३.५३.१४ यांत कीकट देशाचें नांव आलें आहे.

किं ते कृण्वंति कीकटेषु गावो नाशिरं दुहे न तपंति घर्मं।
आ नो भर प्रमगंदस्य वेदो नैचाशाखं मघवत् रंधयानः॥

अर्थः—तुझ्या गाई कीकटांत काय करित आहेत? त्या हवीकरितां दूध देत नाहींत आणि अग्नीस तप्त करित नाहींत. प्रमगंदाची संपत्ति आमचेकडे आण. आणि हे इंद्रा, नीच मनुष्यास आमच्या स्वाधीन कर.[1]

कीकट हा देश, त्यांत अनार्य लोक राहत होते असें यास्क म्हणतात. ( कीकटोनाम देशोऽनार्यनिवासः–निरु० ६.३२. )

मीमांसेंत एका सूत्रांत या ऋचेचा उल्लेख आला आहे. तेथे नैचाशाख हें एक नगर व प्रमगंद हा तेथला राजा असें म्हटलें आहे. त्रिकांड शेषांत कीकट म्हणजे मगध[2] असें आहे. भागवत[3] १.३.२४ यांत कीकट

१. सायणांनीं असा एक अर्थ करून दुसरा एक निराळा केला आहे. " यद्वा क्रियाभिर्यागदानहोमलक्षणाभिः किं फलिष्यतीत्यश्रद्धधानाः प्रत्युतपिबतखादताऽयमेव लोको न परः इति वदंतो नास्तिकाः कीकटाः " या अर्थास निरुक्तांतहि आधार आहे.

२. मगधाः कीकटाः मताः ॥ ११ ॥ भूमिवर्ग.

३. भारतांत कोठेहि कीकट देशाचें नांव नाहीं. बृहत्संहिता अ० १४ यांत देशांचीं नांवें दिलीं आहेत, त्यांतहि नाहीं. हें

देशांत बुद्धाचा जन्म होईल असें लिहिलें आहे. तेथे टीकाकारानें " गयाप्रदेशे " अशी व्याख्या केली आहे. आणखी भागवतांतच 'यत्र यत्र च मद्भक्ताः प्रशांताः समदर्शिनः । साधवः समुदाचाराः पूज्यंतेऽपि कीकटाः ' ( भा० ७ . १० . १८ ) यांतहि, यास्कानें लिहिल्याप्रमाणें कीकटांचें अनार्यत्व स्पष्ट आहे. या सर्व प्रमाणांवरून कीकट म्हणजे मगध देश ( सांप्रतचा बहार ) हें स्पष्ट होतें.

ऋक्संहितेंतील नदीदेशादिकांचा विचार झाला. या स्थलीं प्रसंगानुसार हें सांगण्यास हरकत नाहीं कीं आर्यलोक प्रथम हिंदुकुश पर्वताच्या सुमारास कोठे तरी प्रथम रहात होते. त्यांतून कांहीं पश्चिमेकडे युरोपखंडांत गेले. कांहीं ( पारसीक ) इराणांत राहिले. व कांहीं हिंदुस्थानांत आले असें युरोपियन विद्वानांचें मत आहे. ऋग्वेदांतील नद्यादिकांच्या उल्लेखावरून व मुख्यतः पाश्चात्य आर्य आणि प्राच्य आर्य यांच्या भाषासादृश्यावरून ते ही गोष्ट सिद्ध करितात. तथापि कोणत्याहि भारतवर्षीय ग्रंथांत किंबहुना अति प्राचीन अशा ऋग्वेदांतहि याबद्दल प्रत्यक्ष स्पष्ट उल्लेख नाहीं. असें *तेच कबूल करितात. परंतु अनुमान-

---

( मागील पृष्ठावरून )

चमत्कारिक होय. रघुनाथ भास्कर गोडबोले हे आपल्या भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोशांत कीकट देश भीष्मपर्व अ० ९ यांत असल्याचें लिहितात. परंतु सांप्रत उपलब्ध असलेल्या छापी पुस्तकांत त्या अध्यायांत तो नाहीं.

* Muirs Sanskrit Texts V. II. p. 322 पहा.

प्रमाणानें तें मत निश्चित होतें असें पुष्कळांचें मत आहे. ऋग्वेदरचनेच्या वेळीं आर्य बहुधा पंजाबांत रहात होते. दहाव्या मंडळाच्या वेळीं ते गंगेपर्यंत आले असें कांहीं पंडित म्हणतात; परंतु या म्हणण्यांत फारसा अर्थ नाहीं. तिसऱ्याच मंडळांत कीकट देश आला आहे. पांचव्या मंडळांत यमुनेवरील अश्वादि संपत्ति असा उल्लेख आहे. सहाव्यांत एकास 'गंगेवर राहणारा' असें म्हटलें आहे. प्रथम मंडलापासून क्रमानेंच पश्चिमेकडून पूर्वेकडच्या स्थलांचें वर्णन आहे असें कांहीं नाहीं. कीकटांतल्या राजाची संपत्ति मला दे असें म्हणणारा, त्या देशापासून फार दूर नसला पाहिजे. तथापि मागील एकंदर लेखावरून व पुढील लेखावरूनाहि आर्यांची वसति पश्चिमेकडून पूर्वेकडे होत गेली असें अनुमान होतें.

आतां इतर वेदभागांमध्यें देशादिकांचें काय वर्णन आलें आहे, त्या सर्वांचा एकत्रच विचार करूं. तो आतां वरच्याप्रमाणें फार सूक्ष्मपणें करण्याचें कारण नाहीं. याकरितां बहुधा देशादि मोठ्या भागांचा मात्र विचार केला आहे.

ऐतरेय ब्राह्मण ८.१४ यांत उत्तर कुरु, उत्तर मद्र यांचीं नांवें आलीं आहेत.—

अथ एनमुदीच्यां दिशि विश्वेदेवाः षड्भिश्चैव पंचविंशैरहोभिरभ्याषिंचन्नेतेन च तृचेन एतेन च यजुषा एताभिश्च व्याहृतिभिर्वैराज्याय । तस्मादेतस्यामुदीच्यां दिशि ये के च परेण हिमवंतं जनपदा उत्तर कुरवा उत्तरमद्रा इति वैराज्यायैव तेऽभिषिच्यंते । विराळित्येतानभिषिक्तानाचष्टे ।

यावरून उत्तरकुरु, उत्तरमद्र हे हिमालयाच्या पलीकडे होते असें दिसतें. पुराणांत द्वीपादिवर्णनांत उत्तरकुरु म्हणून एक वर्ष सांगितलें आहे, तें काल्पनिक नसावें; आर्य हिंदुस्थानाबाहेर होते तेव्हां ते उत्तरकुरु देशांत किंवा त्याच्या समीप असतील, तेव्हांचें त्यांस इकडे आल्यावरहि स्मरण असल्यामुळें असा उल्लेख आला आहे; असें युरोपियन पंडितांचें मत आहे. टालमीच्या भूगोलांत उत्तर*कुरु आलें आहे. या नांवाचा पर्वत, शहर व लोक होते. तेथे अति मोठें दिनमान १४$\frac{2}{3}$ तासांचें होतें असें त्यानें लिहिलें आहे. लासन म्हणतो कीं टालमीचें उत्तरकुरु काशगरच्या सुमारें असावें.

तथापि ऐतरेय ब्राह्मणांतच दुसऱ्या स्थलीं उत्तरकुरु हें देवक्षेत्र, तेथे मनुष्याची गति नाहीं, असें आलें आहे. "अत्यराति जानंतपि हा वासिष्ठ सात्यहव्य यास म्हणाला कीं मी उत्तरकुरुदेश जिंकीन तेव्हां तुलाच सर्व राज्य देईन. तेव्हां सात्यहव्य म्हणाला कीं तें देवक्षेत्र होय. मर्त्य तें जिंकण्यास समर्थ नाहीं.[1]" वेदोत्तरकालीन ग्रंथांत तर तें देवक्षेत्र, म-

---

* Ottorokorra. टालमीचा भूगोल ६.१६.

१. ही सर्व कथा अशी आहे:—ऐ० ब्रा० ८.२३—एतं ह वा ऐंद्रं महाभिषेकं वासिष्ठः सात्यहव्योऽत्यरातये जानंतपये प्रोवाच। तस्माद्वत्यरातिर्जानंतपिरराजा सन् विद्यया समंतं सर्वतः पृथिवीं जयन् परीयाय। स होवाच वासिष्ठः सात्यहव्योऽजैषीर्वै समंतं सर्वतः पृथिवीं महन्मा गमयेति। स होवाचात्यरातिर्जानंतपिर्यदा ब्राह्मणोत्तरकुरूञ्जयेयं त्वमु हैव पृथिव्यै राजा स्याः सेनापतिरेव

त्यांस अजिंक्य, अगम्य इत्यादि उल्लेख पुष्कळ आहेत. अथर्ववेद ५.४.१ ह्यांत हिमालयाच्या उत्तरेकडील प्रदेशाचा उल्लेख आला आहे. "उदङ् जातो हिमवतः प्राच्यां नीयसे जनं ।."

ऐ० ब्रा० ७.१८ यांत आंध्र, पुंड्र, शबर, पुलिंद यांचीं नांवें आलीं आहेत. विश्वामित्र राजानें अजीगर्तपुत्र शुनःशेप ह्यास सोडवून तो आपला पुत्र केला. तें त्याच्या १०० पुत्रांपैकीं वडील ५० पुत्रांस बरें वाटलें नाहीं. तेव्हां विश्वामित्रानें त्यांस सांगितलें कीं तुमचे वंशज अगदीं टोंकाकडच्या देशांत रहातील. ते आंध्र इत्यादि नीच जातीय झाले.

तस्य ह विश्वामित्रस्यैकशतं पुत्रा आसुः पंचाशदेव ज्यायांसो मधुच्छंदसः पंचाशत्कनीयांसस्तद्येज्यायांसो न ते कुशलं मेनिरे ताननुव्याजहारांतान् वः प्रजा भक्षीष्टेति । त एतेंऽध्राः पुंड्राः शबराः पुलिंदा मूतिबा इत्युदंत्या बहवो भवन्ति वैश्वामित्रा दस्यूनां भूयिष्ठाः ॥

( मागील पृष्ठावरून )

तेऽहं स्यामिति । स होवाच वासिष्ठः सात्यहव्यो देवक्षेत्रं वै तन्न वै तन्मर्त्यो जेतुमर्हत्यद्रुक्षो वै म आऽत इदं दद इति । ततो हाऽत्यरातिं जानंतपिमात्तवीर्यं निःशुक्रममित्रतपनः शुष्मिणः शैब्यो राजा जघान । तस्मादेवं विदुषे ब्राह्मणायैवं चक्रुषे न क्षत्रियो द्रुह्येन्नेद्राष्टादवपद्येयन्नेद्वा मा प्राणो जहदिति जहदिति ।

१. रामायण, किष्किंधाकांड ४३.३८—उत्तराः कुरवास्तत्र कृतपुण्यप्रतिश्रयाः ॥. महाभारत सभापर्व, वनपर्व, अनुशासनपर्व इत्यादिकांत पुष्कळ स्थळीं असेंच वर्णन आहे. त्यांतील कांहीं उतारे पुढें येतील.

शतपथ ब्राह्मण ११. ६. २. १ यांत विदेह देशाच्या जनक राजाचा उल्लेख आहे.—

" जनको ह वै वैदेहो ब्राह्मणैर्धावयद्भिः समाजगाम।."

त्याच ब्राह्मणांत पंचाल देशाचा उल्लेख आला आहे.*

कौषीतकि ब्राह्मण उपनिषद् यांत उशीनर, मत्स्य, कुरु, पंचाल, काशि, विदेह यांचीं नांवें आलीं आहेत.

शतपथ ब्राह्मण ८. १. ४. १० यांत गंधार देशाचा राजा नग्नजित् म्हणून होता. तो राजन्य ( क्षत्रिय ) होता असा उल्लेख आला आहे.—

अथ ह स्माहस्वर्जिन्नाग्नजितः । नग्नजिद्गांधारः ।

ऐ० ब्रा० ७. ३४ यांतहि नग्नजित गांधार याचें नांव आलें आहे. यावरून गंधार देशांत आर्य होते असें होतें.

---

* श्वेतकेतुर्ह वै आरुणेयः पंचालानां परिषदाजगाम ॥ शत० ब्रा० १४. ९. १. १ पहा. आणखी बृहदारण्यकोपनिषद् ६. २. १ पहा. छांदोग्यांतहि हाच उल्लेख आहे. ( ५. ३. १ पहा. )

१.—४.१ अथ ह वै गार्ग्यो बालाकिरनूचानः संस्पष्ट आस । सोवसदुशीनरेषु स वसन् मत्स्येषु कुरुपंचालेषु काशिविदेहेष्विति । स हाजातशत्रुं काश्यमाव्रज्य उवाच ॥ शतपथ ब्राह्मण १४. ५. १. १ आणि बृहदारण्यक उप० २. १. १ यांतहि ही कथा आहे.—दृप्तबालाकिरहानूचानो गार्ग्य आस । स होवाचाजातशत्रुं काश्यं ब्रह्म त्वां ब्रवीणाति ॥

२. महाभारतांतहि नग्नजित नामक गंधार देशचा एक राजा आला आहे. त्याचा पुत्र सुबल याची कन्या गांधारी धृतराष्ट्रपत्नी आणि पुत्र शकुनि हीं प्रसिद्धच आहेत. आदिपर्व अ० ११०—प्रऱ्हादशिष्यो नग्नजित् सुबलश्चाभवत्ततः ॥ तस्य प्रजा धर्महंत्री

आतां शतपथ ब्राह्मणांतला एक मनोरंजक आणि महत्त्वाचा उतारा देतों.

शतपथ ब्राह्मण १.४.१.१.—

" विदेघो ह माथवोऽग्निर्वैश्वानरं मुखे बभार । तस्य गोतमो राहूगण ऋषिः पुरोहित आस तस्मै स आमंत्र्यमाणो न प्रतिशृणोति न इन्मेऽग्निर्वैश्वानरो मुखान्निष्पद्यात इति । तं ऋग्भिर्व्हयितुं दध्रे " वीतिहोत्रं त्वा कवे द्युमंतं समिधीमहि अग्ने बृहंतमध्वरे विदेघ " इति । स न प्रतिशुश्राव । उदग्ने शुचयस्तव शुक्रा भ्राजंत ईरते तव ज्योतींष्यर्चयो विदेघ इति । स ह नैव प्रतिशुश्राव । तं त्वा घृतस्नवीमहे । इत्येवाभिव्याहरत् । अथास्य घृतकीर्त्वेवाग्निर्वैश्वानरो मुखादुज्जज्वाल । तन्न शशाक धारयितुं । सोस्य मुखान्निष्पेदे । स इमां पृथिवीं प्राप अधः । तर्हि विदेघो माथव आस सरस्वत्यां । स तत एव प्राङ् दहन्नाभीयायेमां पृथिवीं । तं गोतमश्च राहूगणो विदेघश्च माथवः पश्चाद्दहन्तमन्वीयतुः । स इमा सर्वा नदीरतिददाह सदानीरा इत्युत्तराद्गिरेर्निर्धावति । तां ह एव नातिददाह । तां ह स्मः तां पुरा ब्राह्मणा न तरंति अनतिदग्धाग्निना वैश्वानरेणेति । तत एतर्हि प्राचीनबहवो ब्राह्मणाः तद्ध अक्षेत्रतरमिवासस्रावितरमिवास्वदितमग्निना वैश्वानरेणेति । तदुह एतर्हि क्षेत्रतरमिव ब्राह्मणा उ हि नूनमेतद्यज्ञैरसिष्विदन् । सापि जघन्ये नैदाघे समिवैव कोपयति तावत् शीताऽनतिदग्धा ह्य-

---

( मागील पृष्ठावरून ).

जज्ञे देवप्रकोपनात् ॥ गंधारराजपुत्रोऽभूच्छकुनिः सौवलस्तथा । दुर्योधनस्य जननी जज्ञातेर्थविशारदौ ॥

ग्निना वैश्वानरेण । स होवाच विदेघो माथवः क्वाहं भवानीति । अत एव ते प्राचीनं भुवनमिति होवाच । सा एषाप्येतर्हि कोशलविदेहानां मर्यादा । ते हि माथवाः । अथ होवाच गोतमो राहूगणः कथं नु मे आमंन्त्र्यमाणो न प्रत्यश्रौषीरिति । स होवाच अग्निर्मे वैश्वानरो मुखेऽभूत्स न इन्मेमुखान्निष्पद्यातैतस्मात्ते न प्रत्यश्रौषमिति तदु कथमभूदिति । यत्र एव त्वं घृतस्नवीमह इत्यभिव्याहार्षीस्तदैव घृतकीर्त्वाग्निर्वैश्वानरो मुखादुदज्वालीत्तन्नाशकं धारयितुं । स मे मुखान्निरपादीति ।

विदेघ माथव हा वैश्वानर अग्नीस आपल्या मुखांत घालून नेता झाला. त्याचा गोतम राहूगण नामक ऋषि पुरोहित होता. त्यानें विचारलें तरी त्यास [ विदेघ ] उत्तर देईना. कारण कदाचित् अग्नि आपल्या मुखांतून बाहेर पडेल. [ असें त्यास वाटलें ]. तेव्हां "वीतिहोत्रं" या ऋग्मंत्रानें [ तो पुरोहित ] अग्नीचें आव्हान करूं लागला. [ मग म्हणाला ] हे विदेघा, तरी त्यानें उत्तर दिलें नाहीं. [ तेव्हां पुनः ] "उदग्ने शुचयः" [ हा मंत्र म्हणून पुनः म्हणाला ] हे विदेघा, तरीहि त्यानें उत्तर दिलें नाहीं. तेव्हां "तं त्वा घृतस्नवीमहे" ( हे घृतस्नु तुला आह्मी बोलावतों ) इतकेंच म्हटलें. त्यानें घृताचा उच्चार केल्याबरोबर अग्नि वैश्वानर मुखांतून बाहेर पडून प्रज्वलित झाला. [ विदेघ ] त्यास धरूं शकला नाहीं. तो त्याच्या मुखांतून बाहेर पडला. आणि खालीं पृथ्वीवर प्राप्त झाला. तेव्हां विदेघ माथव सरस्वतीवर होता. अग्नि तेथून पूर्वेकडे दहन करित पृथ्वीवर फिरला. तो जाळित चालला. त्या-

मागून गोतम राहूगण आणि विदेघ माथव हे गेले. तो अग्नि ह्या सर्व नद्यांवरून दहन करित गेला. सदानीरा ही नदी उत्तरपर्वतापासून निघते. तिच्या पलीकडे तो दहन करित गेला नाहीं. अग्नि वैश्वानर तिजवरून जाळित गेला नाहीं, म्हणून पूर्वीं ब्राह्मण ती उतरून जात नसत. परंतु सांप्रत पुष्कळ ब्राह्मण तिच्या पूर्वेस आहेत. अग्नीनें भुक्त नसल्यामुळें तो प्रदेश पाणथळ आणि वसति करण्यासारखा ( क्षेत्रतर ) नव्हता. सांप्रत तें चांगलें क्षेत्र आहे. कारण ब्राह्मणांनीं यज्ञांनीं तें अग्नीकडून उपभुक्त करविलें. वैश्वानर अग्नीनें अतिदग्ध नव्हती तोंपर्यंत शीतच असल्यामुळें ती नदी उष्णकालाच्या अंतीं क्षुब्ध होत असे. विदेघ माथव बोलला, मीं कोठे असावें? एथून पूर्वेकडे तुझें स्थान असें [ अग्नि ] बोलला. ती नदी आतांहि कोशल आणि विदेह यांची मर्यादा आहे. कारण तोहि माथव आहेत.

विदेह आणि कोसल ह्यांच्या सीमेवर सांप्रत गंडकी नदी आहे हीच सदानीरा असावी.

यांत आर्य पश्चिमेकडून पूर्वेकडे कसे वसति करित गेले हें अलंकारिक रीतीनें वर्णिलें आहे असें दिसतें.

अथर्ववेद ५.२२ यांत पुढील मंत्र आहेत.

ओकोऽस्य मूजवंत ओकोऽस्य महावृषाः ।
यावज्जातस्तक्मंस्तावानसि बाल्हिकेषुन्योचराः ॥५॥
तक्मन् मुंजवतो गच्छ बाल्हीकान् वा परस्तरान् ।
शूद्रामिच्च प्रफर्यतां तक्मन् वीवधूनुहि ॥ ७ ॥

महावृषान् मुंजवतो बंध्वाद्धि परेत्य ।
प्रैतानि तक्मने ब्रूमोऽन्यक्षेत्राणि वा इमा ॥ ८ ॥
तक्मन् भ्रात्रा बलासेन स्वस्रा कासिकया सह ।
पाम्ना भातृव्येण सह गच्छामुमरनंजनं ॥ १२ ॥
गंधारिभ्यो मूजवद्भ्यो अंगेभ्यो मगधेभ्यः ।
प्रैष्यं जनमिव शेवधिं तक्मानं परिदद्मसि ॥ १४ ॥

त्याचें (तक्मन्चें) गृह मूजवत्; त्याचें गृह महावृष. हे तक्मन्, तूं जन्मतांच बाल्हिक देशांमध्यें वसति करतोस. ॥ ५ ॥ हे तक्मन् मुजावतास जा. किंवा त्याहून पलीकडे बाल्हीक देशांत जा. अन्नाकरितां शूद्रस्त्रीचा आश्रय कर. आणि तिला कंपित कर. ॥ ७ ॥ हे मित्रा, जातांना महावृष आणि मूजवत् यांचें भक्षण कर. आह्मी तक्मन् ह्यास हे किंवा ते देश सांगतों. ॥ ८ ॥ हे तक्मन् तूं आपला बंधु बलासभगिनी कासिका आणि पुतण्या पामन् यांसह त्या परकी लोकांत जा. ॥१२॥ आह्मी तक्मन् ह्यास सेवकजनाप्रमाणें गंधार, मूजवत्, अंग, मगध या देशांस पाठवितों. ॥ १४ ॥

यांत कोणा रोगास उद्देशून अलंकारिक भाषण असावें. यांतील वर्णनावरून मूजवत् आणि बाल्हिक तसेच अंग आणि मगध हे देश वनस्त्यापासून दूर असावे असें दिसतें. ह्या त्यावेळच्या आर्यप्रदेशाच्या सीमा किंवा सीमेबाहेरचे देश असें कोणी अनुमान करितात.

तैत्तिरीय ब्राह्मण, शतपथ ब्राह्मण, जाबालोपनिषद् आणि रामतापिनी यांत कुरुक्षेत्राचा उल्लेख आला आहे.

तेषां कुरुक्षेत्रं वेदिरासीत् । तैत्ति० ब्रा०

तेषां कुरुक्षेत्रं देवयजनमास तस्मादाहुः कुरुक्षेत्रं देवानां देवयजनं ॥ शत० ब्रा० प्रवर्ग्यकांड.

अविमुक्तं वै कुरुक्षेत्रं ॥ जाबा० रामता० उप०

---

आतां वेदोत्तरकालीन ग्रंथांत देशादिकांचें वर्णन आहे त्याचा विचार करूं.

भारतवर्षाचे मोठाले निरनिराळे विभाग किंवा त्यांच्या सीमा सांगितलेल्या, वेदांत कोठे आढळत नाहींत. विंध्य पर्वताचाच उल्लेख कोठे दृष्ट होत नाहीं. तेव्हां तत्प्रयुक्त आर्यावर्तादि भाग अर्थात् नसावयाचेच. हे विभाग प्रथमतः मनुस्मृतींत आढळतात.

सरस्वतीदृषद्वत्योर्देवनद्योर्यदंतरं ।
तं देवनिर्मितं देशं ब्रह्मावर्तं प्रचक्षते ॥ १७ ॥
कुरुक्षेत्रं च मत्स्याश्च पंचालाः शूरसेनकाः ।
एष ब्रह्मर्षिदेशो वै ब्रह्मावर्तादनंतरः ॥ १९ ॥
हिमवद्विंध्ययोर्मध्यं यत्प्राग्विनशनादपि ।
प्रत्यगेव प्रयागाच्च मध्यदेशः प्रकीर्तितः ॥ २१ ॥
आसमुद्रात्तु वै पूर्वादासमुद्रात्तु पश्चिमात् ।
तयोरेवांतरं गिर्योरार्यावर्तं विदुर्बुधाः ॥ २२ ॥

अध्याय २.

सरस्वती आणि दृषद्वती या देवनद्यांमधील जो प्रदेश त्या देवनिर्मित प्रदेशास ब्रह्मावर्त म्हणतात. ॥१७॥ कुरुक्षेत्र, मत्स्य, पंचाल, शूरसेन हा ब्रह्मर्षिदेश होय. हा ब्रह्मावर्तानंतर आहे. ॥ १९ ॥ विनशनाच्या पूर्वेस आणि

प्रयागाच्या पश्चिमेस हिमवान् आणि विंध्य यांमधील जो प्रदेश त्यास मध्यदेश म्हणतात. ॥ २१ ॥ पूर्वसमुद्रापासून पश्चिमसमुद्रापर्यंत त्याच ( हिमवान् आणि विंध्य ) पर्वतांमधील प्रदेश त्यास आर्यावर्त असें ज्ञाते म्हणतात. ॥ २२ ॥

यांत कुरुक्षेत्र* हें ब्रह्मावर्ताहून निराळें असें सकृद्दर्शनीं वाटतें. परंतु तसें नाहीं असें मला वाटतें. ह्या विभागांची एकंदर पद्धति पाहिली असतां उत्तरोत्तर विभागांत पूर्वभागांचा समावेश केला आहे. मध्यदेश आर्यावर्ताबाहेर नाहीं हें स्पष्ट आहे. तो त्यांत समाविष्ट होतो. मध्यदेशांत ब्रह्मर्षिदेशाचा समावेश होतो. त्याप्रमाणें ब्रह्मर्षि देशांत ब्रह्मावर्त येतो असें मला वाटतें. ब्रह्मावर्तास कुरुक्षेत्र असें नांव आहे. हा प्रदेश कोणता याविषयीं पुढें सविस्तर सांगण्यांत येईल. एथें कुरुक्षेत्र असा निराळा निर्देश केला आहे, ह्यावरून असें दिसतें कीं कुरुक्षेत्र शब्दानें सरस्वती आणि दृषद्वती यांमधील प्रदेश ज्यास ब्रह्मावर्त किंवा कुरुक्षेत्र म्हणतात त्यासुद्धां सर्व कुरुदेश घ्यावयाचा.

मनुस्मृतींत आणखी एकदां कुरुक्षेत्र, मत्स्य, पंचाल, शूरसेन या देशांचा उल्लेख आला आहे. ( अ० ७ श्लो० १९३ ). ह्या देशांतील लोक सैन्यांत अग्रभागीं योजावे असें सांगितलें आहे.

---

* कुरुक्षेत्र म्हणजे यमुनेच्या पश्चिमचा जो देश उत्तरेस सरस्वतीपासून दक्षिणेस वृंदावन मथुरा यांपर्यंत पसरलेला आहे तो असें मनुस्मृतीचा टीकाकार म्हणतो.

आणखी अ० १० श्लो० ४३,४४ ह्यांत ब्राह्मण-समागम नाहीं इत्यादि कारणांनीं मूळचे क्षत्रिय असून नीच झालेले पौंड्र, उड्र इत्यादि लोक सांगितले आहेत.

शनकैस्तु क्रियालोपादिमाः क्षत्रियजातयः ।
वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च ॥
पौंड्रकाश्चोड्रद्राविडाः कांबोजा यवनाः शकाः ।
पारदाः पल्हवाश्चीनाः किराता दरदा खशाः ॥

भारतवर्षांतल्या आणखी देशांचीं नांवें मनुस्मृतींत नाहींत. यावरून ते आर्यांस माहीत नव्हते असें नाहीं. हें आर्यावर्ताच्या सीमा, व त्याच्या पलीकडचेहि कांहीं देश सांगितले आहेत यावरून स्पष्ट आहे. देशवर्णन करणें हा स्मृतीचा उद्देशच नाहीं, तेव्हां कारण घडलें तितके देश साहजिक आले.*

---

आतां पुराणादि ग्रंथांत देशनदीपर्वतादिकांचें वर्णन आहे. त्याचा विचार करूं. पुराणांत देशादिकांचें जें वर्णन असतें त्यावरून त्यांचा स्थाननिर्णय अगदीं बरोबर होणें अशक्य आहे. त्यांतहि सर्व ग्रंथांतील लेखांची एकवाक्यता होणें कठिण. तेव्हां पुराणादिकांत जसें वर्णन आहे तसें एथे सांगणें यापेक्षां फारसें जास्त कांहीं करितां येणार नाहीं. तशांत या पुस्तकाच्या दुसऱ्या भागांत पुराणांतील बऱ्याच देशां-

* वेदादिकांवरून अनुमानें काढतांना हीहि गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. परंतु नामांकित विद्वान्‌हि केव्हां केव्हां केवळ एकाद्या स्थलींच्या उल्लेखावरून चमत्कारिक अनुमानें काढितात.

चा स्थानादि निर्णय, केवळ पुराणादिकांतील वर्णनाच्या आधारानें होणाऱ्या निर्णयापेक्षां विशेष निश्चयात्मक होणार आहे. म्हणून पुराणादिकांत आलेले याविषयींचे लेख मात्र एथे सांगतों. शेवटीं त्यांत आलेले देशादिक हे सांप्रतचे कोणते हें पाहण्याविषयीं कांहीं प्रयत्न करूं.

महाभारतांत अशा प्रकारचें वर्णन पुष्कळ व विस्तारानें आहे. म्हणून त्यासच यांत मुख्यत्व दिलें आहे. त्यांतील देशादिकांचा विचार केला म्हणजे त्यांत बहुतेक येईल म्हणून बाकीच्या पुराणांतील लेखांचा विचार फारसा न करितां प्रसंगानुसार बहुधा कामापुरता मात्र करूं.

महाभारत भीष्मपर्व अध्याय ९ वा. यांत भारतवर्षांतील देश, नद्या इत्यादि पुष्कळ सांगितल्या आहेत. तसेंच राजसूय यज्ञाच्या वेळीं पांडवांनीं दिग्विजय केला. अर्जुनानें उत्तर दिशा जिंकिली; भीमानें पूर्वेकडचे देश घेतले; सहदेवानें दक्षिणेकडचे देश जिंकिले; नकुल पश्चिमेकडे गेला होता. या दिग्विजयाचें वर्णन सभापर्वांत २६ व्यापासून ३२व्या अध्यायापर्यंत आहे. त्यांत त्यांस जे देशादि जसजसे लागले ते तसतसे सांगितले आहेत. वनपर्व अध्याय २५४ यांत कर्णदिग्विजयाचें वर्णन आहे. त्यांत चारी दिशांचे बरेच देश आले आहेत. आणखी अश्वमेधपर्वांत अश्व ज्या ज्या देशांतून गेला ते सर्व दिशांकडचे बरेच देश ७४ व्या पासून ८९ व्या अध्यायापर्यंत आहेत. शिवाय जागजागीं प्रसंगानुसार देशांचे उल्लेख आहेत. वनपर्वांत तीर्थे, नद्या ह्यांचें पुष्कळ वर्णन आहे.

पर्वत—भारतवर्षांत मुख्य पर्वत महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान्, ऋक्षवान्, विंध्य, पारियात्र आणि हिमवान् हे आहेत. ह्यांस अष्टकुलाचल म्हणतात. कोणी यांतला एक कमी करून सप्तकुलाचल* म्हणतात. सात म्हणण्याचा प्रचार विशेष आहे.

महेंद्र पर्वत कलिंग[1] देशांत आहे. ( दुसऱ्या भागांत कलिंग देश पहा. ) सह्याद्रि, विंध्याद्रि, हिमालय, हे प्रसिद्धच आहेत. शुक्तिमान् आणि ऋक्षवान्[2] ( अथवा ऋष्यवान् ) हे कोणते हें निश्चयानें सांगवत नाहीं. भीम दिग्विजय करित पूर्वेस गेला होता तेव्हां उत्तर कोसल देश जिंकल्यावर हिमालयाच्या पार्श्वभागीं गेला. तेथून भल्लाट देशांत गेला. पुढें त्यास शुक्तिमान् पर्वत लागला. यावरून हा भारतवर्षांत ईशान्येस कोठे तरी असावा. कदाचित् हिमालयाच्या पूर्वभागासच हें नांव असेल. पारियात्र पर्वतापासून नर्मदा, शिप्रा; आणि विंध्याद्रीपासून तापी नदी निघाल्याचें मैत्स्यपुराणांत[3] आहे. सातपुड्यास सांप्रतहि इंजाद्रि असें म्हणतात. शिप्रा नदी तर सांप्रत ज्यास विंध्याद्रि म्हणतात, त्यापासून निघाली आहे. नर्मदाहि त्यापासून निघाली आहे म्हट-

---

* महाभारत, भीष्मपर्व, अ० ९ श्लो० ११.

१. रघु सर्ग ४ ह्यांत रघूच्या दिग्विजयांत कलिंग देशांत महेंद्र पर्वत असल्याचा उल्लेख आहे. श्लोक ३८।३९ पहा. तसेंच, रघु सर्ग ६ श्लोक ५४ पहा.

२. निःशेषविक्षालितधातुनापि । वप्रक्रियामृक्षवतस्तटेषु ॥ रघु, सर्ग ५ श्लो० ४४.

३. अध्याय ११३ वा पहा.

ळें तरी चालेल. तापी ही सातपुड्यापासून निघते; असें म्हणण्यास हरकत नाहीं. तेव्हां सांप्रत ज्यास सातपुडा म्हणतात तो विंध्याद्रि आणि विंध्याद्रि म्हणतात तो पारियात्र असें दिसतें. वराहमिहिरानेंहि पारियात्र पर्वत भारतवर्षांत मध्यभागीं सांगितला आहे. विंध्याद्रि दक्षिणेस आहे एवढ्या वर्णनावरून दक्षिणेस येतांना पहिला पर्वत लागतो त्यास विंध्याद्रि असें म्हणण्याची एकदां रूढि पडली ती पडली असें दिसतें. हल्लीं ज्यास विंध्याद्रि म्हणतात, तोच पुराणादिकांतला विंध्याद्रि असला तरी अमरकंटक पर्वत व विंध्याद्रीचा पूर्वभाग यांस पूर्वीं पारियात्र म्हणत असतील. या प्रदेशाच्या सुमारासच पारियात्र पर्वताचें स्थान यांत कांहीं संशय नाहीं. कदाचित् सातपुड्यासहि पूर्वीं विंध्याद्रि म्हणत असतील. मलय हा हिंदुस्थानच्या अगदीं दक्षिण भागांतला पर्वत होय. हा दक्षिणेकडे असल्याचें वर्णन अनेक स्थळीं येतें. सीताशुद्धीस गेलेले वानर परत आले तेव्हां रामास म्हणतातः—

(महाभारत, वनपर्व, अ० २८२.)

निर्याय तस्मादुद्देशात् पश्यामो लवणांभसः ।
समीपे सह्यमलयौ दर्दुरं च महागिरिं ॥ ४२ ॥

रघूच्या ४ थ्या सर्गांत कालिदासानें केलेल्या वर्णनावरूनहि ( श्लो० ५०।५१।५२ पहा. ) मलय पर्वत दक्षिणेस समुद्रापर्यंत होता असें दिसतें. सह्य, मलयापासून किंचित् दूर होता तो उल्लंघून रघु पश्चिमेस गेला असें वर्णन आहे. तेराव्या सर्गांत राम सीतेस म्हणतोः

वैदेहि पश्यामलयाद्विभक्तं मत्सेतुना फेनिलमंबुराशिम् ॥

श्लोक २.

माझ्या सेतूनें दोन भाग झालेला असा मलयापर्यंत पसरलेला हा समुद्र पहा.

यावरून मलय हा समुद्रापर्यंत गेलेला होता. पश्चिमेकडून व पूर्वेकडून पर्वतांच्या रांगा, हिंदुस्थानच्या दक्षिण टोंकापर्यंत जातात. त्यांतून पूर्वेकडची, तो मलय असें दिसतें. किंवा अगदीं दक्षिणचे जे पर्वत त्यांसहि सामान्यतः मलय पर्वत म्हणत असें दिसतें.

या मोठ्या पर्वतांखेरीज दुसरे लहान लहान पर्वत व पर्वतांच्या शाखा शेंकडों असल्याचें लिहिलें आहे.*

नद्या—वरील पर्वतांतून निघालेल्या नद्या मत्स्यपुराण अध्याय ११३ यांत खालीं लिहिल्याप्रमाणें सांगितल्या आहेत.

महेंद्रापासून—ऋषिकुल्या, त्रिभागा, इक्षु, त्रिदिवा, अचला, ताम्रपर्णी, मूली, शरवा, विमला इत्यादि.

मलय—कृतमाला, ताम्रा, पुष्पजा, उत्पलावती इ०.

सह्य—गोदावरी, भीमरथी, कृष्णवेणी, वेण्या, कृष्णा, मंजुला, तुंगभद्रा, सुप्रयोगा, वाह्या, कावेरी इत्यादि.

शुक्तिमान्—काशिका, सुकुमारी, मदंगा, मंदवाहिनी, कृपा, पाशिनी इत्यादि.

---

* भीष्मपर्व अ० ९—महेंद्रो मलयः सह्यः शुक्तिमानृक्षवानपि । विंध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वताः ॥११॥ तेषां सहस्रशो राजन् पर्वतास्ते समीपतः । अविज्ञाताः सारवंतो विपुलाश्चित्रसानवः ॥१२॥

ऋष्यवान्—मंदाकिनी, दशार्णा, चित्रकूटा, तमसा, पिप्पली, श्येनी, चित्रोपला, विमला, चंचला, धूतवाहिनी, शुक्तिमती, शुनी, लज्जावती, मुकुटा, ऱ्हादिका इ०.

विंध्य—तपती, तापी, पयोष्णी, निर्विंध्या, क्षिप्रा, ऋषभा, वेणा, वैतरणी, विश्वमाला, कुमुद्वती, करतोया, महागौरी, दुर्गमा, शीला इत्यादि.

पारियात्र—वेदस्मृता, वेत्रवती, वृत्रघ्नी, पर्णाशा, नर्मदा, कावेरी, महती, पारा, धन्वती, रूपा, विदिशा, वेणुमती, शिप्रा, अवंती, कुंती इ०.

हिमालय—भागीरथी, सिंधु, सरस्वती ( भोगावती ), शतद्रु, चंद्रभागा, यमुना, सरयू, इरावती ( ऐरावती ), वितस्ता, विशाला, देविका, कुहू, गोमती, धूतपापा, बाहुदा, दृषद्वती, तृतीया, कौशिकी, निश्चला, गंडकी, इक्षु ( इक्षुदा ), लोहिता (लोहितारणी), कृतमाला इ०.

भारत भीष्मपर्व अध्याय ९ यांत १७९ नद्यांचीं नांवें आलीं आहेत. त्यांत दिशाक्रम वगैरे कांहीं नाहीं. त्यांचीं नांवें वर्णानुक्रमें दिलीं असतां पाहण्यास सोपें पडेल म्हणून तीं तशीं पुढें देतों.

| | | |
|---|---|---|
| अंगना | अंबुवाहिनी | इक्षुला |
| अगारवाहिका | अवटोदा | उपेंद्रा |
| अच्छोदका | अश्ववती | ऋषिकुल्या |
| अच्छोदा | असिक्नी | ओघवती |
| अधृष्या | अहिता | कंपना |
| अनंगा | आत्रेयी | कपिंजला |
| अनुष्णा | इरावती | कपिला |

| | | |
|---|---|---|
| करतोया | गोमती | धूतपापा |
| करीषिणी | गौरी | धृतवती |
| करीषिणी | घृतवती | नर्मदा |
| कल्पाषा | चंद्रभागा | निचिता |
| कापी | चंद्रमा | निम्नगा ४ |
| कालमही | चर्मण्वती | निवारा |
| काली | चित्तरथा | नीला |
| कावेरी | चित्तवाहा | पयोष्णी |
| कुटिला | चित्राशिला | पयोष्णी |
| कुंडली | चित्रसेना | पवित्रा |
| कुड्मला | चित्तोपला | पर्णाशा |
| कुमारी | चुलुका | पाटला |
| कुवीरा | जांबूनदी | पापहरा |
| कुशचीरा | जेष्टिला | पाशाशिनी |
| कुशधारा | ज्योतिरथा | पिच्छिला |
| कुल्या | तमसा | पिंजला |
| कृमी | ताम्रा | पुरमालिनी |
| कृष्णवेणा २ | तुंगवेणा | पुरावती |
| कृष्णा | त्रिदिवा २ | पूर्वाभिरामा |
| कोषा | त्रिशिला | प्रवरा |
| कौशिकी २ | दासी | बहुला |
| खलु | दिशू | बाहुदा २ |
| गंगा | दुर्गा २ | बृहद्वती |
| गिरिकर्णिका | दृषद्वती | बृहध्वनी |
| गोदावरी | देविका | ब्रह्मवेद्या |

ब्रह्ममेध्या
ब्राह्मणी
भारद्वाजी
भीमरथी
भीमा
मकरी
मंजुला
मंदगा
मंदवाहिनी
मंदाकिनी २
महागौरी
महानदी
महापगा
महेंद्रा
मानवी
मारिषा
मेना
यमुना
यवक्षा
रथचित्रा
रहस्या
राजनी
रोही
लोहितारणी
लोहित्या

वंदना
वरा
वराणसी
वसामन्या
वस्त्रा
वाणी
वाहिनी
वितस्ता
विदिशा
विनदी
विपापा
विपाशा
विपुला
विश्वामित्रा
वीरकरा
वीरवती
वीरा
वृषकाव्हया
वृषभा
वृषसाव्हया
वेणा २
वेत्रवती २
वेदवती
वेदस्मृता
वेदाश्वा

वैतरणी
शतकुंभा
शतद्रु
शतबला
शरावती
शीघ्रा
शुक्तिमती २
शैब्या
शोणा
सदाकांता
सदानिरामया
सदानीरा
सरयू
सरस्वती २
सिंधु २
सुनसा
सुपुण्या
सुप्रयोगा
सुवस्त्रा
सुवामा
स्थूलवालुका
हरिश्रावा
हस्तिसोमा
हिरण्वती
हेमा

भीष्मपर्वाच्या ९ व्या अध्यायांत* सुमारें सवादोनशांहून जास्त देशांचीं नांवें आलीं आहेत. त्यांतहि दिशाक्रम नाहीं म्हटलें तरी चालेल. एक ठिकाणीं आतां यापुढें दक्षिण दिशेचे देश असें म्हटलें आहे. परंतु शेवटीं दूरदूरचे देश सांगितले आहेत ते दक्षिणचेच असें सांगण्याचा हेतु दिसत नाहीं. म्हणून ते सर्वच खालीं एकत्र देतों. वर्णानुक्रमानें लिहिलें असतां निर्णयार्थ पाहण्यास सोपें पडेल म्हणून वर्णक्रमपूर्वक लिहितों.

**भारत भीष्मपर्व अध्याय ९ यांत सांगितलेले देश**

| | | |
|---|---|---|
| अंग | अभीसार | उत्तर |
| अंग | अयवाह | उपत्यक |
| अटवीशिखर | अवंतयः | उपावृत्त |
| अठिद् | अश्मक | उलूत |
| अंतचार | आत्रेय | ऋषिक |
| अंतर्गिरि | आंध्र | औंड्र |
| अधिराज्यकुशाद्यः | आनर्ताः [नैर्ऋता] | कक्ष |
| अनुपावृत्त | आभीर | कच्छ |
| अपर तंगण | ईजिक | कन्यकागुण |
| अपर बल्लव | उत्कल | करक |
| अपर म्लेंच्छ | उत्सवसंकेताः | करट |
| अपरांत | उत्तम | करभंजक |

* हे मूळश्लोक शेवटीं परिशिष्टांत दिले आहेत. तसेंच सभापर्वांतलि दिग्विजयाचें वर्णन, कर्णदिग्विजय, अश्वमेधपर्वांत आलेले देश, धौम्यानें सांगितलेलीं तीर्थें, ह्या सर्वांचे मूळचे श्लोक आणि बृहत्संहितेंतील देशवर्णन हें सर्व परिशिष्टांत दिलें आहे.

करीतयः
करीषक
करूष
कर्णाटक
कलिंग
कलिंग
काक
कांतिकोसल
कांबोज
कालतोयक
कालद
काशयः
काश्मीर
काश्मीर
किरात
किरात
कुकर
कुकुरांगार
कुंडल
कुंतल
कुंतल
कुंतयः
कुंतयः
अपर कुंतयः
कुलिंद

कुलिंद
कुंदापरांताः
कुरुपांचाल
कुरुवर्णक
कुलत्थ
कुश
कुशल्य
केकय
केरलाः प्राच्याः
कोसल
कोसल
कोक्कुटक
कोंकणाः
कोकशकाः
क्रूर
खाशीर
गांधार
गोध
गोपराष्ट्र
गोपालकक्ष
गोमंत
घटसृंजय
चक्र
चक्रातयः
चर्ममंडल

चीन
चेदिमत्स्य
चोल
जठर
जांगल
जांगल
झिल्लिक
तनय
तंगण
अपर तंगण
त्सवसंकेताः
ताम्रलिप्तक
ताल
तिलभार
त्रिगर्त
तीरग्रह
दशार्ण
दशार्ण
दार्वीचरा
दशापार्श्वरोमाणः
दुर्गाल
द्रविड
धुरंधर
ध्वजिन्यु
निषध

| | | |
|---|---|---|
| निषाद | बाल्हिक | माहेय |
| नैकपृष्ठ | बोध | मूषक |
| पंचाल | भार्गव | मूषक |
| पंचाल | भोज | मेकल |
| पल्हव | भरद्वाज | मेरुभूत |
| पारसिक | भर्ग | म्लेंच्छ |
| परांत | भूषिक | यक्रुल्लोमानः |
| पाशिवाट | मत्स्य | यवन |
| पांड्रराष्ट्र | मगध | यामुन |
| पार्वतीय | मगध | रूपवाहिक |
| पुंड्र | मंदक | रमणाश्रीनाः |
| पुलिंद | मद्र | वंग |
| पुलिंदाः | मधुमंतः | वध्र |
| पुलिंदकाः | मलज | वनवासिक |
| प्रतिमत्स्य | मल्ल | वल्कल |
| प्रल्हाद | मल्लराष्ट्र | वनायु |
| प्रावृषेय | मसीर | वाटधान |
| प्रोषक | महिषक | वातजामरथोरगाः |
| प्रौष्ठ | माद्रेय | वारवास्य |
| बर्बर | मानवर्जकाः | विकल्प |
| बहुवाद्याः | मारिष | विजय |
| बल्लव | माल | विदभा |
| बहिर्गिर्य | मालवानराः | विदर्भ |
| बहवः | मालवाः | विदेह |
| बाल्हिक | माहिक | विंध्यचुलिक |

| | | |
|---|---|---|
| वैदेह | सनीप | सुदृष्ट |
| व्यूक | समंगाः | सुदेष्ण |
| शक | समवेगवशाः | सुनय |
| शक | समंतर | सौशल्य |
| शशिक | सकृद्ग्रह | सैसिरिंध्राः |
| शाल्व | सामुद्रनिष्कुट | सौहृदानभकाननाः |
| शाल्वसेनयः | सिद्ध | स्तनबालाः |
| शूरसेन | सिंधु ( पुलिंदकाः ) | स्तनपोषकाः |
| शूरसेन | सिंधुसौवीर | स्वराष्ट्र |
| शैवल | सुकंदक | स्वक्षामलजाः |
| संड | सुदामातः-सुमाल्लिका हूण | |

सभापर्वात दिग्विजयाच्या संबंधें पुष्कळ देश आले आहेत. ते अर्जुनादिकांस जसजसे लागले तशा क्रमानें सांगितले असतां पुष्कळ उपयोग होईल म्हणून ते तशा क्रमानें सांगतों.

अर्जुन इंद्रप्रस्थाहून निघाला तो उत्तरेस गेला. त्यानें प्रथम **कुंलिंद** देशांतील राजे जिंकिले. **आनर्त**, **कालकूट**, **कुलिंद** हे देश जिंकून सुमंडल राजासह **शाकलद्वीपास** आला. प्रतिविंध्य राजा जिंकिला. शाकलद्वीपांत राहणारे सप्तद्वीपांतले राजे, त्यांबरोबर याचें युद्ध झालें. त्यांस जिंकून त्यांसह **प्राग्ज्योतिष** देशास गेला. तेथे भगदत्त नामक बलाढ्य राजा होता. **किरात**, **चीन**, **सागरानूप**, इत्यादि देशचे योद्धे

* देशाचें नांव तेंच त्यांतील लोकांस किंवा लोकांचे देशास लाविलेलें असें संस्कृतांत पुष्कळ ठिकाणीं असतें हें सांगावयास नको.

त्यास सहाय होते. तरी सर्वांस जिंकून तेथून अर्जुन उत्तरेस गेला. **अंतर्गिरि, बहिर्गिरि, उपगिरि** या पर्वतांतील राजे जिंकून **उलूक** देशास गेला. तेथील **बृहंत** राजास जिंकून त्यासह पुढें जाऊन **सेनाबिंदु** राजा जिंकिला. पुढें **मोदापूर** जिंकून **उत्तर उलूक** देश जिंकिला. तेथून **पंचगण** देश जिंकला. तेथून **सेनाबिंदूचें** नगर **देवप्रस्थ** एथे आला. तेथून **पौरवविष्वगश्व** राजा याच्या नगरास जाऊन पर्वतवासी योद्धे यांचा पराभव करून तें नगर घेतलें. पुढें पर्वतवासी दस्यु जिंकून नंतर **उत्सवसंकेत** नामक सात गण जिंकले. नंतर **काश्मीरचे** क्षत्रिय वीर व दहा मांडलिक राजांसह **लोहित** राजा यांचा पराभव केला. नंतर **त्रिगर्त, दार्व, कोकनद** इत्यादि पुष्कळ क्षत्रिय त्यास शरण आले. नंतर **अभिसारी** नगरी व उरगावासी रोचमान राजा जिंकला. मग **सिंहपूर** घेतलें. पुढें **सुम्ह, चोल** हे देश घेतले. पुढें **बाल्हीक** जिंकले. नंतर **कांबोजांसह दरद** जिंकले. पुढें ईशान्य दिशेस राहणार दस्यु व दुसरे अरण्यवासी लोक हे जिंकले. पुढें **लोह, परम कांबोज, उत्तर ऋषिक** हे जिंकले. ऋषिकांमध्यें मोठे युद्ध झालें. ऋषिकांस जिंकून शुकोदरवर्णाचे आठ घोडे व दुसरे मयूरसदृश अनेक घोडे आणिले. पुढें **निष्कुटासह हिमवान्** जिंकिला. पुढें **श्वेतपर्वतावर** आला. व तो उल्लंघून **किंपुरुष** देशास गेला. तो जिंकून **हाटक** देश गुह्यकांचा जिंकला. पुढें **मानसरोवर, ऋषिकुल्या** नदी हीं पाहिलीं. व हाटकासमीपचा **गंधर्वरक्षित** देश जिंकला. त्यांपासून तित्तिरिपक्ष्यासारखे चित्रविचित्र **मंडूक** नामक घोडे घे-

तले. पुढें उत्तरहरिवर्षास प्राप्त झाला. तेव्हां मोठे बलवान् भव्य द्वारपाल येऊन सांगते झाले कीं हे **उत्तर कुरु** देश होत. मनुष्यदेहानें यांत प्रवेश होणार नाहीं. तेव्हां त्यांपासून दिव्य वस्त्राभरणादि घेऊन अर्जुन परत इंद्रप्रस्थास आला.

**भीम** पूर्वेस निघाला तो प्रथम **पंचालांच्या** नगरास आला. त्यांचें अनेक उपायांनीं सांत्वन करून पुढें **गंडक, विदेह** आणि **दशार्ण** जिंकले. नंतर पूर्वेस गेला. अश्वमेधेश्वर **रोचमान** यास जिंकून पूर्वदेश जिंकला. नंतर दक्षिणेस वळून **पुलिंद** नगरास येऊन **सुकुमार** आणि **सुमित्र** यांस जिंकलें. नंतर **चेदि** देशांत गेला. तेथील राजा **शिशुपाल** यानें ह्याचा फार आदर केला. ( हे परस्पर माऊस भाऊ होते ). तेरा दिवस तेथे राहून पुढें **कुमार** देशामध्यें श्रेणिमंत राजास जिंकलें. पुढें **कोसलाधिपति बृहद्बल** यास अयोध्येंत जिंकलें. पुढें **गोपालकक्ष, उत्तरकोसल** हे जिंकले. पुढें **मल्लाधिप पार्थिव** यास जिंकलें. पुढें **हिमवान्** पर्वताच्या पार्श्वभागीं येऊन सर्व जलोद्भव देश जिंकला. पुढें **भल्लाट** देश जिंकून **शुक्तिमान्** पर्वत जिंकला. पुढें काशिराज **सुबाहु** जिंकला. पुढें **सुपार्श्वदेशाधिपति क्रथ** जिंकला. पुढें **मत्स्य, मलद** हे घेऊन सर्व पशुभूमि घेतली. मागें परतून मदधार राजा जिंकला. **सोमधेय** जिंकून उत्तरेस वळला. **वत्सभूमि** घेतली. **भर्गांचे** अधिपति, निषादांचे अधिपति **मणिमत्प्रमुख** राजे जिंकले. **नंतर दक्षिणमल्ल, भोगवान्**पर्वत, **शर्मक, वर्मक,** हे जिंकले. नंतर **वैदेहराजा जनक** यास जिंकलें. शाक, बर्बर, हे

जिंकले. वैदेहांत असतांच इंद्रपर्वतासमीपचे सात किरात राजे जिंकले. नंतर **सुह्म**, **प्रसुह्म** घेतले. मग **मगध** देशास गेला. दंड, दंडधार यांस जिंकून त्यांसह **गिरिव्रजास** गेला. जरासंधपुत्राचें सांत्वन केलें. त्या सर्वांसह **कर्णाकडे** गेला. त्यास जिंकून पर्वतवासी राजे जिंकले. पुढें **मोदागिरि** एथील राजास मारिलें. पुढें **पुंड्राधिपति वासुदेव** आणि **कौशिकी**नदीसमीपच्या पाणथळ देशांतील राजा या दोघांस जिंकून **वंग** देशास गेला. **समुद्रसेन**, **चंद्रसेन** यांस जिंकून **ताम्रलिप्त** राजा आणि **कर्वटा**धिपति हे जिंकले. पुढें **सुह्माधिपति** व सागरवासी राजे म्लेच्छगण सर्व जिंकले. याप्रमाणें पुष्कळ देश जिंकून त्यांपासून द्रव्य घेऊन **लौहित्य** देशास गेला. तेथील राजानें सागरानूपवासी सर्व म्लेच्छ राजे यांपासून कर देवविला. याप्रमाणें अपार संपत्ति घेऊन भीम इंद्रप्रस्थास आला.

सहदेव दक्षिणेस गेला. त्यानें प्रथम **शूरसेन** नंतर **मत्स्य** हे देश जिंकले. नंतर अधिराज देशाचा राजा **दंतवक्त्र** जिंकला. पुढें *सुकुमार आणि सुमित्र यांस जिंकलें. नंतर **अपरमत्स्य**, आणि **पटच्चर** हे देश जिंकले. नंतर निषादभूमि, गोशृंग, पर्वतप्रवर हीं जिंकून श्रेणिमान् राजा जिंकला. नंतर **नरराष्ट्र** जिंकून **कुंतिभोज**[१] राजाकडे गेला. त्यानें त्यास प्रीतिपूर्वक कर-

---

* भीमदिग्विजयांत हें आलें आहे. सुकुमारं वशे चक्रे सुमित्रं च नराधिपं । हेंच श्लोकार्ध दोन्ही स्थलीं आहे.

१. हा कुंतीचा पिता. यास कुंती ही यदुकुलोत्पन्न शूर नामक राजानें दत्तक दिली.

भार दिला. नंतर चर्मण्वतीतीरीं जंभकासुराचा पुत्र कृष्णाचा वैरी यानें याशीं युद्ध केलें. त्यास जिंकून सहदेव दक्षिणेस वळला. सेक, अपरसेक जिंकून नर्मदेकडे निघाला. अवंतीचे विंद आणि अनुविंद हे जिंकले. पुढें भोजकट नगरास आला. तेथील राजा भीष्मक यास जिंकलें. पुढें कोसलाधिपति, वेणातटाधिपति हे जिंकलें. पुढें कांतारक, प्राकोटक, नाटकेय, हेरंबक यांस जिंकलें. मारुध जिंकला. रम्यग्राम जिंकला. नंतर नाचीन, अर्बुक इत्यादि अरण्यवासी राजे जिंकले. वाताधिपति जिंकला. पुलिंदास जिंकून दक्षिणेस गेला. पांड्य राजाबरोबर युद्ध केलें. त्यास जिंकून दक्षिणापथास गेला. किष्किंधा नामक प्रसिद्ध गुहेंत मैंद, द्विविद या वानर राजांबरोबर सात दिवस युद्ध झालें. त्यांनीं संतोषानें करभार दिला. तो घेऊन माहिष्मतीस गेला. तेथील राजा नील यास अग्नि सहाय होता. त्याची स्तुति केल्यावर तो शमला. त्यानें नील राजाकडून करभार देवविला तो घेऊन सहदेव दक्षिणेस गेला. त्रैपुर, पौरवेश्वर, कौशिकाचार्य यांस जिंकलें. नंतर सुराष्ट्र देशास गेला. राजास जिंकलें. सुराष्ट्रामध्यें असतांच भोजकट एथे राहत असलेला रुक्मि भीष्म यास निरोप पाठविला. तो प्रीतिपूर्वक आला. व वासुदेवाचें दर्शन घेऊन कर दिला. नंतर सहदेव शूर्पारिक व तालीकट हीं घेऊन दंडक देशहि घेता झाला. सागरांतील द्वीपांत राहणारे म्लेच्छ लोक, तसेंच निषाद, पुरुषाद, कर्णप्रावरणक, कालमुख हे लोक जिंकले. नंतर कोलगिरी, सुरभिपट्टण, ताम्र नामक द्वी-

प, रामक पर्वत हीं स्थानें घेतलीं. तिमिंगल राजा जिंकला. एकपाद पुरुष, केरलदेश, संजयंती नगरी, पाषंड, करहाटक, हीं दूतद्वाराच वश करून कर घेतला. पांड्य, द्रविड, उड्र, केरल, अंध्र, तालवन, कलिंग, उष्ट्र, कर्णिक, आटवीपुरी, यवनांचें पुर हीं दूतद्वाराच वश करून कर घेतला. नंतर कच्छ ( जलप्राय देश ) एथे जाऊन बिभीषणाकडे दूत पाठविले. त्यानें कर दिला. याप्रमाणें अनेक देश जिंकून कर घेऊन इंद्रप्रस्थास परत आला.

नकुल खांडवप्रस्थ ( इंद्रप्रस्थ ) एथून पश्चिमेस निघाला. तो धनधान्ययुक्त असें कार्तिकेयाचें प्रियस्थान रोहीतक एथे गेला. तेथील मत्तमयूरक यांस जिंकलें. मरुभूमि आणि बहुधान्ययुक्त शैरीषक महेत्थ जिंकले. आक्रोश राजर्षीबरोबर मोठें युद्ध झालें. मग तो दशार्ण देश घेऊन निघाला. शिबि, त्रिगर्त, अंबष्ट, मालव, पंचकर्पट, मध्यमकेय हे देश जिंकले. वाटधान एथील द्विज जिंकले. पुन्हां मागें वळून पुष्करारण्यांत राहणारे उत्सवसंकेत नामक गण जिंकले. सिंधुतीरीं राहणारे ग्रामणीय, शूद्र, आभीर, तसेंच सरस्वतीतीरीं राहणारे, तसेंच पर्वतवासी लोक जिंकले. संपूर्ण पंचनंद तसेंच अमर पर्वत, उत्तरज्योतिष, दिव्यकटपुर हे वश केले. रामठ, हारहूण, तसेच दुसरे पश्चिमचे राजे सर्व जिंकले. तेथून कृष्णास निरोप पाठविला. त्यानें कर पाठविला. नंतर मद्रांचें नगर शाकल एथे येऊन मातुल शल्य यापासून प्रीतीनेंच कर घेतला. नंतर सागरकुक्षींत राहणारे म्लेच्छ, पल्हव, बर्बर, किरात, य-

वन, शक, हे जिंकले. आणि अपार संपत्ति घेऊन परत आला.*

* हे प्रत्येक दिशेचे देश वर्णक्रमानें सांगतों.

## महाभारतांत पांडवांच्या दिग्विजयांत आलेले निरनिराळ्या दिशेचे देश वर्णक्रमानें

### उत्तर ( अर्जुनदिग्विजय )

| | | |
|---|---|---|
| अंतर्गिरि | कुलिंद | मानस |
| अभिसारी नगरी | कोकनद | मोदापुर |
| आनर्त | चीन | लोह |
| उत्सवसंकेत | चोल | लोहित |
| उपगिरि | त्रिगर्त | शाकल द्वीप |
| उलूक | दरद | श्वेतपर्वत |
| ऋषिक | दार्व | सागरानूप |
| कांबोज | देवप्रस्थपुर | सिंहपुर |
| परम कांबोज | पंचगण | सुदामन |
| कालकूट | प्रतिविंध्य पर्वत | सुसंकुल |
| काश्मीर | प्राग्ज्योतिष | सुह्म |
| किरात | बहिर्गिरि | हरिवर्ष |
| कुरु ( उत्तर ) | बाल्हीक | हाटक |

### पूर्व ( भीमदिग्विजय )

| | | |
|---|---|---|
| अयोध्या | गिरिव्रज | मर्ग |
| इंद्रपर्वत | गोपालकक्ष | भल्लाट |
| कर्वट | चेदि | भोगवान्पर्वत |
| काशि | ताम्रलिप्त ( नृप ) | मत्स्य |
| किरात | दशार्ण | मल्ल |
| कुमार | निषाद | दक्षिणमल्ल |
| कोसल | पंचाल | मलद |
| उत्तरकोसल | पुंड्र | मागध |
| कौशिकीकच्छ | पुलिंद | मोदागिरि |
| गंडक | बर्बर | लोहित्य |

आतां वनपर्वांत (अध्याय २९४) कर्णदिग्विजयाचें वर्णन आहे. त्यांत आलेले देश सांगतों. कर्ण प्रथम द्रुपदाच्या नगरास गेला. त्यास व त्याचे अनुग दुसरे राजे यांस जिंकून उत्तरेस गेला. भगदत्तास जिंकून हिमवान् पर्वतावर गेला. तेथील लोक जिंकून नेपाल देशांतील राजे जिंकले. नंतर पर्वतावरून उतरून पूर्वेस

---

( मागील पृष्ठावरून )

| | | |
|---|---|---|
| वंग | वैदेह | सागरानूप |
| वत्सभूमि | शक | सुह्म |
| वर्मक | शर्मक | प्रसुह्म |
| विदेह | शुक्तिमान्पर्वत | सुह्म |

## दक्षिण (सहदेवदिग्विजय)

| | | |
|---|---|---|
| आधिराज | ताम्रद्वीप | भोजकट |
| अर्बुक | तालवन | मत्स्य |
| अंध्र | तालीकट | अपरमत्स्य |
| आटवीपुरी | तिमिंगल | माहिष्मती |
| आवंत्य | दंडक | रम्यग्राम |
| उष्ट्रकर्णिक | द्रविड | रामकपर्वत |
| ओड्रकेरल | नरराष्ट्र | वाताधिप |
| कच्छ | नर्मदा | वेणातट |
| करहाटक | नाचीन | शूरसेन |
| कलिंग | नाटकेय | शूर्परिक |
| कांतारक | निषाद | संजयंतीपुरी |
| किष्किंधा | निषादभूमि | सुरभीपट्टन |
| कुंतिभोज | पटच्चर | सुराष्ट्र |
| केरल | [ चोरदेश ] | सेक |
| कोलगिरि | पांड्य | अपरसेक |
| कोसल | पाषंड | ह्लेंब |
| गोशृंग | पुलिंद | |
| चर्मण्वती | प्राकोटक | |

गेला. अंग, वंग, कलिंग, शुंडिक, **मिथिल**,**मागध**, **कर्कखंड** हे देश जिंकले. **आवशीर** नामक योद्धे जिंकले. **अहिक्षत्र** घेतलें. पूर्वदिशा जिंकून **वत्सभूमीस** गेला. ती जिंकून **मृत्तिकावती**, **मोहनपत्तन**, **त्रिपुटी**, **कोसला** हीं स्थानें घेतलीं. दक्षिणेस वळला. रुक्मीबरोबर युद्ध केलें. **पांड्य** देशास गेला. **केरल** घेतला. **नील** राजा **वेणुदारिसुत** व दुसरे सर्व दक्षिणचे राजे जिंकून कर घेतला. **शिशुपालपुत्र** जिंकला. बाजूचे राजे जिंकले. आवंत्य राजे जिंकले. वृष्णींशीं युद्ध केलें. पश्चिमचे यवन बर्बर हेहि जिंकले. **भद्र**, **रोहितक**, **मालव**, **शक** इत्यादि जिंकले. **नग्नजित्** प्रमुख गण जिंकले.याप्रमाणें सर्व दिशा जिंकून हस्तिनापुरास परत आला.

अश्वमेधपर्वांत कांहीं देश आले आहेत ते आतां सांगतों. घोड्याच्या इच्छेस येईल तिकडे तो जात असे. त्याबरोबर अर्जुन रक्षण करण्यास होता. प्रथम **त्रिगर्त** देशास गेला. पुढें **प्राग्ज्योतिष** देशांत भगदत्तपु-

---

( मागील पृष्ठावरून )

**पश्चिम** ( नकुलदिग्विजय )

| | | |
|---|---|---|
| अंबष्ठ | पंचनद | रामठ |
| अमरपर्वत | पल्हव | रोहितकगिरि |
| आभीर | पुष्करारण्य | वाटधान |
| उत्तरज्योतिष | बर्बर | शक |
| उत्सवसंकेत | मद्र | शाकल |
| किरात | मध्यमकेय | शिबि |
| त्रिगर्त | मरुभूमि | शैरीषक |
| दशार्ण | महेत्थ | सरस्वती |
| दिव्यकटपुर | मालव | सिंधुकुल |
| पंचकर्पट | यवन | हारहूण |

त्राशीं युद्ध झालें. पुढें **सैंधव** देशांत जयद्रथपुत्राशीं युद्ध झालें. पुढें घोडा फिरत फिरत **मणिपुरास** आला. तेथें बभ्रुवाहनाशीं युद्ध झालें. पुढें समुद्रापर्यंत देश फिरून अश्व परतला. तो **राजगृहास** आला. तेथे मगधेश्वराशीं युद्ध झालें. तेथून समुद्रतीरानें **वंग, पुंड्र, कोसल** या देशांत फिरला. पुढें दक्षिणेस वळला. कांहीं देश फिरून मागें परतून **चेदि** देशाची राजधानी **शुक्तिसा** एथे आला. पुढें **काशी, अंग, कोसल, किरात, तंगण,** ह्या देशांत फिरला. मग मागें फिरून **दशार्ण** देशास गेला. पुढें निषादाधिप एकलव्य याच्या नगरास गेला. पुढें दक्षिणसमुद्राकडे वळला. **द्रविड, आंध्र, रौद्र, माहिषक, कोलागिरि**वासी या लोकांबरोबर युद्ध झालें. पुढें **सुराष्ट्र** देशास गेला. **गोकर्ण, प्रभास, द्वारका,** या स्थलांस गेला. नंतर पश्चिमसमुद्रकांठचे देश फिरत **पंचनद** देशास आला. पुढें **गंधार** देशास गेला. तेथे शकुनिपुत्राबरोबर युद्ध झालें. नंतर हस्तिनापुरास परत आला.*

विष्णुपुराणांत थोडकेच देश आले आहेत. त्यांचीं नांवें:—कुरु, पांचाल, कामरूप, पुंड्र, कलिंग, मगध, सौराष्ट्र, शूर, आभीर, अर्बुद, कारूष, मालव, सौवीर, सैंधव, हूण, शाल्व, शाकल, मद्र, राम, अंबष्ट, पारसीक.

वराहमिहिरकृत बृहत्संहितेंत भारतवर्षांतील देश

* जैमिनि अश्वमेधांतलें वर्णन निराळें आहे. त्यांतील क्रम निराळा आहे. परंतु त्यांतहि पुष्कळ देशांची नांवें आलीं आहेत असें नाहीं. व आलीं आहेत त्यांपासूनहि जास्त उपयोग होईल असें नाहीं म्हणून तीं दिलीं नाहींत.

सांगितले आहेत. त्यांत मध्यभाग व आठ दिशा याप्रमाणें नऊ भाग आहेत. देशांचीं नांवें आलीं आहेत तीं एकाचें झाल्यावर त्याच्या पलीकडच्याचें अशीं नाहींत म्हणून तीं खालीं प्रत्येक भागांतलीं वर्णक्रमपूर्वक दिलीं आहेत.

## बृहत्संहितेंत सांगितलेले निरनिराळ्या दिशांचे देश वर्णक्रमपूर्वक

### मध्य

| | | |
|---|---|---|
| अरिमेद | कालकोटि | मांडव्य |
| अश्वत्थ | गजाव्हय | माथुरक |
| उज्जिहान | गौरग्रीव | माध्यमिक |
| उद्देहिक | धर्मारण्य | मरु |
| उपज्योतिष | नीप | यामुन |
| औदुंबर | पांचाल | वत्सघोष |
| कंक | पांडुगुड | शूरसेन |
| कुकुर | पारियात्रनग | साकेत |
| कपिष्ठल | भद्र | सारस्वत |
| कुरु | मत्स्य | साल्वनीप |

### पूर्व

| | | |
|---|---|---|
| अश्ववदन | एकपद | चांद्रपुर |
| अंजन | कर्वट | ताम्रलिप्तिक |
| अंबष्ठ | काशि | दंतुरक |
| उड्र | कोशलक | पद्म |
| उदयगिरि | खस | पुरुषाद |
| उत्कल | गौडक | पौंड्र |

| | | |
|---|---|---|
| प्राग्ज्योतिष | मेकल | शबरगिरि |
| भद्र | लौहित्य | शूर्पकर्ण |
| मगध | वर्धमान | समतट |
| माल्यवत् | वृषभध्वज | सुह्म |
| मिथिल | व्याघ्रमुख | क्षीरोदसमुद्र |

## आग्नेयी

| | | |
|---|---|---|
| आंध्र | जठरांग | वंग |
| उपवंग | त्रिपुरी | विदर्भ |
| ऊंर्ध्वकंठ | दाशार्ण | विंध्यरासि |
| कलिंग | नग्नपर्ण | वृष |
| किष्किंध | नालिकेर | व्यालग्रीव |
| कंकटस्थल | निषादराष्ट्र | शबर |
| कोशल | पुरिक | शौलिक |
| चर्मद्वीप | महाग्रीव | श्मश्रुधर |
| चेदि | वत्स | हेमकूट्य |

## दक्षिण

| | | |
|---|---|---|
| अत्रि | कर्णाट | कोल्लगिरि |
| आकर | कांची | कौंकण |
| आभीर | कार्मणेयक | क्रौंचद्वीप |
| आवंतक | कावेर्य | गणराज्य |
| ऋषभ | कालाजिन | गिरिनगर |
| ऋषिक | कुसुमनग | गोनर्द |
| ऋष्यमूक | कुंजरदरी | चित्रकूट |
| कंकट | कृष्णवेल्लूर | चैयरिक |
| कच्छ | केरल | चोल |

| | | |
|---|---|---|
| जराधर | नासिक्य | लंका |
| टंकण | पिशिक | वनवासि |
| तापसाश्रम | फणिकार | वारिचर |
| ताम्रपर्णी | बलदेवपत्तन | वेण |
| ताळिकट | भरुकच्छ | वेडूर्यशंखमुक्ता |
| तिमिंगिळाशन | मरुचीपत्तन | शिबिक |
| तुंबवन | मळय | शूर्पाद्रि |
| दंडकावन | महारवि | सौरिकीर्ण |
| दर्दुर | महेंद्र | सिंहल |
| दशपुर | मालिंद्य | |
| धर्मपत्तन | याम्योदधि | |

## नैऋती

| | | |
|---|---|---|
| अंबष्ठ | खंड | माकर |
| आवर्त | चंचूक | यवन |
| आभीर | द्रविड | रैवतक |
| आरव | नारीमुख | वडवामुख |
| कपिल | पल्हव | शूद्र |
| कर्णप्रावेय | पारशव | सिंधु |
| कांबोज | फेणागिरि | सिंधु |
| काळक | बर्बर | सुराष्ट्र |
| किरात | बादर | सौवीर |
| क्रव्याश | महार्णव | हेमगिरी |

## पश्चिम

| | | |
|---|---|---|
| अपरांतक | तारक्षितिजूंग | प्रशस्ताद्रि |
| अस्तगिरि | पंचनद | मणिमान् |
| कनक | पारत | मेघवान् |

| | | |
|---|---|---|
| म्लेच्छ (निर्मर्याद)वैश्य | | शांतिक |
| रमठ | वोक्काण | हैहय |
| वनौघ | शक | क्षुरार्पण |

## वायव्य

| | | |
|---|---|---|
| अश्मक | मद्रक | वसुमान् |
| एकविलोचन | मरुकुच्च | वाटधान |
| कुलूत | माणहल | वेणुमती |
| खस्थ | मांडल्य | शरधान |
| गुरुहा | मांडव्य | शीतक |
| चर्मरंग | मालव | शूलिक |
| तालहल | मेरु | श्यामक |
| तुखार | यशोवति | स्त्रीराज्य |
| दीर्घग्रीवास्यकेश | यामुन | हिमवान् |
| नृसिंहवन | यौधेय | हूण |
| फल्गु | राजन्य | हेमताल |
| भूतपुर | लहड | क्षुद्रमीन |
| भोगप्रस्थ | लुका | क्षेमधून |
| मद्र | वसाति | |

## उत्तर

| | | |
|---|---|---|
| अंतद्वीपि | कच्छ | कोहल |
| अंबर | कंठधान | क्रौंच |
| आर्जुनायन | कुरु ( उत्तर ) | खचर |
| अश्वमुख | केशधर | गव्य |
| आग्नीध | कैलावत | गांधार |
| आदर्श | कैलास | चिपिट |

| | | |
|---|---|---|
| तक्षशिल | दासमेय | पुष्करावत |
| तुरगानन | दासेरक | पौरव |
| त्रिगर्त | धनुमान् | |
| दंडपिंगलक | नासिक | |

## ऐशानी

| | | |
|---|---|---|
| अनुविश्व | घोष | पशुपाल |
| अभिसार | चीन | पौरव |
| एकचरण | चीर | ब्रह्मपुर |
| काश्मीर | जटासुर | भल्लापलोल |
| किरात | डामर | मुंजाद्रि |
| कीर | तंगण | मेरुक |
| कुचिक | त्रिवेत्र | वनराज्य |
| कुनठ | दरद | वनराष्ट्र |
| कुलून | दार्व | वसुवन |
| कौणिंद | दिविष्ठ | सुवर्णभू |
| खस | नष्टराज्य | सैरिंध |
| गंधर्व | निवसन | |

भारतांत वनपर्वांत तीर्थें, नद्या, क्षेत्रें इत्यादि पवित्रस्थानें अनेक सांगितलीं आहेत. तीं सर्व एथे सांगण्यांत विशेष अर्थ नाहीं. कारण बहुतेक वर्णनांत दिशादिकांचा क्रम बहुधा नाहीं. याजकरितां धौम्यऋषीनें धर्मास चारी दिशांचीं तीर्थें इत्यादि सांगितलीं आहेत तीं व दुसरीं कांहीं पवित्रस्थानें सांगून हें प्रकरण आटोपूं.[1]

१. हें मूळवर्णन अ० ८७, ८८, ८९, ९० यांत आहे. तें पुढें परिशिष्टांत संक्षेपानें दिलें आहे.

पूर्व—या दिशेस नैमिषारण्य आहे. देवर्षींनीं सेवित गोमती नदी आहे. ती देवांची यज्ञभूमि आहे. गयराजर्षीनें सेवित असा गय पर्वत आहे. तेथे ब्रह्मसर आणि अक्षयवट आहे. तसेंच फल्गु नामक पुण्यनदी आहे. आणखी या दिशेस कौशिकी नदी आहे. तीवर विश्वामित्र ब्रह्मत्व पावला. गंगा नदी आहे. पंचाल देशांत उत्पलावन आहे. तेथे विश्वामित्रानें यज्ञ केला. व या कान्यकुब्ज देशांत त्या यज्ञांत इंद्रानें विश्वामित्राबरोबर सोमपान केलें. गंगायमुनासंगमीं प्रयाग नामक प्रख्यात स्थान आहे. ब्रह्मदेवानें एथे याग केला म्हणून यास प्रयाग नांव पडलें. या दिशेस अगस्त्याश्रम आहे. त्यास हिरण्यबिंदु असें नांव आहे. तो कालंजर पर्वतावर आहे. महेंद्र नामक पर्वत भार्गवाचें प्रसिद्ध स्थान आहे. तेथील सरोवरांत भागीरथी आहे. कुंडोद पर्वत आहे. त्या स्थलीं नैषध तृषित झाला असतां उदकप्राशनानें तृप्त झाला. बाहुदा नदी आहे. आणखी नंदा आहे.

दक्षिण—गोदावरी, वेणा, भीमरथी, या नद्या आहेत. नृग राजाच्या संबंधें प्रसिद्ध अशी पयोष्णी नदी आहे. तिजवर वाराह तीर्थ आहे. गंगादि सर्व नद्यां-

---

१. गोमती आणि गंगा यांच्या संगमावर मार्कंडेय तीर्थ सांगितलें आहे. वनपर्व ८४.८०

२. अध्याय ८४यांत गयावर्णनांत, ब्रह्मसर हें धर्मारण्यांत सांगितलें आहे. यावरून धर्मारण्य हें गयेजवळ आहे असें होतें.

३. पूर्वेकडचीं एका पुढें एक स्थळें सांगितलीं आहेत, असें दिसत नाहीं.

हून ही श्रेष्ठ आहे. शूर्पारकामध्यें जामदग्न्याची वेदी आहे. अशोक तीर्थ, अगस्त्यतीर्थ, पांड्य देशांत वारुण तीर्थ, वैदूर्य पर्वत, अगस्त्याश्रम हीं आहेत.

सुराष्ट्रांमध्यें* चमसोद्भेद तीर्थ आहे. समुद्रकांठीं प्रभास तीर्थ आहे. पिंडारक तीर्थ आहे. उज्जयंत पर्वत आहे. तसेंच पुण्यकारक अशी द्वारका आहे.

पश्चिम—मालिनी, पश्चिमवाहिनी नर्मदा, ह्या नद्या आहेत. वैदूर्यशिखर नामक पर्वत आहे. तेथे फुल्लपद्म नामक सरोवर आणि विश्वामित्रा नदी आहे. पुण्यऱ्हद, मैनाक पर्वत, कक्षसेनाश्रम, च्यवनाश्रम; केतुमाला, मेध्या या नद्या, सैंधवारण्य, पुष्कर नामक सरोवर, वैखानसाश्रम इत्यादि पवित्रस्थानें आहेत.

उत्तर—सरस्वती, ऱ्हदिनी, तीर्थमालिनी, यमुना ह्या नद्या; प्लक्षावतरण, अग्निशिर हीं तीर्थें; शरभंगाश्रम, सरस्वती, दृषद्वती, या नद्या; गंगाद्वार, कनखल तीर्थ, बदरी इत्यादि पवित्रस्थानें आहेत.

कुरुक्षेत्रादि कांहीं अति प्रसिद्ध स्थलांविषयीं थोडेंसें सांगून हें प्रकरण आटोपतों.

कुरुक्षेत्र—याचें माहात्म्य भारतांत फार वर्णिलें आहे. एक सबंध ८३ वा अध्याय आणि तोहि लहान नव्हे तर २०० हून जास्त श्लोकांचा याच्या वर्णनानें भरला आहे. सरस्वती आणि तिच्या तीरचा प्रदेश

---

* नर्मदा नदी ही पश्चिमच्या वर्णनांत सांगितली आहे. तेव्हां सुराष्ट्रांतील स्थानेंहि त्यांतच पाहिजे होतीं. तथापि सुराष्ट्रांतलीं असें म्हणून निराळीं सांगितलीं आहेत. तेव्हां हीं दक्षिणेस आहेत असें सांगण्याचा उद्देश दिसत नाहीं.

ह्यांच्या महत्त्वाविषयीं पूर्वी थोडेंसें सांगितलेंच आहे. त्यावरून फार प्राचीन कालापासून याचें माहात्म्य चालत आलें आहे, हें दिसून येईल. यांच्या मर्यादा अशा सांगितल्या आहेत.—

दक्षिणेन सरस्वत्या दृषद्वत्युत्तरेण च
ये वसंति कुरुक्षेत्रे ते वसंति त्रिविष्टपे ॥ ४ ॥

वनपर्व, अ० ८३.

यावरून सरवस्तीच्या दक्षिणचा आणि दृषद्वतीच्या उत्तरचा त्या नद्यांमधला जो प्रदेश तो कुरुक्षेत्र* होय.

तरंतुकारंतुकयोर्यदंतरं रामन्हदानां च मचक्रुकस्य ।
एतत्कुरुक्षेत्रसमंतपंचकं पितामहस्योत्तरवेदिरुच्यते ॥

वनपर्व, अ० ८३.२०८.

यांत कुरुक्षेत्राचीं द्वारें सांगितलीं आहेत. यामधील क्षेत्रास समंतपंचक किंवा पितामहाची उत्तर वेदी म्हणतात. या द्वारांत कोणत्या दिशेचें कोणतें हें सांगितलें नाहीं. तरी ८३ व्या अध्यायांत कुरुक्षेत्रांतील तीर्थें सांगितलीं आहेत त्यांत यांचा क्रम असा आहे:— मचक्रुक, तरंतुक, रामन्हद आणि अरंतुक. हीं तीर्थेंच

---

* या नद्यांमधील प्रदेशास 'ब्रह्मावर्त' असें मनुस्मृतींत म्हटलें आहे. परंतु 'कुरुक्षेत्र' हा शब्द तेथें जास्त व्यापक अर्थानें योजला आहे. त्यांत ह्या प्रदेशाचाहि समावेश होतो असें मागें दाखविलेंच आहे. कालिदासानें ब्रह्मावर्तासच कुरुक्षेत्र म्हटलें आहे.

ब्रह्मावर्तं जनपदमथच्छायया गाहमानः ।
क्षेत्रं क्षत्रप्रधनपिशुनं कौरवं तद्भजेथाः ॥

मेघदूत श्लो० ४९.

आहेत. व अर्थात् कुरुक्षेत्राच्या सीमेवर आहेत. त्यांत अरंतुक हें सरस्वतीवर सांगितलें आहे.

ततो गच्छेत राजेंद्र द्वारपालमरंतुकं ।
तच्च तीर्थं सरस्वत्यां यक्षेंद्रस्य महात्मनः ॥९२॥

यावरून त्याच्या समोरचें तरंतुक हें अर्थात् दृषद्वतीवर आहे असें सिद्ध होतें. मचक्रुकापासून तीर्थें सांगण्यास आरंभ केला आहे. तेथून जातां जातां प्रथम तरंतुक सांगितलें आहे. हीं तीर्थें प्रदक्षिणाक्रमानेंच बहुधा सांगितलीं असावीं. अर्थात् मचक्रुक हें पूर्वेस आणि रामऱ्हद हें पश्चिमेस असावें.

*सांप्रत नकाशांत पाहिलें असतां यमुनेच्या पश्चिमेस स्थानेश्वर शहर आहे. त्याजवळून सरस्वती नदी वाहते असें दिसून येईल. ती सांप्रतच्या राजपुतान्याच्या वायव्येचें जें प्रसिद्ध मोठें ओसाड वाळवंट त्यांत नाहींशी होते. दृषद्वती नदी मोठी नाहीं म्हणून नकाशांत लिहिलेली नसते. स्थानेश्वरच्या आसपासचा प्रदेश, या दोन नद्यांच्या मध्यें आहे. त्यास सांप्रत कुरुक्षेत्र म्हणतात. यांत जितक्या प्रदेशांत सांप्रत यात्रेचीं स्थानें आहेत त्याचा घेर ४० किंवा ४८ कोश आहे. इतक्या प्रदेशांत कौरवपांडवांच्या व दुसऱ्या अनेकांच्या संबंधें प्रसिद्ध अशीं अनेक स्थानें आहेत.

---

* यांत सांप्रतची जी माहिती सांगितली आहे त्यांतील बहुतेक कनिंगहॅमच्या पुस्तकावरून घेतली आहे. ती बहुतेक त्यानें स्वतः पाहून लिहिली आहे.

१. अकबराच्या वेळीं ४० कोश मानित.—ऐन अकबरी.

पृथूदक तीर्थाचें फार वर्णन केलें आहे तें सांप्रत स्थानेश्वरच्या पश्चिमेस १४ मैलांवर सरस्वतीच्या दक्षिणतीरीं आहे. तेथील शहरास हल्लीं पेहोआ म्हणतात.

८३ व्या अध्यायांत कुरुक्षेत्रांतील अनेक तीर्थें वर्णिलीं आहेत, त्या सर्वांचीं नांवें एथे सांगत बसत नाहीं. त्यांची संख्या शंभरांहून बरीच जास्त आहे. त्यांतून बहुतेक हल्लींहि प्रसिद्ध आहेत. उदाहरणार्थ पुंडरी या गांवाजवळील नागऱ्हद, बस्थली एथील व्यासस्थल, सगा एथील विष्णुतीर्थ, तसेंच आणखी दधीच तीर्थ इत्यादि. कुरुक्षेत्रमाहात्म्यांत तीर्थें इत्यादि १८० सांगितलीं आहेत. त्यांत ९१ उत्तरभागीं सरस्वतीतीरावर आहेत. परंतु लोकांच्या सांगण्यांत ३६० स्थलें आहेत. व ही संख्या खरी आहे यांत संशय नाहीं.

स्थानेश्वरच्या दक्षिणेस एक मोठें सरोवर आहे. हेंच सांप्रत यात्रेचें मुख्य स्थान आहे. याची पूर्वपश्चिम लांबी ३५४६ फूट आणि दक्षिणोत्तर रुंदी १९०० फूट आहे.

---

१. पुण्यमाहुः कुरुक्षेत्रं कुरुक्षेत्रात्सरस्वती । सरस्वत्याश्च तीर्थानि तीर्थेभ्यश्च पृथूदकं ॥ ४५ ॥ इत्यादि.

२. नागऱ्हद, व्यासस्थली, विष्णु तीर्थ, दधीच तीर्थ, हीं ८३ व्या अध्यायांत १४, ९६, १०३, १८६ या श्लोकांत आहेत.

३. यासच ब्रह्मसर, रामऱ्हद, वायुसर इत्यादि नांवें आहेत असें कनिंगह्यम लिहितो. परंतु ती चुकी दिसते. ८३ व्या अध्यायांत हीं स्थानें निरनिराळीं सांगितलीं आहेत. हें सरोवर सन्निहती असावें. ८३ व्या अध्यायांत सन्निहतीचें माहात्म्य सर्वांत जास्त आहे, तें वर सांगितलें आहे.

सांप्रत स्थानेश्वर एथे शिवाचें स्थान आहे. ८३व्या अध्यायांतलें स्थाणुवट हेंच असावें. सन्निहतीचें वर्णन फार केलेलें आहे.

ततो गच्छेत धर्मज्ञ तीर्थं सन्निहतीमपि ॥ १९० ॥
सन्निहत्यामुपस्पृश्य राहुग्रस्ते दिवाकरे ।
अश्वमेधशतं तेन तत्रेष्टं शाश्वतं भवेत् ॥ १९२ ॥
पृथिव्यां यानि तीर्थानि अंतरिक्षचराणि च ।
नद्यो ऱ्हदास्तडागाश्च सर्वप्रस्त्रवणानि च ॥ १९३ ॥
उदपानानि वाप्यश्च तीर्थान्यायतनानि च ।
निःसंशयममावास्यां समेष्यंति नराधिप ॥ १९४ ॥
मासि मासि नरव्याघ्र सन्निहत्यां न संशयः ।
तीर्थसन्निहनादेव सन्निहत्येति विश्रुता ॥ १९९ ॥

या वर्णनावरून कुरुक्षेत्रांतील सर्व तीर्थांत हें मोठें असावें असें दिसतें. सर्वांत याचें माहात्म्य ( पृथूदकाहून सुद्धां ) जास्त, असें वरील वर्णनावरून सिद्ध होतेंच. हें कुरुक्षेत्राचेंच नांव असें भारताचा टीकाकार चतुर्धर म्हणतो. व हें कुरुक्षेत्राचें पहिलें द्वार जें मचक्रुक त्याजवळच आहे. यावरून कुरूनें तप केलें व त्यावरून सर्व क्षेत्रास कुरुक्षेत्र नांव पडलें, तें याच तीर्थाजवळ केलें असावें. स्थाणुवटाच्या वर्णनानंतर लवकरच याचें वर्णन आहे; या गोष्टी, आणि सांप्रत स्थानेश्वराजवळचें सरोवर त्या सर्व प्रदेशांत मोठें आहे, तें यात्रेचें मुख्य स्थान आहे, कुरूनें याजवळ तप केलें अशी अद्यापि प्रसिद्धि आहे, हें स्थानेश्वराच्या जवळच आहे, आणि स्थानेश्वराजवळच्या सरोवरांत सर्व तीर्थें इत्यादि येतात यामुळें त्यांत स्नान केल्यानें सर्व

तीर्थांत स्नान केल्याचें श्रेय येतें असें अबूरिहान नामक ग्रंथकारानें ११ व्या शतकांत लिहिलें आहे या गोष्टी, यांचा विचार केला असतां स्थानेश्वरचें सरोवर हेंच सन्निहती किंवा कुरुक्षेत्र होय. पुढें सर्व प्रदेशास हें नांव पडलें.

कुरुक्षेत्राच्या तीर्थांत ब्रह्मावर्त नांवाचेंहि एक तीर्थ सरस्वतीतीरीं आहे त्यावरून सर्व क्षेत्रास ब्रह्मावर्त नांव पडलें असावें. कदाचित् ब्रह्मदेवाच्या नांवावरूनहि पडलें असेल. पितामहाची वेदी यास म्हणतात हें वर सांगितलेंच आहे.

परशुरामानें क्षत्रियांचा संहार करून पांच र्‍हद रक्तानें भरले. व पितरांस तृप्त केलें. ते र्‍हद या कुरुक्षेत्रांतच आहेत. त्यांस रामर्‍हद म्हणतात. कुरूनें या क्षेत्रांत तप केलें म्हणून यास कुरुक्षेत्र नांव पडलें. कौरवपांडवांचें युद्ध याच क्षेत्रांत झालें. या व दुसऱ्या अनेक ऐतिहासिक गोष्टी या क्षेत्रांत झाल्या आहेत. दध्यङ्‍ ऋषीची कथा वेदांत प्रसिद्ध आहे. अश्वाचें शिर इंद्रास शर्यणावत् नामक सरोवरांत सांपडलें, तें शर्यणावत् सरोवर याच क्षेत्रांतलें सांप्रतचें स्थानेश्वरचें सरोवर असेंहि कोणाचें मत आहे.

द्वापरांत कुरुक्षेत्राचें माहात्म्य सर्वांत जास्त हें पूर्वीं सांगितलें आहे.

पृथिव्यां नैमिषं तीर्थमंतरिक्षे च पुष्करं ।
त्रयाणामपि लोकानां कुरुक्षेत्रं विशिष्यते ॥२०[1]॥

यावरून याचें माहात्म्य दिसून येईल. तैत्तिरीय

१.–श्लोक ५३.

आणि शतपथ ब्राह्मणांतहि याचें माहात्म्य वर्णिलें आहे, हें पूर्वी सांगितलेंच आहे.

नैमिषारण्य हें पुराणांत प्रसिद्ध आहे. पांडव काम्यक वनांतून तीर्थयात्रेस निघाले ते प्रथम पूर्वेस गेले. ( प्राङ्मुखा प्रययुर्वीराः पांडवा जनमेजय । वनपर्व, ९३.२९ ). पुढें

ते तथा सहिता वीरा वसंतस्तत्र तत्र ह ।
क्रमेण पृथिवीपाल नैमिषारण्यमागताः ॥ १ ॥
ततस्तीर्थेषु पुण्येषु गोमत्याः पांडवा नृप ।....इत्यादि

यावरून हें काम्यक वनापासून बरेंच लांब पूर्वेस गोमती नदीच्या आलीकडे होतें असें सिद्ध होतें. धौम्यानें तीर्थें सांगितलीं आहेत त्यांतहि हें पूर्वेस सांगितलें आहे. गोमती नदी भागीरथीस काशीच्या खालीं सुमारें १९–२० मैलांवर मिळते.

नैमिषारण्यांत ऋषींचें पुराणसत्र चाललें होतें इत्यादि कथा प्रसिद्धच आहे.

पृथिव्यां यानि तीर्थानि तानि तीर्थानि नैमिषे ।

वनपर्व, ८४. ६१.

इत्यादि प्रकारचा याचा महिमा भारतांत सांगितला आहे.

काम्यकवन आणि द्वैतवन हीं भारतांत प्रसिद्ध आ-

---

१. गोडबोले यांनीं आपल्या भा० प्रा० ऐ० कोशांत हें कुरुदेशाच्या पश्चिमेस सांगितलें आहे. तें भागवताच्या आधारानें लिहिलें असें दिसतें. परंतु तो संशयित दिसतो. आणखी भागवताच्या आधारापेक्षां भारताचा आधार बलवत्तर होय. भारतांत पश्चिमेस दुसरें एकादें नैमिषारण्य असल्याचें आढळत नाहीं.

हेत. वनवासांत असतां पांडव पुष्कळ काळ या वनांत राहिले होते.

पांडवास्तु वने वासमुद्दिश्य भरतर्षभाः ।
प्रययुर्जान्हवीकूलात् कुरुक्षेत्रं सहानुगाः ॥ १ ॥
सरस्वतीदृषद्वत्यौ यमुनां च निषेव्य ते ।
ययुर्वनेनैव वनं सततं पश्चिमां दिशं ॥ २ ॥
ततः सरस्वतीकूले समेषु मरुधन्वसु ।
काम्यकं नाम ददृशुर्वनं मुनिजनप्रियं ॥ ३ ॥

वनपर्व, अ० ५.

यावरून हस्तिनापुराच्या पश्चिमभागीं, कुरुक्षेत्राच्याहि पश्चिमेस सरस्वती तीरावर काम्यकवन होतें असें सिद्ध* होतें. मरुधन्व प्रदेश ( सांप्रतचें मोठें वाळवंट ) याच्या जवळच होता असें वरील वर्णनावरून व वनपर्वांतील दुसऱ्याहि वर्णनावरून दिसतें. काम्यक वन ज्या प्रदेशांत होतें त्या देशास कुरुजांगल असें नांव होतें.

तीर्थयात्रामनुक्रामन् प्राप्तोस्मि कुरुजांगलान् ।
यदृच्छया धर्मराजं दृष्टवान् काम्यके वने ॥ ११ ॥

वनपर्व, अ० १०, मैत्रेयवाक्यं.

हस्तिनापुराहून रथांतून तीन दिवसांत पांडव काम्यक वनांत गेले.

इतः प्रयाता राजेंद्र पांडवा द्यूतनिर्जिताः ।
जग्मुस्त्रिभिरहोरात्रैः काम्यकं नाम तद्वनं ॥ ३ ॥

वनपर्व, अ० ११, विदुरवाक्यं.

पांडव काम्यकवनांतून द्वैतवनांत व द्वैतांतून काम्य-

---

* रघुनाथ भास्कर गोडबोले यांनीं आपल्या भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोशांत काम्यकवन कोठें होतें याचा उल्लेख भारतांत नाहीं असें लिहिलें आहे, ती चुकी होय.

क वनांत असे दोन-तीन वेळां गेले आले. द्वैतवनहि सरस्वतीच्या तीरीं मरुधन्व प्रदेशाच्या समीप होतें असें वनपर्वांतील अनेक उल्लेखांवरून सिद्ध* होतें. यांत पांडवांनीं तीर्थयात्रेहून आल्यावर एक पर्जन्यकाळ काढला. तेव्हां पाऊस पुष्कळ पडून नद्यांस पूर आले वगैरे वर्णन आहे. काम्यकवनहि फलपुष्पयुक्त चांगलें होतें. त्यांत पांडवांनीं पांच वर्षें काढिलीं यावरून हीं वनें ओसाड मैदानाच्या अगदीं समीप नसावीं. दोन्हीहि परस्पर जवळ जवळ होतीं असें दिसतें. कार्तिकी पूर्णिमेस रात्रीं द्वैतवनांतून पांडव काम्यक वनांत आले.

तमिस्राभ्युदये तस्मिन् धौम्येन सह पांडवाः
सूतैः पौरोगवैश्चैव काम्यकं प्रययुर्वनं ॥ १८ ॥

वनपर्व, अ० १८२.

यावरून ही वनें फार तर दहा-पांच कोशांच्या अंतरानें असतील. तीर्थयात्रेहून उत्तरेकडून पांडव आले त्यांस प्रथम द्वैतवन लागलें. मग काम्यक वनांत गेले. यावरून उत्तरेकडून येतांना प्रथम द्वैत मग नैर्ऋत्येस काम्यक असावें असें दिसतें. कारण दोन्हीहि सरस्वती-तीरीं होतीं. ती ईशान्येकडून नैर्ऋत्येकडे वहाते. द्वैतवनांत एक मोठें सरोवर होतें असें दिसतें. द्वैतवनाचा उल्लेख जेथे जेथे आला आहे, त्यांतून पुष्कळ ठिकाणीं "द्वैतवनं सरः" असें आढळतें.

---

* यांतील एक देतों.—ततश्च यात्वा मरुधन्वपार्श्वं सदा धनुर्वेदरतिप्रधानाः। सरस्वतीमेत्य निवासकामाः सरस्ततो द्वैतवनं प्रतीयुः॥२१॥
वनपर्व, अ० १७७.

# भाग दुसरा

अलेक्झांडरास त्यावेळच्या हिंदुस्थानांतील माहितगार लोकांनीं आपल्या देशाचा जो आकार व विस्तार सांगितल्याचें ग्रीक ग्रंथांवरून दिसून येतें तो पुष्कळ अंशीं खरा आहे, यावरून त्यावेळच्या लोकांस आपल्या देशाची चांगली माहिती होती असें दिसतें. सदरहू ग्रंथांत सांगितलें आहे कीं हिंदुस्थानचा आकार ऱ्हाम्बाईडसारखा आहे; त्याच्या पश्चिमेस सिंधुनद, उत्तरेस हिमालय, आणि पूर्वेस व दक्षिणेस समुद्र आहे. पश्चिम बाजू सर्वांत लहान असल्याचें लिहिलें आहे. पाट्रोक्लिसच्या मतें ती १२ हजार स्टाडिआ आहे व इरांटोस्थनीस नामक एक ग्रीक ग्रंथकार याच्या मतें १३ हजार स्टाडिआ आहे. सिंधूवर शिकंदरानें पूल बांधिला होता तेथपासून तिच्या मुखापर्यंत अंतर एक हजार स्टाडिआ होतें याविषयीं मतभेद नाहीं. सिंधूपासून पालिबोथ्रा (पाटणा) पर्यंत अंतर मोजलें होतें तें १० हजार स्टाडिआ (११४९ इंग्लिश मैल) भरलें. तेथून गंगेच्या मुखापर्यंत ६ हजार स्टाडिआ ( ६८९ इं० मैल ); गंगेच्या मुखापासून कुमारी केपापर्यंत १६ हजार स्टाडिआ ( १८३८ इं० मैल ); आणि तेथून सिंधूच्या मुखापर्यंत १९००० स्टाडिआ ( २१८३ इं० मैल ) याप्रमाणें अंतरें सांगितलीं आहेत.

---

१. हा सीरियाच्या सार्वभौम राज्यांत सेल्यूकस निकेटरच्या ताब्यांत ईशान्य भागचा सुभेदार होता. शिकंदरानें मिळविलेली माहिती यास मिळाली होती

सांप्रत पाहिलें असतां उहिंदपासून सिंधूच्या मुखापर्यंत ९५० मैल खुषकीनें आणि १२०० मैल जलमार्गें भरतात.

सिंधूपासून पाटणापर्यंत लष्करी रस्त्यानें अंतर ११४३ मैल आहे; म्हणजे ग्रीक ग्रंथकारांनीं लिहिल्या अंतरापेक्षां फक्त ६ मैल कमी आहे. गंगेच्या मुखापासून कुमारीपर्यंत १६०० मैल भरतात. परंतु किनारा सरळ नाहीं हा विचार केला पाहिजे. १/६ अंतर वाढविलें म्हणजे १८६६ होतात. कुमारीपासून सिंधूच्या मुखापर्यंत अंतर सदरीं ग्रीकांनीं लिहिल्यापेक्षां ३५० मैल कमी येतें. परंतु खंभात व कच्छ हीं अखातें धरलीं असतां अंतर जमतें. यावरून हिंदूंच्या माहितीवरून ग्रीक ग्रंथकारांनीं लिहिलेलीं अंतरें अगदीं बरोबर आहेत असें दिसून येईल.

टालमीनें हिंदुस्थानचा आकार लिहिला आहे तो अगदीं चुकला आहे. परंतु त्यानें आशिया खंडाचे रेखांश धरले आहेत त्यांत चुकी झाल्यामुळें असें झालें आहे.

चिनी लोकांस हिंदुस्थानदेश हान वंशांतील वुटी बादशहाच्या वेळीं ( इ० स० पू० २ ऱ्या शतकांत ) माहित झाला असें दिसतें. तेव्हां त्याचें नांव युआंटू किंवा यिंटु, म्हणजे हिंदु, शिंटु, किंवा सिंधु, असें लिहिलें आहे. इ०स० ४७७ मध्यें पश्चिम हिंदुस्थानच्या राजानें चिनांत वकील पाठविला होता, तेव्हां हिंदुस्थानचे ५ भाग होते असा उल्लेख आढळतो. हिंदुस्थानास मगध किंवा ब्राह्मणांचा देश असेंहि म्हटलें आहे. हुएनसंगनें हिंदुस्थानचे पांच भाग केले आहेत. त्यानें सां-

गितलेला आकार चुकला आहे व देशाचा एकंदर घेर सांगितला आहे तो वास्तविक घेराच्या दुप्पट आहे.

हुएनसंगनें हिंदुस्थानांत एकंदर ८० राज्यें सांगितलीं आहेत. त्यांतून कांहीं दुसऱ्यांस खंडणी देणारीं असावीं असें दिसतें. हीं सर्व पुढील वर्णनावरून समजतील.

---

## उत्तरहिंदुस्थान

हिंदुस्थानची स्वाभाविक पश्चिम मर्यादा सिंधु ही वाटते. परंतु एतद्देशीय ग्रंथकारांनीं हीच पश्चिम सीमा सांगितली आहे असें नाहीं. पुराणादि ग्रंथांत पूर्वपश्चिमच्या प्रत्यक्ष सीमा तर कोठेच सांगितल्या नाहींत. जे जे देश माहित होते ते सर्व त्यांनीं भारतवर्षांतच सांगितले आहेत असें दिसतें. वर्णव्यवस्था अमुक खंडांत आहे, पलीकडे म्लेच्छादि राहतात, असें कोठे कोठे सांगितलें आहे. परंतु त्यांची हद्द अमुक असें ठरविलेलें दिसत नाहीं.

अलेक्झांडरानंतरचे सर्व ग्रीक ग्रंथकार देखील सिंधु ही पश्चिम सीमा मानित नाहींत. पूर्व एरिआना म्हणजे सांप्रतच्या अफगाणिस्थानाचा बराच भाग ते हिंदुस्थानांतच धरितात. स्ट्राबो म्हणतो कीं " सिंधु नदावरील कांहीं देश जे पूर्वी पर्शियन लोकांचे होते त्यांत हिंदु अंमल करितात. शिकंदरानें त्यांस काढून आपलीं संस्थानें स्थापिलीं. परंतु सेल्यूकस निकेटर यानें चंद्रगुप्त राजा, अशोकाचा आजा, यास ते विवाहसंबंधांत दिले. " अशोक राजा बौद्ध धर्माचा प्र-

सार होण्याकरितां दूरदूरच्या प्रदेशीं धर्मोपदेशक पाठवित असे. त्या स्थळांत यवनांची राजधानी अलसद्दा ( आलेक्झांड्रिआ )* आहे. हुएनसंग ह्यानें ह्या प्रदेशांत अशोकाचे स्तूप होते असें लिहिलें आहे. या प्रमाणावरून इ० स० पू० ३ ऱ्या व चवथ्या शतकांत काबूल नदीच्या¹ प्रदेशांत हिंदूंची सत्ता होती या गोष्टीस बळकटी येते. बाक्ट्रिअन ग्रीक आणि इंडो सिथियन यांच्या नाण्यांवर इ० स० १०० पर्यंत किंवा त्याच्याहि पुढें हिंदुस्थानांतील भाषांतले लेख आहेत. यावरून ती सत्ता कायमची होती असें दिसतें. पुढें दुसऱ्या व तिसऱ्या शतकांत तो प्रकार आढळत नाहीं, तरी ६ व्या शतकांत आबटिलिटिस ( गोरेहनू लोक ) ह्यांच्या नाण्यांवर तसे लेख आढळतात. ७ व्या शतकांत कापिसाचा राजा क्षत्रिय होता असें हुएनसंग लिहितो. संपूर्ण दहाव्या शतकांत काबूल नदीच्या प्रदेशांत ब्राह्मणांच्या एका वंशाचें राज्य होतें. तें महंमद गजनवीच्या वेळीं मोडलें. यावरून तोंपर्यंत काबूल नदीच्या प्रदेशासुद्धां सर्व पूर्व अफगाणिस्थानामध्यें आर्यवंशी लोक रहात होते. त्यांचा धर्म बौद्ध होता असें दिसतें. गजनवी वंशाचे अमलांत मूर्तिप्रिय बौद्ध लोकांचा फार छळ झाला.

---

* हिंदुकुश पर्वताच्या पायथ्याशीं अलेक्झांडर यानें हें शहर स्थापिलें होतें.

१. Kabul-valley अशा प्रकारच्या शब्दांचा प्रयोग कनिंगह्यामच्या पुस्तकांत बरेच स्थळीं आहे. त्यांतील Valley शब्दाचें भाषांतर 'खिंड, खोरें' असें न करितां, अमुक नदीचा प्रदेश असें केलें आहे.

आणि अफगाणिस्थानाच्या पूर्व भागांत पुष्कळ शतकेंपर्यंत हिंदूचे वंशज रहात होते ते समूळ नाहींसे झाले. ते मग पुनः कधीं तेथे स्थापले गेले नाहींत.

हुएनसंगनें उत्तर हिंदुस्थान हा जो भाग केला आहे, त्यांत सामान्यतः म्हटलें असतां सांप्रतचा पंजाब प्रांत व सुमारें तितक्याच विस्ताराचा त्याच्या पश्चिमचा काबूलचा भाग येतो. त्यांत त्यानें कौफू ( अफगाणिस्थान ), काश्मीर, आणि टाकी ( पंजाब ) असे मुख्य तीन विभाग सांगितले आहेत. पहिल्यांत १० व दुसऱ्यांत ६ आणि तिसऱ्यांत ३ राज्यें होतीं. त्यांचें क्रमानें वर्णन पुढें आहे.

## १. कौफू अथवा अफगाणस्थान

इसवी सनाच्या आरंभापूर्वी व नंतर बरींच शतकें ज्यांत हिंदुस्थानांतील भाषा व धर्म प्रबळ होता, अशा सिंधूच्या पलीकडील उत्तर हिंदुस्थानांत, पश्चिमेस बामियन आणि कंदाहार व दक्षिणेस बोलनघाट एथपर्यंतचा अफगाणिस्थानाचा भाग येत असे. सातव्या शतकांत ह्या प्रदेशाचे १० विभाग होते त्यांत कापिसा हा मुख्य होता. त्यास खंडणी देणारीं संस्थानें पश्चिमेस काबूल व गिजनी; उत्तरभागीं लंघन आणि जलालाबाद; पूर्वभागीं स्वात आणि पेशावर; ईशान्यभागीं बोलर; आणि दक्षिणभागीं बानू आणि आपोकिन हीं होतीं. सगळ्या प्रदेशाचें साधारण नांव कौफू असावें असें दिसतें. कौफू हें इ० स० पू० दुसऱ्या शतकांत पार्थिअन, इंडिअन, आणि किपिनचे सू किंवा सासी

या तिघांकडे होतें असें सांगितलें आहे. ह्या वर्णनाप्रमाणें म्हटलें तर नैर्ऋत्येचा कंदाहार प्रांत पार्थिअनांकडे; स्वात, पेशावर, बानू हे पूर्व प्रांत इंडियनांकडे; आणि वायव्येचे लंघन, जलालाबाद, काबूल आणि गिजनी हे प्रांत सासी सिथियन लोकांकडे असावे असा अजमास होतो. कोफू आणि काबूल यांच्या उच्चारांत आणि स्थलांत साम्य आहे. म्हणून तीं एकच असें सामान्यतः समजतात. परंतु काबूलची हद्द पश्चिमेकडे पार्थिआंत आणि पूर्वेस हिंदुस्थानांत होती असें धरिलें, तर राजकीयविभागदृष्टच्या तें खरें असें म्हणतां येतें. चिनी प्रवाशांनीं लिहिलेलें कोफू यांत सांप्रतच्या सर्व अफगाणिस्थानाचा समावेश होत होता. युचि किंवा टाचरी ह्यांच्या पांच जातींपैकीं एकीचें नांव कौफू असें होतें. ती ज्या शहरांत रहात होती त्यास तिनें आपलें नांव इ० स० पू० २ ऱ्या शतकांत दिलें. यावरून कौफू आणि काबूल हीं शब्दव्युत्पत्तिदृष्टच्या एकच असण्याचा खरोखर संभव आहे. शिकंदराच्या इतिहासकारांनीं काबूल हें नांव मुळींच दिलें नाहीं. यावरून चिनी प्रवाशांचे लिहिण्यास बळकटी येते. त्या इतिहासकारांनीं राजधानी आर्टोस्पाना लिहिली आहे. काबूल हें नांव प्रथम टालमीच्या भूगोलांत आढळतें. काबुरा किंवा आर्टोस्पाना ही पारोपामिसाडीची राजधानी असें तो लिहितो. यावरून असें अनुमान होतें कीं आर्टोस्पाना ही ह्या देशाची राजधानी होय. पुढें ग्रीक अमलांत आलेक्झांड्रिआ ही राजधानी झाली, परंतु पुनः इंडो सिथियन राजांच्या वेळेस आर्टोस्पाना ही झाली. परंतु

सातव्या शतकापूर्वी पुनः बदल झाला असें दिसतें कारण तेव्हां कापिसेनीची राजधानी ओपिआना ही होती.

### १. कापिसेनी किंवा ओपिआन

हुएनसंगनें कापिशी अथवा कापिसेनी या प्रांताचा घेर ४००० ली ( ६६६ मैल ) लिहिला आहे. हा बरोबर असेल तर घोरबंद आणि पंजशीर ह्या दोन नद्यांच्या प्रदेशांचा ह्यांत समावेश केला पाहिजे. कापिसेनीचा उल्लेख प्रथम प्लिनीनें केला आहे. तो लिहितो कीं त्या प्रांताची प्राचीन राजधानी कापिसा हिचा सायरसनें नाश केला.

सातव्या शतकामध्यें कापिशी प्रांताची राजधानी ओपिआन हीच किंवा हिच्या जवळच होती असें कनिंगहॅमनें तीन चार प्रमाणांवरून सिद्ध केलें आहे.

अलेक्झांडरानें हिंदुकुश ( इंडियन काकेशस ) पर्वताच्या पायथ्याजवळ आलेक्झांड्रिया शहर वसविलें. तें कोठेसें होतें याविषयीं विद्वानांचा वाद आहे. प्लिनीच्या व हुएनसंगच्या वर्णनावरून, अंतरावरून, आणि तें हिंदुकुशच्या पायथ्याशीं होतें असें प्लिनी लिहितो यावरून तें सांप्रतचें ओपिआन हेंच होय, असें कनिंगहॅमनें बऱ्याच ओढाताणीनें सिद्ध केलें आहे. कापिसाचा राजा क्षत्रिय होता असें हुएनसंग लिहितो.

---

१. सातव्या शतकांत याचा अर्थ यापुढें सामान्यतः हुएनसंगच्या वेळीं असा समजावा. आणि अर्थातच " सातव्या शतकांत अमुक होतें " असें लिहिलें असलें म्हणजे तें हुएनसंगच्या आधारानें लिहिलें असें समजावयाचें.

## कर्सन, कर्तन किंवा टेट्रागोनिस (हल्लींचें बेग्राम)

प्लिनीनें कर्तन म्हणून एक शहर अलेक्झांड्रिआच्या जवळच हिंदुकुशच्या पायथ्याशीं होतें असें लिहिलें आहे. टालमीनें त्याच सुमारास कर्सन म्हणून लिहिलें आहे. दोघांनीं लिहिलेल्या वर्णनावरून हीं दोन्ही एकच असें दिसतें. हुएनसंगनें Kiulusapang कुरुसपन म्हणून एक शहर लिहिलें आहे. सांप्रत ओपिआनपासून ६ मैलांच्या आंतच बेग्राम म्हणून शहर आहे. प्लिनीनें कर्तन हें चौरस ( टेट्रागोनिस ) असल्याचें लिहिलें आहे. बेग्रामचें स्थान तसेंच आहे असें मासन म्हणतो. सांप्रतहि तेथे मैदानांत मूर्ति, नाणीं, शिक्के, बाणांचीं अग्रें वगैरे सांपडतात. नाण्यांत गजनवी राजाच्या पूर्वीचीं हिंदु राजांचीं नाणीं पुष्कळ सांपडतात. यावरून कर्तन, कर्सन, कुरुसपन हें सांप्रतचें बेग्रामच होय. मुसलमानांचा अंमल झाल्यावर तें मोडलें असावें. जंघिसखानानें त्याचा नाश केला असावा असें मासनचें मत आहे. एरियानांतील एक ग्रीक राजा युक्रिटायडीस ह्याच्या एका दुर्मिळ नाण्यावर करिशी नगराचा उल्लेख आहे. तें आणि राजा मिलिंदूची जन्मभूमि कलिशी असें एका बौद्ध लेखांत आहे, तें, हीं एकच असें दिसतें. त्याच बौद्ध ग्रंथांत मिलिंदूचा जन्म अलसदा ( अलेक्झांड्रिआ एथे झाला असेंहि लिहिलें आहे. यावरून अलसदा आणि करिशी ( टालमीचें कर्सन ) हीं एकच असें होतें. अलेक्झांड्रिआ आणि कर्सन हीं जवळ जवळ असल्यामुळें वाढत वाढत जाऊन दोन्ही एकच झालीं असावीं. आणि दोन्ही नांवेंहि एकच

झाली असावी. एरिआनांतले ग्रीक राजे डिमेट्रिअस, युक्रिटायडीस, इत्यादिकांच्या नाण्यांवर ओपिआन आणि कर्सन या दोन्ही शहरांचीं चिन्हें आहेत. ओपिआन नांव कमी होऊन कर्सन हें एकच नांव कांहीं नाण्यांवर आहे. यावरूनहि सदरहू गोष्टीस बळकटी येते.

कापिसेनींतलीं दुसरीं ७।८ शहरें हुएननें सांगितलीं आहेत. परंतु तीं महत्त्वाचीं नाहींत आणि त्यांचें सांप्रतच्या शहरांशीं ऐक्य फारसें ठरवितां येत नाहीं म्हणून एथे तीं दिलीं नाहींत.

## २. कोफिनी किंवा काबूल

टालमीनें काबोलिटि नांवाचे लोक सांगितले आहेत, व त्यांची राजधानी काबुरा लिहिली आहे. स्ट्राबो आणि प्लिनी हे आर्टोस्पाना हें मात्र राजधानीचें नांव लिहितात. आर्टोस्पाना हें ऊर्ध्वस्थान या संस्कृत शब्दाबद्दल असावें असें विलसन म्हणतो. हुएनसंग हा फोलिशिसतन प्रांताची राजधानी हुपिना असें लिहितो. परंतु प्रांत व शहर यांच्या नांवांत परस्पर बदल झाला असावा अशी कनिंगह्यामची कल्पना आहे. कोफीस ( काबूल ) नदीवरून तिजवरील प्रांतास कोफिनी नांव प्राचीनकाळीं पडलें असावें, असें प्राचीन भूगोल लिहिणाऱ्या सर्वांचें मत आहे. कोफीनचें चिनीमध्यें हुफीन असेंच रूप होईल. यावरून हुफीन म्हणजे सांप्रतचा काबूलप्रांत होय. व आर्टोस्पाना हें काबूल शहर होय. बालाहिसार म्हणून काबूल शहराजवळ किल्ला आहे; त्या पर्शियन शब्दाचा अर्थ ऊर्ध्वस्थान

असा होतो. हुएनने प्रांताचें नांव लिहिलें आहे तें वर्दकस्थान आणि हुफीन म्हणजे सांप्रतचें ओपिआन असें मार्टिनचें मत आहे. परंतु त्यानें आपल्या म्हणण्यास प्रमाणें दिलीं आहेत त्यांजपेक्षां कनिंगह्यॅमनें दिलेलीं बलवत्तर दिसतात.

कोफीस नदी ही ऋग्वेदांतील कुभा होय असें म्हणतात. याविषयीं मागें सांगितलेंच आहे. शिकंदराच्या इतिहासकारांनीं कोफीस नदी मात्र सांगितली आहे. प्रांताचें नांव सांगितलें नाहीं.

हुएनसंगच्या वेळीं काबूलमध्यें टर्क राजा होता. गिजनीपेक्षां भाषा निराळी होती. कापिसेनी एथे राजा आर्य होता व भाषाहि आर्य वर्गांतली होती. (परंतु लिपि टर्क होती ). ह्याप्रमाणें काबूलमध्यें भाषाहि टर्क असेल.

### ३. अरखोशिआ किंवा गिजनीप्रांत

हुएनसंगनें Tsatikuta साकुटाप्रांत हुफीनी (काबूल ) प्रांताच्या दक्षिणेस ८३ मैल सांगितला आहे. हें नांव आणि ग्रीक ग्रंथकारांचें अरखोशिआ हीं एकच असें कनिंगह्यॅमनें सिद्ध केलें आहे. त्याच्या राजधान्या दोन होत्या. पैकीं होसिना ही गिजनी असें सेंट मार्टिनचें मत आहे व तें बरोबर आहे. हुएननें राज्याचा घेर ११६६ मैल लिहिला आहे. कंदाहार खेरीज करून सर्व पश्चिम अफगाणिस्थान त्यांत होतें. तेथील राजा बौद्ध होता. लिपि व भाषा इतर प्रांतांहून निराळी होती. हुएनला हिंदुस्थानांतील लिपि व भाषा यांची माहिती होती. त्याला एथील भाषा निराळी वाटली ती

पुस्तु असावी. हें खरें असेल तर लोक अफगाण असावे. गिजनीचा किल्ला फार मजबूत आहे यावरून किल्ल्याचें नांव गजा असें पडलें. ह्या जुन्या पर्शियन शब्दाचा अर्थ खजिना असा आहे.

### ४. लंघन

कापिसेनीच्या पूर्वेस १०० मैलांवर लांपो म्हणून प्रांत हुएनसंगनें सांगितला आहे त्याच्या वर्णनावरून तो सांप्रतचा लंघन प्रांत होय. तो कापिसेनीच्या राजाच्या ताब्यांत होता.

### ५. नगरहार ( जलालाबाद )

लंघन एथून १७ मैलांवर आग्नेयीस गेल्यावर नदी उतरून हुएनसंग नगरहार प्रांतांत गेला. ह्या दोन्ही गोष्टी काबूल नदीच्या दक्षिणेस जलालाबादेजवळ ' नगर ' म्हणून टालमीनें लिहिलें आहे त्याशीं मिळतात. नगरहार हें संस्कृत नांव एका नाण्यावरहि आढळलें आहे. ह्या प्रांताचा घेर १०० मैल सांगितला आहे; यावरून पश्चिमेस जगदलक घांट, पूर्वेस खैबर, उत्तरेस काबूल नदी आणि दक्षिणेस सफेत कोह पर्वत, इतकी ह्या प्रांताची हद्द असावी. जलालाबादेच्या पश्चिमेस दोन मैलांवर बेग्रांम* आहे ती याची राजधानी असावी. तें गांव हिडाच्या वायव्य-पश्चिम दिशेस ५।६ मैल आहे. हिडा हेंच हुएनचें हेलो असें पुष्कळांचें मत आहे. तेथे बुद्धाची करोटी एका स्तूपामध्यें होती असें हुएन लिहितो. हिडा हें जलालाबादेच्या दक्षिणेस ५ मैलांवर

* मागील बेग्राम निराळें.

आहे. त्यांत मानसननें स्तूप वगैरे शोधून काढिले आहेत. यावरून हिडा हेंच हेलो असें निर्विवाद सिद्ध होतें. व राजधानी बेग्राम हीच असावी. तेथे जुनीं कामें पुष्कळ आढळलीं आहेत.

इ० स० ६३० मध्यें हा प्रांत कापिसेनीच्या ताब्यांत होता. व कापिसेनीप्रमाणें तो पुढें काबूलच्या ब्राह्मणी राजांच्या ताब्यांत व त्यांकडून मुसलमानांकडे गेला.

## ६. गांधार किंवा परशावर प्रांत

शिकंदराच्या इतिहासकारांनीं गांधार देशाचा उल्लेख केला नाहीं. परंतु स्ट्राबोनें कोफीस नदीवर, चोआसपीस आणि सिंधु यांच्या मध्यें, गंदारितिस सांगितला आहे. ह्याच स्थळीं टालमीनें गंदादाई वर्णिला आहे. कोफीसच्या दोन्ही तीरांवर तो होता असें सांगितलें आहे. सर्व चिनी प्रवाशांचा गांतारे(Kiantolo) हाच होय. त्याची राजधानी पुरुशपुरो किंवा परशपुरो ही सिंधूपासून ३१४ दिवसांच्या वाटेवर नदीच्या दक्षिणेस सांगितली आहे. हें वर्णन पेशावरशीं बरोबर मिळतें. त्याचें परशावर हें नांव अकबरपर्यंत चालत होतें. अबूलफजल, बाबर, आणि त्याच्याहि पूर्वी अबूरिहान व दुसरे १० व्या शतकांतील आरब भूगोल लिहिणारे, हे त्याचें परशावर हेंच नांव देतात. या प्रांताच्या मर्यादा सांगितल्या नाहींत, परंतु पूर्व-पश्चिम १६६ मैल व उत्तर-दक्षिण १३३ मैल विस्तार सांगितला आहे. हें खरें दिसतें. कारण कुनार नदीपासून तारबेलापर्यंत नकाशावर १२० मैल होतात व पाय-

रस्त्यानें १५० मैल भरतात. रुंदी बझारपासून कोहा-
तपर्यंत १०० मैल भरते. यावरून मर्यादा अशा अ-
साव्या:—पश्चिमेस लंघन आणि जलालाबाद; उत्तरेस
स्वात आणि बुनिरच्या टेंकड्या; पूर्वेस सिंधु; दक्षिणेस
कलाबाग टेंकड्या. यांत बुद्ध, शिकंदर आणि त्यानं-
तरचा इंडो सिथिअन राजा कानिष्क यांच्या संबंधें प्र-
सिद्ध अशीं स्थानें अनेक आहेत.

## पुष्कलावती

गांधार देशाची प्राचीन राजधानी पुष्कलावती ही
भरतपुत्र पुष्कर यानें स्थापिली असें विष्णुपुराणांत
सांगितलें आहे.*वाल्मीकि रामायणांतहि पुष्कराची रा-
जधानी गांधार देशांत पुष्कलावत किंवा पुष्कलावती
सांगितली आहे. वराहमिहिरानें उत्तरेकडील देश लिहि-
ले आहेत, त्यांत ‡ पुष्करावत आणि तक्षशिल हीं नांवें
एकत्र आलीं आहेत.

शिकंदराच्या वेळींहि गांधार देशाची हीच राजधानी
होती. तिचें नांव Peukelaotis किंवा Peucolaites
( पुकेलाओति ) हें पाली भाषेंतील पुक्कलाओतीपासून
निघालें आहे. एरियननें तें पुकेलेई असें लिहिलें आहे.
डायोनिशियसनें लोकांचें नांव पुकेलू असें लिहिलें आ-
हे. हीं पाली भाषेंतील पुक्कलूचीं रूपें आहेत. एरियन

* वा० रा० उत्तरकांड सर्ग १०१ पहा.

‡ अ० १४ श्लो० २६ पहा. कालिदासानें लिहिलें आहे कीं
भरतानें सिंधु देशांत तक्ष आणि पुष्कल या दोन पुत्रांची तक्ष-
शिला आणि पुष्कलावती या नगरांत स्थापना केली. रघु,
१५.८९ पहा.

म्हणतो कीं तें मोठें शहर अस्टी किंवा हस्ती याची राजधानी होतें. तो मेल्यावर शिकंदर आला, तेव्हां त्यास तें दिलें. स्ट्राबो आणि एरियन हे तें सिंधूच्या पश्चिमेस होतें इतकेंच सांगतात. परंतु टालमीनें तें सुआस्तु ( सांप्रतची पंजकोरा नदीस मिळणारी स्वांत* ) हिच्या पूर्वतीरीं सांगितलें आहे. हें हुएनच्या लेखांशीं मिळतें. तो परशावराहून निघून १७ मैल ईशान्येस गेला, व एक नदी उतरून पुष्कलावती एथे गेला. ही नदी कोफी ( काबूल ) होय. अंतर व दिशा ह्यांवरून पाहिलें असतां पुष्कलावती हें सांप्रतचीं दोन मोठीं शहरें परांग आणि चरसद्दा यांच्या स्थलीं असावें असें निश्चित होतें. सांप्रत स्वातच्या पूर्व किनाऱ्यावर जीं आठ[1] प्रसिद्ध शहरें आहेत त्यांतीलच हीं दोन आहेत. ह्या आठ शहरांचा विस्तार १९ मैल आहे. त्यांतील चरसद्दा आणि परांग हीं नदीच्या वळणावर अगदीं जवळ जवळ आहेत. दोहोंमिळून पूर्वी एकच शहर असावें. ह्या आठहि शहरांस सांप्रत अष्टनगर असें म्हणतात. ह्याचा अर्थ सांप्रत तेथचे लोक आठ नगरें[3] असा करितात. परंतु तें हस्तिनगर या जुन्या नांवाबद्दल असावें. हस्तिनगर किंवा अस्तिनगर नांवाचें एक शहर पूर्वी होतें. तें नांव पुष्कलावतीचा राजा अस्ति याच्या

---

* पहिला भाग पहा.

१. ह्यांचीं नांवें:—तंगी, शिरपाऊ, उमरझै, तुरानझै, उस्मानझै, राजूर, चरसद्दा आणि परांग.

२. जलालाबादेस नगरहार याबद्दल नंगनिहार ( नऊ नद्या ) असें तेथील लोक सांप्रत म्हणतात तें यासारखेंच होय.

नांवावरून पडलें असावें. सांप्रतच्या राजुरी शहरास-मोर बेटांत हिसार नांवाचा किल्ला आहे. जनरल कोर्ट याचें असें मत आहे कीं तो जुन्या हस्तिनगरच्या जागीं बांधला आहे.

पुष्कलावतींत एक मोठा स्तूप होता. बुद्धानें आपला डोळा दिला त्या जागीं तो बांधलेला होता.

## उतखंड, उहिंद किंवा एमबोलिम

पुढें हुएनसंग ३३ मैलांवर आग्नेयीस उतकहंडा एथे गेला. जुलीअन त्या शब्दाचें रूप उदखंड असें लिहितो. आणि तें सांप्रतचें सिंधूवरचें उहिंद असें मार्टिननें ठरविलें आहे. हुएननें त्याची दक्षिण बाजू नदीवर आहे, असें लिहिलें आहे. तें बरोबर मिळतें. हें शहर अटक शहाराच्या वर १५ मैल आहे. अबूरिहाननें १०३० मध्यें त्याचें नांव वैहंद किंवा उइहंद असें लिहिलें आहे. आणि मिर्झा मोंगलनें १७९०मध्यें ओहिंद असें लिहिलें आहे. राशिद उदिन तें वेहांद असें लिहितो. आणि म्हणतो कीं मोंगल त्यास कारजंग असेंहि म्हणतात. हे सर्व ग्रंथकार वेहंद ही गांधारची राजधानी असें म्हणतात. निजाम उद्दिन यानें मात्र त्याचें नांव हिंद असें लिहिलें आहे. तेथील किल्ल्यांत जयपाळ यास इ० स० १००२ मध्यें महमदानें कोंडलें होतें, असें तो लिहितो. फेरिस्ता त्या किल्ल्याचें नांव बिथंड असें देतो. हें हुएनच्या उतखंडशीं मिळतें.

महमद गजनवीनें काबूलचें ब्राह्मणी राज्य १०२६

मध्यें बुडविलें. त्याची राजधानी उहिंद होती. मसाऊद ९१५ मध्यें हिंदुस्थानांत आला होता, तो लिहितो कीं " सिंधचा राजा हाच गांधारमध्यें राज्य करितो. त्याचें नांव जाझ आहे. त्या सर्व राजांस हें नांव साधारण आहे ". उहिंदच्या पूर्वेकडील मैदानाचें नांव चाच असें आहे. तें उहिंदच्या राजांच्या जाझ या नांवावरून पडलें असावें. सांप्रतच्या सिंधप्रांतांत पूर्वी ब्राह्मण राज्य करित होते, त्यांच्या घराण्याची स्थापना इ० स० ६४१ मध्यें एका चाचनेंच केली ही गोष्ट चमत्कारिक आहे. याहूनाहि एक चमत्कारिक मेळ असा कीं चिचिटो किंवा जाझोटी एथील ब्राह्मण घराण्यास खाजूरा येथील चांदेल यांनीं ६४१ च्या सुमारेंच घालवून दिलें. यावरून असें अनुमान होतें कीं तेथून घालविल्यावर यांनीं सिंधमध्यें राज्य स्थापिलें. नंतर काबूल व उहिंद एथे स्थापिलें.

हुएननें या शहराचा घेर २ मैल लिहिला आहे. पुढें ब्राह्मणांच्या वेळीं व जंबिसखानाच्या वंशाच्या वेळीं तें वाढलें असावें. पुढें अटक शहराची भरभराट झाल्यावर कमी झालें असावें. सांप्रत तर जुनें अर्धे शहर नदीनें वाहून गेलें आहे. वाळूंत झारेकऱ्यांस नाणीं वगैरे पुष्कळ सांपडतात. थोडेसे तास वाळू धुतल्यानें मला एक ब्रांझ धातूचें बकल, स्त्रियांच्या गळ्यांत घालण्याचा एक दागिना, डोळ्यास सुरमा लावण्याच्या सळ्या आणि काबूलचे ब्राह्मण आणि इंडो सिथियन राजे यांचीं बरींच नाणीं सांपडलीं असें कनिंगहॅम लिहितो. इंडो सिथियन नाणीं सांपडतात, यावरून ख्रिस्त




शकाच्या पूर्वीचेंच हें शहर असावें. तें शिकंदरानें स्थापिलें असें अबूल फजल लिहितो, तें यावरून संभवतें.

शिकंदर हा पुष्कळावती घेतल्यावर दुसरीं लहानलहान शहरें घेऊन एमबोलिम एथे आला. तें उहिंदच असें कनिंगहॅम म्हणतो. उहिंदजवळ अंबर म्हणून खेडें आहे. अंबर, उहिंद यापासून एमबोलिम निघालें असावें.

## शालातुर अथवा लाहोर

हुएन उहिंद एथून वायव्येस २ ३/४ मैलावर Solotulo शालातुर एथे गेला. सांप्रत लाहोर हें खेडें उहिंदच्या वायव्येस ४ मैल* आहे. कनिंगहॅम लिहितो कीं मी १८४८ मध्यें एक दिवस तेथे होतों तेवढ्यांत मला ग्रीक आणि इंडो सिथिअन यांचीं नाणीं बरींच सांपडलीं. यावरून हें फार जुनें असावें. पाणिनीचें शालातुर हेंच होय. शालातुर याचीं हालातुर, अलातुर अशीं रूपांतरें होऊन अचा लोप होऊन लाहोर झालें असावें.

## एओर्नास

शिकंदरानें एओर्नास नामक किल्ला घेतला असें वर्णन आहे. तो कोणता याविषयीं वाद आहे. अटक शहरच्या समोर टेंकडीवर किल्ल्याचे †अवशेष आहेत, तो एओर्नास असें कोणाचें मत आहे. महावन म्हणून टेंकडी आहे तिजवर एओर्नास होता असें कोणी प्रति-

---

* रावीच्या कांठचें लाहोर, पंजाबांतलें मुख्य शहर, हें निराळें.

† Remains याचें भाषांतर अवशेष असें केलें आहे. पुढेंहि पुष्कळ ठिकाणीं हा शब्द येईल.

पादन करितात. सर्वांनीं आपापल्या मतांस प्रमाणें दिलीं आहेत. परंतु नोग्रामजवळ राणिगत म्हणून टेंकडी आहे तिजवर किल्ला आहे तो एओर्नास असें कनिंगह्यॅमचें मत आहे. व तें त्यानें पुष्कळ प्रभाणें देऊन सविस्तर सिद्ध केलें आहे. त्याच्या सिद्धतेंत राणीगतची उंची कमी एवढेंच न्यून आहे. परंतु ग्रीक ग्रंथकारांनीं उंची फाजील लिहिली असावी.

राणीगतचें वर्णन १८४८ मध्यें तें स्थान स्वतः पाहून कनिंगह्यॅमनें केलें आहे. तो किल्ला सुमारें १२०० फूट उंचीवर होता. वर उत्तम उत्तम इमारती पूर्वी होत्या. हल्लीं कांहींच्या भिंती मात्र आहेत त्यांचे धोंडे उत्तम प्रतीच्या चुन्यांत बसविलेले आहेत. तेथे बुद्ध व माया यांच्या मूर्ति आढळल्या. व कांहीं मनुष्याकृति मूर्ति मुसलमानांनीं फोडलेल्या आहेत. बुद्धाच्या मूर्तीचें एक मस्तक आढळलें त्याच्या जटा फार सुंदर रीतीनें दाखविल्या होत्या. हिंदुस्थानांतील नकशी कामाचा तो एक फार उत्तम नमुना होता.

कनिंगह्यॅम म्हणतो कीं दुसऱ्या कोणत्याहि स्थलापेक्षां राणीगत हेंच एओर्नास असें म्हणण्यास आधार आहेत. एओर्नास हा किल्ला बझारिआ आणि एमबोलिम यांच्या मध्यें होता; त्याजवर जाण्यास एकच रस्ता डोंगर खणून केलेला होता; चढण कठिण होती; व त्यावर पाण्याचा एक झरा होता. इतक्या सर्व गोष्टी राणीगतशीं मिळतात.

### परशावर किंवा पेशावर शहर

६३० मध्यें गांधारचें राज्य कापिसाच्या ताब्यांत

होतें. तथापि पेशावर शहर मोठें होतें. त्याचा घेर सुमारें सात मैल होता. याच्या नांवाविषयीं पूर्वीं लिहिलेंच आहे. अकबरनें तें नांव बदलून पेशावर केलें. याचा अर्थ सीमेवरचें शहर असा होतो. अबूल फजल यानें दोन्ही नांवें लिहिलीं आहेत.

ख्रिस्ति शकाच्या आरंभीं एथे बुद्धधर्मसंबंधें पूज्य अशा वस्तु म्हणजे एक बुद्धाचें भिक्षापात्र आणि दुसरें आग्नेयीस १½ मैलावर असलेलें पिंपळाचें झाड ह्या होत्या. शाक्य बुद्धानें पुढें कानिष्क नांवाचा मोठा राजा होईल असें भविष्य केलें तेव्हां तो ह्या झाडाखालीं बसला होता अशी कथा आहे. संगयून ह्यानें ह्या झाडाचें वर्णन केलें आहे. ह्याखालीं बुद्धाच्या ४ मूर्ति होत्या. व बुद्धाचे अवशेष एका ताम्रपात्रांत घालून तें तेथे पुरून, कोणीं घेऊं नये म्हणून त्यावर हा वृक्ष लाविला असें तो म्हणतो. बाबरनें बेग्रामचें मोठें झाड १५०५ मध्यें मुद्दाम पाहिल्याचें लिहिलें आहे, तें हेंच असावें. यावरून तेव्हां तें सुमारें १५०० वर्षांहून जास्त कालाचें असावें. १५९४ मध्यें अबूल फजलनें त्याचा कांहीं उल्लेख केला नाहीं. यावरून तेव्हां तें मेलें असावें. या वृक्षाच्या अगदीं जवळ दक्षिणेस कानिष्कचा मोठा स्तूप होता. तो सर्व प्रवाशांनीं वर्णिला आहे. फाहिआननें इ० स० ५०० मध्यें लिहिलें आहे कीं, तो ४०० फूट उंच व फार सुंदर होता. त्यासारखा सर्व हिंदुस्थानांत दुसरा स्तूप नाहीं, अशी त्याची कीर्ति होती. संगयून, हुएनसंग यांनींहि त्याचें वर्णन केलें

आहे. त्यांत बुद्धाचे पुष्कळ अवशेष होते. सांप्रत त्यांच्या कांहीं खुणा नाहींत. त्याच्या जवळ एक विहार होता. १० व्या शतकांत मगधचा राजा वीरदेव तिकडे गेला होता, तेव्हां तो बौद्ध धर्माचें प्रख्यात विद्यास्थान अशी त्या विहाराची कीर्ति होती.

## ७. उद्यान किंवा स्वात

उतखंड एथून उत्तरेस १०० मैलांवर Supofastna शुभवस्तु किंवा सुवास्तु म्हणजे सांप्रतची स्वात ह्या नदीवर उचन म्हणजे उद्यान एथे हुएनसंग गेला. तो प्रांत चांगला सुपीक होता व त्यांत पाणी विपुल होतें असें त्यानें लिहिलें आहे. ही गोष्ट स्वात नदीवरील प्रांताच्या स्थितीशीं मिळते. तो प्रांत काश्मीरच्या खालोखाल आहे असें तेथील लोकांचें म्हणणें आहे. हुएननें त्याचा घेर ८३३ मैल लिहिला आहे. यावरून त्यांत सांप्रतचे पंजकोरा, बिजावर, स्वात आणि बुनीर हे प्रांत येत असावे.

फाहिआन लिहितो कीं उद्यानच्या दक्षिणेस सुहो-

---

१. बुद्धाच्या शरीराचा कोणताहि भाग–केश, नख इत्यादि सुद्धां–व त्याचें भिक्षापात्र इत्यादि त्याच्या संबंधाच्या हरएक वस्तु यांचें बौद्ध लोकांत फार महत्त्व असे. असे स्मारक अवशेष ज्यांस सांपडतात, तें अति भाग्यवान् अशी समजूत असे. बुद्धाचे मुख्य अवशेष ८ द्रोण वजन होते. व ते निरनिराळ्या ८ स्थळींच्या लोकांस मिळाले होते अशी कथा आहे. मोठे स्तूप बांधून त्यांत ते मोठ्या बंदोबस्तानें ठेवित.

२. बौद्ध धर्माचे जती रहाण्याकरितां मोठमोठीं गृहें बांधिलीं असतात त्यांस विहार म्हणतात.

टो म्हणून लहान प्रांत होता. हें नांव स्वात असें साधारणतः मत आहे. परंतु ही बुनीर नदीची खिंड असावी. कारण ससाण्यास देण्याकरितां बुद्धानें आपल्या शरीराचें मांस तोडलें इत्यादि "श्येन कपोत आणि बुद्ध" यांची कथा फाहिआननें या स्थलासंबंधें लिहिली आहे, ती महाबन डोंगराच्या वायव्य पायथ्यास म्हणजे बुनीर खिंडींत घडली असें हुएनसंगनें लिहिलें आहे. बुद्ध हा तेव्हां शिबिक नामक राजा होता असेंहि त्यानें सांगितलें आहे.

उद्यानची राजधानी मंगल होती. ती जनरल कोर्टच्या नकाशांतील मंगलोरा व विलफोर्डच्या सर्व्हेअरनें लिहिलेली मागोरा असावी. हुएन तिच्या ईशान्येस ४२ मैल गेल्यावर शुभवस्तूचा उगम लागला, तेथून त्याच दिशेनें १२९ मैल गेल्यावर एक पर्वत ओलांडून आणि सिंधूंतून वर जाऊन तो उद्यानची प्राचीन राजधानी दारेल एथे पोंचला. दारेल ही सांप्रत सिंधूच्या पश्चिमेस एक खिंड आहे. तींत दार्द किंवा दरद नांवाचे लोक रहातात. त्यांच्या हल्लीं ३ जाती आहेत. ह्या प्रांतांत बुद्ध मैत्रेय याची एक लांकडी मूर्ति* होती. ती बुद्धाच्या निर्वाणानंतर ३०० वर्षांनीं अशोकाच्या वेळीं जेव्हां बौद्ध धर्माचा प्रसार झाला, तेव्हां स्थापिली असें फाहिआन लिहितो. ती १०० फूट उंच होती असें हुएन लिहितो.

## ८. बोलर किंवा बालटी

डारेल एथून ८३ मैलांवर सिंधूच्या प्रदेशांत पो-

* शिवि.

लूलो एथे हुएन गेला. तेथे सोनें सांपडतें असें लिहिलें आहे. ह्या व इतर वर्णनावरून तो हल्लींचा बाल्टी प्रांत म्हणजे लहान तिबेट होय. दर्द लोकांस तो पोलूलो या नांवानेंच माहित होता. त्याचा घेर ६६६ मैल होता. लांबी सिंधुनदापासून पूर्व-पश्चिम आहे. आणि रुंदी देओसे पर्वतापासून काराकोरमपर्यंत ८० मैल आहे.

## ९. फालाना किंवा बानू

गिजनीहून १५ दिवसांच्या वाटेवर आग्नेयीस फालाना नामक प्रांत होता. नगरहारपासून १३ दिवसांच्या वाटेवर पोना म्हणून प्रांत होता, असें फाहिआन लिहितो. यावरून तो बानू होय. त्याचा घेर ६६६ मैल होता. यावरून कुरुम आणि गोमल ह्या नद्यांचे प्रदेश म्हणजे पश्चिमेस कंदाहार आणि गिज़नीपासून पूर्वेस सिंधूपर्यंत प्रांत यामध्यें येत असावे.

टालमीनें बोनागरा म्हणून प्रांत इंडो सिथिआच्या अगदीं उत्तर भागांत जलालाबादेच्या आग्नेय-दक्षिण दिशेस होता असें लिहिलें आहे. यावरून तो, फालाना, आणि हल्लींचा बानू हे एकच होत.

## १०. आपोगिन किंवा अफगाणस्थान

हुएननें फालान आणि गिजनी यांच्यामध्यें गिजनीच्या वायव्येस Opokien अपकिन प्रांत सांगितला आहे. या चिनी शब्दाचें बरोबर रूप अवगान असें होतें. यावरून हें अफगाण होय. हुएननें याचें फारसें वर्णन केलें नाहीं. यावरून तो फालानाचा भाग असावा. अबूल फजल आणि फेरिस्ता यांनीं रोह म्हणून

एक डोंगराळ प्रांत लिहिला आहे त्याचा हा खचित भाग होय. हा प्रदेश अफगाणिस्थानचा आग्नेय भाग आहे. व हें अफगाण लोकांचें एक मूलस्थान असावें असें दिसतें. मेजर रावेरटी यानें आपल्या पुस्तु भाषेच्या कोशांत लिहिलें आहे कीं तो ( रोह ) अफगाणस्थानांतला एक डोंगराळ प्रांत आहे व बलुचिस्थानचाहि भाग आहे. तो गिजनी आणि कंदाहार यांच्यामध्यें आहे. तेथील लोकांस रोहिले किंवा रोहिले अफगाण म्हणतात. हुएनचा अपकिन म्हणजे अफगाण हें खरें असेल तर अफगाण या नांवाचा अगदीं पहिला उल्लेख हाच होय.

## २. काश्मीरचें राज्य

हुएनसंगच्या वर्णनावरून पाहिलें तर ७ व्या शतकांत काश्मीरच्या राज्यांत सांप्रतचा सर्व काश्मीर प्रांत असून शिवाय सिंधु व चिनाब यांमधील प्रदेश दक्षिणेस मिठाच्या डोंगरापर्यंत होता. काश्मीरच्या पश्चिमभागांत उरस, नैर्ऋत्यभागीं तक्षिला आणि सिंहपूर, दक्षिणभागांत पुनक राजुरी, इतकीं संस्थानें तो फिरला. दुसरीं डोंगरी संस्थानें त्यानें सांगितलीं नाहींत. परंतु तीं काश्मीरच्या ताब्यांत असावीं, आणि त्यांची हद्द रावीपर्यंत असावी, असें दिसतें. ब्यासच्या वरील प्रदेशांतील कुलूचें संस्थान दूर म्हणून ताब्यांत आलें नसावें. व ब्यासच्या खालच्या भागावरील जालंदरचें राज्य कनोज एथील हर्षवर्धन राजाच्या ताब्यांत होतें. परंतु ९ व्या शतकाच्या अखेरीस शंकरवर्मा यानें कांग्रा खिंड जिंकली आणि काश्मीरची सत्ता सिंधूपासून

सतलजपर्यंत पंजाबांतील सर्व डोंगरी प्रदेशावर झाली असें राजतरंगिणीवरून दिसतें.

काश्मीर राज्याचा घेर हुएननें ११६६ मैल लिहिला आहे. उत्तरेस सिंधूपासून दक्षिणेस मिठाच्या डोंगरांपर्यंत, आणि पश्चिमेस सिंधूपासून पूर्वेस रावीपर्यंत, इतक्या प्रदेशाचा घेर ९०० मैलांहून कमी नाहीं.

## १. काश्मीरप्रांत

६३१ मध्यें हुएनसंग काश्मीरांत गेला. त्यावेळीं राजधानी जुन्या राजधानीच्या वायव्येस १० ली (२ मैलांहून कमी ) अंतरावर होती. हें सांप्रतचें श्रीनगर होय. हें राजा प्रवरसेन यानें सहाव्या शतकाच्या आरंभीं स्थापिलें. तेव्हां अर्थातच हुएनच्या वेळीं नवीनच होतें. याच्या आग्नेयीस जुनी राजधानी, सांप्रत ज्यास पांड्रथान म्हणतात त्या जागीं होती. पांड्रिथान हा पुराणाधिष्ठान याचा अपभ्रंश होय. काश्मीरांत सांप्रत पान याचा अर्थ पुराण ( जुनें ) असा होतो.

काश्मीरांतले लोक सुंदर परंतु अस्थिर बुद्धीचे, भित्रे, लबाड, असें हुएननें लिहिलें आहे.

काश्मीरचे पूर्वीपासून दोन भाग करितात. एक कामराज आणि दुसरा मेराज. पहिला भाग उत्तरचा व दुसरा दक्षिणचा होय.

## काश्मीरांतील शहरें

श्रीनगर–प्रवरसेनानें नवें शहर बांधून ती राजधानी करण्यापूर्वीं हें शहर काश्मीरची राजधानी होतें. हें

१. प्रवरसेनच्या नव्या शहरासहि हल्लीं श्रीनगरच म्हणतात.

अशोक राजानें ( इ० स० पू० २६३-२२६ ) स्थापिलें असें म्हणतात. हें सांप्रतच्या पांड्रिथानच्या जागीं नदीतीरानें तख्तसुलेमानपासून ३ मैल पसरलें होतें. अशोकाचा पुत्र जलोक यानें श्रीनगरांत ज्येष्ठरुद्राचें देवालय बांधलें होतें, तें तखतिसुलेमानच्या शिखरावर काश्मीरांतलें अति प्राचीन देवालय जें हल्लीं आहे तेंच होय असें काश्मीरांतील सर्व ब्राह्मणांचें मत आहे. ती टेंकडी पूर्वीं ज्येष्ठेश्वर या नांवानें प्रसिद्ध होती. पहिला प्रवरसेन याच्या कारकीर्दींत म्हणजे पांचव्या शतकाच्या अखेरीपर्यंत, हें श्रीनगर काश्मीरची राजधानी होती. हुएनच्या वेळीं हें शहर होतें. परंतु राजधानी नव्हतें. तो म्हणतो कीं त्या राजधानीच्या आग्नेयीस १० ली अंतरावर एका पर्वताच्या दक्षिणेस जुनी राजधानी होती. हें वर्णन पांड्रिठाण व तख्तसुलेमान यांशीं इतकें मिळतें कीं पांड्रिठाण एथेच श्रीनगर ही जुनी राजधानी होती याविषयीं संशय नाहीं. जुन्या शहरांत इ० स० ९२१च्या सुमारें वस्ती होती. कारण तेव्हां राजा पार्थ याचा प्रधान मेरु यानें पुराणाधिष्ठानामध्यें मेरुवर्धन स्वामीचें देवालय बांधलें असें लिहिलें आहे. पुढें अभिमन्यु राजानें शहरास आग लाविली असें लिहिलें आहे. तेव्हांपासून तेथील वस्ती उठली असावी.

**प्रवरसेनपुर**—दुसरा प्रवरसेन राजा यानें ६ व्या शतकाच्या आरंभीं प्रवरसेनपुर नामक नवी राजधानी स्थापिली. त्याच जागीं हल्लींची श्रीनगर राजधानी

---

१. राजतरंगिणी १.१०४. २. राजतरंगिणी १.१२४.

आहे. कल्हण यानें लिहिलें आहे कीं प्रवरसेनपुर राजधानी दोन नद्यांचे संगमावर होती व तिच्या मध्यभागीं एक टेंकडी होती. श्रीनगरच्या मध्यमागीं हल्लीं हरिपर्वत म्हणून टेंकडी आहे व मधून हरा ( किंवा आरा ) नदी वाहते व ती शहराच्या उत्तर सीमेवर बिहात ( झेलम ) नदीला मिळते.

ह्या व इतर गोष्टींवरून प्रवरसेनपुर हें हल्लींचें श्रीनगरच होय यांत अगदींच संशय नाहीं. प्रवरसेनपुर हें नांव जाऊन जुन्या राजधानीचें चालू झालें हें साहजिक आहे. प्रवरसेन मेल्यावर श्रीनगर नांव प्रचारांत आलें असावें.

**खाजिपुर आणि खुनमुष**—हीं राजा **खाजेंद्र** यानें स्थापिलीं असें कल्हण लिहितो. तो अशोकाचा सहावा पूर्वज होता, यावरून इ० स० पू० ४०० च्या सुमारें असावा. मुसलमान ग्रंथकारांनीं लिहिलेली काकपुर आणि गोमोह हींच तीं, असें विल्सन आणि ट्रायर हे म्हणतात. पहिलें खरें. कारण काकपुर शहर हल्लींहि आहे. तें बेहातच्या डाव्या तीरावर तख्तसुलेमानच्या दक्षिणेस १० मैल व पामपुराच्या दक्षिणेस ५ मैलांवर आहे. परंतु दुसऱ्याविषयीं विल्सनचें वर लिहिलेलें मत चुकीचें आहे. सांप्रत पामपुराच्या ईशान्येस ५ मैलांवर खुनमोह म्हणून शहर आहे तें खुनमुष होय.

**बिजबिहार म्ह० विजयहार**—हें जुनें शहर बेहातच्या दोन्ही तीरांवर राजधानीपासून २५ मैल आग्नेयीस आहे. याचें मूळ नांव विजयपार हें होय. वि-

जयेशाच्या देवालयावरून हें नांव पडलें असावें. तें देवळ अद्यापि आहे. परंतु जमिनीच्या सपाटीखालीं १४ फूट आहे. इ० स० पू० २५० मध्यें अशोकानें तें विटांचें होतें तें *दगडांनीं बांधलें.

**शूरपुर** ( सांप्रतचें शूपुर किंवा सोपुर )—हें बेहातच्या दोन्ही तीरांवर आहे. हें वुलर सरोवराच्या अगदीं पश्चिमेस आहे. ह्याचें मूळ नांव कामभव होतें. ह्याच नांवानें तें ९ व्या शतकाच्या आरंभीं प्रसिद्ध होतें. ( राजतरंगिणी ३.२२७ ). अवंतिवर्मा राजा ( इ० स० ८५४–८८३ ) याचा प्रधान शूर यानें तें पुनः बांधिलें. म्हणून त्याचें नांव त्यास पडलें. हें फार जुनें असावें.

**कानिष्कपुर**–हें इंडो सिथियन राजा कानिष्क यानें ख्रिस्तिशकारंभापूर्वी नुकतेंच स्थापिलें ( राजतरंगिणी १.१६८ ). त्याचा अपभ्रंश कानपुर असा होऊन त्याचाहि पुढें अपभ्रंश होऊन हल्लीं हें कामपुर नांवानें प्रसिद्ध आहे.

**हुष्कपुर**–हें कानिष्कचा भाऊ हुष्क किंवा हुविष्क ह्यानें स्थापिलें. बेहात नदीवर बारामुला ( वराहमूळ ) म्हणून शहर सांप्रत आहे तेंच हें असावें. अबूरीहान लिहितो कीं उष्कर म्हणजे बरामुळा शहर हें बेहातच्या दोन्हा तीरांवर आहे. हुएननें त्याचें हुष्कर असेंच नांव लिहिलें आहे. राजतरंगिणींत ( ७.१३१० ) हुष्कर हें वराह किंवा वराहमूळ याच्या जवळ आहे असें लिहिलें आहे. हल्लीं उस्कर किंवा हुष्कर नांवा-

* राजतरंगिणी १.१०५.

चें खेडें बेहातच्या डाव्या तीरावर बारामुलाच्या आग्नेयीस २ मैलांवर आहे. हेंच राजतरंगिणींतलें हुष्कपुर व हें तुरुष्क राजा हुष्क यानें स्थापिलें, असें काश्मीरांतले ब्राह्मण म्हणतात. हल्लीं त्या खेड्यांत एक स्तूप चांगल्या स्थितींत आहे. ललितादित्यानें ( इ० स० ७२३-७६० ) बांधलेला तो हाच* असावा. एथे सुगंधा राणी रहात असे ( इ० स० ९१३ ) असें राजतरंगिणींत ( ६.२५८ ) सांगितलें आहे. ११ व्या शतकांत अबूरिहाननें ह्या दोन्ही शहरांचीं नांवें सांगितलीं आहेत. यावरून तोंपर्यंत दोन्ही प्रसिद्ध होतीं. पुढें राजतरंगिणीमध्यें वराहमूल हें मात्र नांव आढळतें. १२ व्या शतकाच्या आरंभीं हर्ष आणि सुशल यांच्या इतिहासांत त्याचा उल्लेख आला आहे. कनिंगह्यॅम म्हणतो कीं, मूळचें मुख्य शहर नदीच्या डाव्या तीरचें हुष्क हें असावें. व बारामुला ही त्याची शाखा असावी. बौद्ध धर्माचा ऱ्हास झाल्यावर हुष्क एथील विहार रिकामा पडून तें शहर मोडत मोडत येऊन, वैदिक धर्माच्या लोकांचें शहर बारामुला तें वाढलें असावें.

जष्कपुर—कानिष्क आणि हुष्क यांचा भाऊ जक्ष यानें हें स्थापिलें. जुक्रू किंवा झुकुर म्हणून एक शहर राजधानीच्या उत्तरेस ४ मैलांवर आहे. तेंच जष्कपुर असें ब्राह्मण म्हणतात. एथे मुसलमानांनीं जुन्या इमारतींच्या मशिदी केलेल्या सांप्रत आढळतात.

परिहासपुर—हें राजा ललितादित्य यानें स्थापिलें.

* राजतरंगिणी ४.१८८.

( राजतरंगिणी ४.१९४ ). हें सांप्रतच्या संबळ खेड्याजवळ बेहातच्या उजव्या तीरावर होतें. सांप्रत तेथे मोडक्या भिंती वगैरे आहेत. जुन्यांपैकीं एक पूल व एक कालवा हे अवशेष आहेत. राजतरंगिणींत ह्याचें नांव पुनः नाहीं यावरून स्थापणाऱ्यानंतर लागलेंच हें मोडलें असावें.

ललितादित्याचा भाऊ जयापीड यानें जयपुर नामक नगर व एक किल्ला एका सरोवरांत बांधला. व त्या नगरास द्वारावती नांव दिलें. ( रा० त० ४.५०५ ). लोक त्यास अंतर्कोट म्हणत. याचें स्थान आतां माहित नाहीं. परंतु परिहासपुरासमोर बेहातच्या डाव्या तीरावर तें असावें. कारण तेथे अंतर्कोट नांवाचें खेडें हल्लीं आहे. शंकरवर्मा ( इ० स० ८८३–९०१ ) ह्यानें ह्या शहराचे धोंडे आपल्या नव्या शहराकरितां नेले असें म्हणतात. त्यानें बांधलेलें शंकरपुर हल्लीं पथन नांवानें संबळ पुलाच्या नैर्ऋत्येस ७ मैलांवर आहे.

पद्मपुर—ज्यास हल्लीं पामपुर म्हणतात, तें राजा बृहस्पति ( इ० स० ८३२–८४४ ) याचा प्रधान पद्म यानें स्थापिलें. ( रा० त० ४.६९४ ). श्रीनगरच्या आग्नेयीस ८ मैलांवर बेहातच्या उजव्या तीरावर तें आहे. व तें अवंतिपुरच्या वाटेवर अर्ध्यावर आहे. अजून त्यांत चांगली वस्ती आहे.

अवंतिपुर—हें राजा अवंतिवर्मा ह्यानें स्थापिलें. ( इ० स० ८५४–८८३ ). हें राजधानीच्या आग्नेयीस १७ मैलांवर बेहातच्या उजव्या तीरावर होतें. सांप्रत तेथे वंतिपुर नांवाचें लहानसें खेडें आहे. परंतु

त्यांत जुनीं दोन देवळें व पडक्या भिंती वगैरे जिकडे तिकडे आहेत. यावरून हें पूर्वी मोठें शहर असावें. नदीच्या दुसऱ्या तीरास समोरच्या बाजूस पाणथळ प्रदेश आहे. त्यास हल्लीं नवें नगर म्हणतात. तें अवंतिपुर असें म्हणतात. अवंतिपुर नदीच्या दोन्ही तीरांस होतें.

## २. उरस

तक्षिला आणि काश्मीर यांच्या मध्यें उरस प्रांत होता असें हुएन लिहितो. तो टालमीचा वर्स व सांप्रतचा राश ( जो मुझफराबादच्या पश्चिमेस धंटावर मध्यें आहे तो ) होय. हा डोंगराळ प्रांत आहे. शंकरवर्मा ह्यास शेवटची जखम एथेच लागली ( इ० स० ९०१ ) असें राजतरंगिणींत ( ९.४४ ) आहे. ह्या प्रांतांतील शहरें आग्नेय भागांत मानसेरा, मध्यें नोशेरा, दक्षिणेस किशनगड किंवा हरिपुर हीं आहेत. राजधानी तक्षिलापासून ९० किंवा ३३ मैलांवर होती असें हुएन लिहितो. परंतु ती मांगली एथे असावी. ती जुनी राजधानी असें लोक म्हणतात. या प्रांताचा घेर ३३३ मैल होता.

## ३. टाक्सिला–तक्षशिला

या प्रसिद्ध शहराचें स्थान आजपर्यंत माहित नव्हतें. कारण प्लिनीनें सांगितलेलें अंतर चुकलें आहे. प्लिनीच्या सर्व प्रतींत पुष्कलावतीपासून तक्षशिला नगराचें अंतर रोमन ६० ( इंग्लिश ५५ ) मैल लिहिलें आहे. म्हणजे सिंधूच्या पूर्वेस दोन दिवसांच्या वाटेवर हसन अबदल्लाच्या पश्चिमेस हारो नदीवर तें असावें

असें होतें. परंतु तिघांहि चिनी प्रवाशांनीं तक्षशिला हें सिंधूपासून पूर्वेस ३ दिवसांच्या वाटेवर लिहिलें आहे. मोंगल बादशहांचा सिंधूपासून तिसरा मुक्काम कालकसराई एथे होत असे. हल्लींहि लष्कराचा व बाजारबुणग्याचा तिसरा मुक्काम तेथेच होतो. यावरून कालकसराईजवळ कोठे तरी तक्षशिला असलें पाहिजे. कालकसराईच्या ईशान्येस १ मैलावर शहाधेरी म्हणून गांव आहे तेथे ५५ हून जास्त स्तूप, २८ विहार, ९ देवळें, इतक्यांच्या खुणा मला आढळल्या असें कनिंगह्यॅम लिहितो. त्या स्तूपांतून २ तर माणिक्यालच्या प्रसिद्ध स्तूपा एवढे होते. ह्यावरून तक्षशिला एथेच असलें पाहिजे. उहिंदपासून शहाधेरी ३६ मैलांवर आहे. आणि हस्तनगरपासून उहिंद ३८ मैल आहे. मिळून ७४ मैल होतात. तेव्हां प्लिनीच्या L × ( ६० ) बद्दल L × × × ( ८० ) धरले म्हणजे हें बरोबर मिळतें.

टाक्सिलाचें वैभव आणि विस्तार यांविषयीं सर्व ग्रीक ग्रंथकारांनीं पुष्कळ वर्णन केलें आहे. एरियन लिहितो कीं तें सिंधु व बेहात यांच्या मध्यें सर्वांहून मोठें, जास्त वस्तीचें, आणि संपत्तिमान् होतें. स्ट्राबो म्हणतो कीं याच्या आसपासचा प्रदेश दाट वस्तीचा व सुपीक होता. प्लिनी वर्णन करितो कीं तें मोठें प्रख्यात व सखल परंतु सपाट मैदानांत वसलेलें शहर होतें. ह्या सर्व गोष्टी शहाधेरीजवळच्या जुन्या स्थलाच्या स्थितीशीं जमतात.

अलेक्झांडरच्या नंतर ५० वर्षांनीं तक्षशिला एथील

लोकांनीं मगधराजा बिंदुसागर याच्या विरुद्ध बंड केलें. त्यानें आपला मोठा मुलगा बंदोबस्तास पाठविला परंतु बंदोबस्त झाला नाहीं. म्हणून दुसरा मुलगा अशोक यास पाठविलें. त्यास लोक शरण आले. अशोक गादीवर बसला तेंव्हां तक्षशिला एथे ९ कोट संपत्ति होती. इतकीं सोन्याचीं नाणीं असलीं तर सुमारें ९० कोट रुपये झाले. यावरून संपत्ति किती होती हें दिसून येईल. अशोक हा बापाच्या वेळीं एथे त्याचा प्रतिनिधि होता. नंतर अशोकाचा मुलगा प्रतिनिधि होता.

इ० स० पू० २०० च्या सुमारास मौर्यराजांचे वंशजांचा बाक्ट्रियांतील ग्रीकांशीं कलह झाला. त्यावेळीं ग्रीकांचा राजा एंथिडेमिसचा मुलगा डिमेट्रिअस हा होता. पुढें लागलाच तक्षशिला हा युक्रेटायडीसच्या हिंदुस्थानांतील राज्याचा भाग झाला. इ०स०पू० १२६ मध्यें तें ग्रीकांपासून इंडो सिथिअन राजा मूस किंवा अमार यानें घेतलें. त्यांजकडे सुमारें ७५ वर्षें तें राहिलें. पुढें त्यांपासून कुशान जातीच्या कानिष्क नामक इंडो सिथियन राजानें घेतलें. ह्यावेळीं तक्षशिला एथे त्याचा छत्रप असावा. व पेशावर ही राजधानी असावी असें दिसतें. या छत्रपांचीं पुष्कळ नाणीं वगैरे सांपडलीं आहेत. त्यांत तक्षशिला हें नांव ज्यांत आहे असा एक ताम्रपट सांपडला आहे. तक्षशिला याचें तक्खशिला असें पाली रूप होऊन त्यापासून ग्रीकांचें ताक्सिला हें झालें आहे.

इ० स० ४०० मध्यें फाहिआन एथे आला होता. त्यानें लिहिलें आहे कीं एथे बुद्धानें आपलें मस्तक भि-

क्षेत दिलें. त्यावरून शहरास नांव पडलें. ( तक्षशिर किंवा च्युतशिर असें कांहीं नांव त्यानें लिहिलें आहे ). ५०२ मध्यें संगयून तीच दंतकथा लिहितो. हुएन ६३० मध्यें, व ६४३ मध्यें, असा दोन वेळा एथे आला होता. तो वर्णितो कीं शहराचा घेर १० ली ( $1\frac{2}{3}$ मैल ) होता. तेथें राजा नव्हता. तें काश्मीरच्या ताब्यांत होतें. व त्यापूर्वी कापिसाच्या ताब्यांत होतें. जमीन सुपीक होती तींत झरे व पाट यांचें पाणी होतें. विहार पुष्कळ परंतु बहुतेक मोडलेले होते. व थोडकेच जती तेथे 'महायान' चा अभ्यास करित होते. शहरापासून २ मैलांवर अशोकाचा स्तुप होता. बुद्धानें आपलें मस्तक ज्या स्थलीं दिलें तेथे तो बांधलेला होता. ( बुद्धानें पूर्वी १००० अवतारांत १००० वेळा आपलीं मस्तकें एथे दिलीं, असें कोणी म्हणतात. ) वायव्य हिंदुस्थानांत जे ४ स्तुप प्रख्यात होते, त्यांतलाच तो एक होता. हें बुद्धाच्या मस्तकदानामुळें महत्त्वाचें स्थान म्हणून हुएन एथे दुसऱ्यानें दर्शनास आला होता.

यावरून दिसून येईल कीं तक्षशिला हें बुद्धधर्मी लोकांत फार महत्त्वाचें होतें. शिरोदानाच्या कथेवरून नांव पडलें किंवा नांवावरून दंतकथा उत्पन्न झाली ही शंका येते. परंतु नांवावरून दंतकथा उत्पन्न झाली असें दिसतें. कारण बुद्धधर्माच्या पूर्वीचेंच नांव आहे.

तक्षशिला हें नगर भरताचा पुत्र तक्ष यानें स्थापिलें. याचे उल्लेख कोठे आले आहेत याविषयीं पुष्कलावतीच्या वर्णनांत सांगितलेंच आहे.

शहाधेरी एथील अवशेष उत्तर-दक्षिण ३ मैल व पूर्व-पश्चिम २ मैल पसरले आहेत. याच्याहि पलीकडे सर्व बाजूंस पसरले आहेत, परंतु मूळ शहर इतकेंच असावें. यांचे निरनिराळे भाग आहेत त्यांस हल्लींहि निरनिराळीं नांवें आहेत. हे सामान्यतः दक्षिणेस—नैर्ऋत्येकडून ईशान्योत्तरेकडे आहेत. त्याच क्रमानें दक्षिणेकडून पाहिलें तर या भागांचीं नांवें हल्लीं अशीं आहेत:—( १ ) बीर अथवा फीर ( २ ) हतीयाल (३) सिरकापका कोट ( ४ ) कच्चा कोट ( ५ ) बाबरखाना ( ६ ) शिरसकका कोट.

१. बीर खेडें ज्या उंचवट्यावर आहे तो दक्षिणोत्तर ४ हजार फूट व पूर्वपश्चिम २६०० फूट आहे. तो सर्वांत जुना असें लोक समजतात. ह्याच्या पश्चिमेस शहाधेरी खेडें आहे. पूर्वेस तांबडा नाला आहे. इतर भागांपेक्षां यांत जुनीं नाणीं जास्त सांपडतात.

२. बीरच्या ईशान्येस तांबड्या नाल्याच्या पलीकडे हतीयाल ही किल्ल्यासारखी जागा आहे. त्यांत १५ फूट जाडीच्या दगडी भिंती आहेत. त्यांच्या मध्यें मध्यें चौकोनी बुरूज आहेत. ते सर्व अद्यापि चांगल्या स्थितींत आहेत. आंतील एकंदर जागा दोन हजार फूट लांब व एक हजार फूट रुंद आहे.

३. हतीयालच्या उत्तरेस मोठ्या सपाट उंचवट्यावर सिरकापका कोट आहे. ह्याच्या भिंती दगडाच्या १५ फूट जाड आहेत. एकंदर घेर २$\frac{3}{4}$ मैल आहे. सर्व भागांत ही जागा मजबूद व बंदोबस्ताची आहे.

४. सदरहूच्या उत्तरेस कच्चा कोट आहे. हा मातीचा आहे. भिंती ३० पासून ५० फूट उंचीच्या आहेत.

५. बाबरखाना ही जागा वरील जागेच्या पलीकडे आहे. उत्तरेस लुंडी नाला आहे. त्यांत पुष्कळ स्तूप पडलेले आढळतात. हारिआल व सिरकाप यांमधून एक रस्ता येऊन लुंडीच्या कांठच्या एका स्तूपाकडे जातो. तोच अशोकानें बांधलेला शिरोदानाचा स्तूप असावा.

६. बाबरखान्याच्या ईशान्येस लुंडीच्या पलीकडे सिरसुकचा कोट आहे. ह्याच्या भिंती चौकोनी दगडांच्या १८ फूट उंचीच्या आहेत. आंत हल्लीं ३खेडीं आहेत. याच्या पश्चिमेस अर्ध्या मैलावर दोन हजार फूट लांबीची मातीची भिंत आहे. व दुसरी ३५०० फूट लांबीची थोडथोडी हल्लीं आहे. शिरसुकचा घेर बाहेरच्या बांधीव कामासुद्धां ५ मैल आहे.

याप्रमाणें सुमारें ६ चौरस मैल प्रदेशांत मुख्य अवशेष आहेत. असे विस्तृत, चांगल्या स्थितींत असलेले, व महत्त्वाचे अवशेष पंजाबांत दुसरे कोठे नाहींत. स्तूप, विहार इत्यादिकांची संख्या, व विस्तार ह्या गोष्टी तर फारच महत्त्वाच्या आहेत. एथे जुनीं नाणीं व दुसऱ्या जुन्या वस्तु पुष्कळ सांपडतात.

एकंदरींत सिंधु व बेहात यांमध्यें सर्वांत मोठें असें एरियननें लिहिलेलें तक्षशिला शहर हेंच होय. स्ट्राबो आणि हुएन हे तें सुपीक होतें असें म्हणतात. हें वर्णन तांबड्या नाल्याच्या उत्तरेकडील प्रदेशास लागतें. त्यांत हारो नदीचे पाट काढून आणलेले आहेत. १८३२

मध्य बर्न्स एथे उतरला होता. तो म्हणतो कीं शहाघेरी हें खेडें एका खिंडीच्या तोंडाशीं मैदानांत वसलें आहे. हें स्ट्राबो आणि प्लिनी यांच्या वर्णनांशीं मिळतें.

तक्षिला प्रांताचा घेर ३३३ मैल हुएननें लिहिला आहे. पश्चिमेस सिंधु, उत्तरेस उरस प्रांत, पूर्वेस झेलम नदी आणि दक्षिणेस सिन्हापुर प्रांत, ह्या, ह्या प्रांताच्या सीमा होत्या. म्हणजे सिंधु व झेलम यांजकडील बाजू अनुक्रमें ८४ व ९० मैल लांब व उत्तर-दक्षिण बाजू अनुक्रमें ६० व १२० मैल असाव्या. म्हणजे एकंदर घेर ३१० मैल झाला. हा हुएनच्या घेराशीं मिळतो.

## माणिक्याल

हा प्रख्यात स्तूप एलफिन्स्टनच्या प्रवासानें प्रथम माहित झाला. राजा मान किंवा माणिक यावरून हें नांव पडलें अशी दंतकथा आहे. चिनी प्रवाशांनीं याचें नांव दिलें नाहीं परंतु वर्णन दिलें आहे. संगयून लिहितो कीं गांधारच्या राजधानीपासून आग्नेयीस ८ दिवसांच्या वाटेवर तो होता. बुद्धानें आपलें शरीर वाघास दिलें, तें हें स्थल. हुएननें तक्षिलच्या आग्नेयीस ३४ मैलांवर तो असल्याचें सांगितलें आहे. हीं दोन्ही अंतरें माणिक्यालशीं जुळतात. जनरल कोर्ट ह्यास यांत एक लेख सांपडला. त्यांत कानिष्क राजाच्या २० या वर्षी तो बांधला असें लिहिलें आहे. यावरून हें प्रसिद्ध स्थान सुमारें दोन हजार वर्षांपूर्वीचें आहे. हें स्थान जळल्यामुळें नाश पावलें अशी कथा सांगतात. ती एथील अवशेषांवरून खरी दिसते.

## ४. सिंधपुर किंवा केटास

सिंधपुरची राजधानी तक्षशिलच्या आग्नेयीस ११७ मैल होती असें हुएन लिहितो. ती झेलम एथे असावी असें मार्टिन म्हणतो. झेलमच्याजवळ संघोली म्हणून शहर हल्लीं आहे. परंतु हें मैदानांत आहे. आणि हुएननें डोंगरांत असल्याचें लिहिलें आहे. केटास एथे सांप्रत सरोवरें आहेत. तीं पुष्कळ काळापासून प्रसिद्ध आहेत. व हल्लींहि तेथे लोक यात्रेस येतात. हुएनच्या वर्णनांत सरोवरांचा उल्लेख आला आहे. यावरून केटास एथे राजधानी असावी. हें स्थान मिठाच्या डोंगरांच्या उत्तर पायथ्याशीं आहे. या राज्याच्या पश्चिमेस सिंधु, उत्तरेस तक्षिलाचें राज्य, दक्षिणेस झेलम व टाकी ( पंजाब ) चीं मैदानें होतीं. ह्याचा घेर ६०० मैल सांगितला आहे. परंतु मिठाच्या डोंगरांच्या पलीकडे हें असावें असें दिसत नाहीं. म्हणजे घेर ३९० मैल भरतो.

## ५. पुनच

हुएननें हा प्रांत काश्मीरचे पश्चिमेस ११७ मैल सांगितला आहे. काश्मीरचे लोक यास पुनत म्हणतात. विलफोर्डचा सर्व्हेअर मिर्झा मोगल बेग आणि व्हिग्ने हे त्यांत स्वतः गेले होते. ते पुंज आणि पुंच असा उच्चार लिहितात. त्याचें काश्मीरपासून अंतर ७९ मैल आहे. घेर ३३३ मैल हुएन सांगतो. ह्याच्या सीमा पश्चिमेस झेलम, उत्तरेस पीरपंचाळ नांवाची डोंगराची रांग, पूर्वेस व आग्नेयीस राजोरी संस्थान ह्या होत्या. इतक्या प्रदेशाचा घेर १७० मैल आहे.

पुनच नदीच्या उगमाजवळचा प्रदेश धरला तर २०० मैल होतात. डोंगरांतून अंतर मोजल्यानें ३३३ मैल घेर होईल. हुएनच्या वेळीं हें काश्मीरच्या ताब्यांत होतें. पुढें स्वतंत्र झालें. गुलाबसिंगानें तें पुन्हां काश्मीरचे राज्यास जोडिलें.

## ६. राजपुर किंवा राजुरी

ह्याचा घेर ६६७ मैल होता. दक्षिणेस रावीपर्यंत संस्थानें यांत असलीं तर इतका घेर असेल. काश्मीरच्या दक्षिणचीं व आग्नेयीचीं संस्थानें काश्मीरकडे होतीं असें राजतरंगिणींत सांगितलें आहे. राजपुरीचा उल्लेख काश्मीरच्या इतिहासांत पुष्कळ आहे, त्यांतहि ११ व्या व १२ व्या शतकांत फार आहे. त्यावेळीं तें स्वतंत्र होतें. १५ व्या शतकांत हें काश्मीरच्या मुसलमान राजाच्या मुलाच्या स्वाधीन झालें. १८४६ मध्यें त्या वेळचा तेथील संस्थानिक याची सत्ता गुलाबसिंगानें इतकी कमी केली कीं त्यानें इंग्रजी अमलांत कांग्रा प्रांतांत थोडीशी जमीन घेऊन आपलें संस्थान सोडलें.

## पंजाबांतील डोंगरी संस्थानें

हुएनसंग यानें फार थोड्या संस्थानिकांचा उल्लेख केला आहे. कनिंगह्यॅमनें स्वतः माहिती मिळविलेली दिली आहे ती खालीं दिली आहे.

सामान्यतः लोकांच्या म्हणण्यांत हल्लीं पंजाबच्या डोंगरी प्रदेशांत २२ मुसलमानी व २२ हिंदु संस्थानें आहेत. पहिलीं चिनाबच्या पश्चिमेस व दुसरीं पूर्वेस आहेत. पूर्वी यांचे तीन भाग करित असत व प्रत्ये-

कांत जें मुख्य त्यावरून त्यास नांव देत. याप्रमाणें काश्मीर, डोग्रा (Dogra) आणि त्रिगर्त असे तीन भाग होते. पहिल्यांत काश्मीर हा सुंदर प्रदेश आणि सिंधु व झेलम यांमधील सर्व लहान संस्थानें येत. दुसऱ्यांत जमू आणि झेलम व रावी यांमधील दुसरीं लहान संस्थानें येत. तिसऱ्यांत जालंदर आणि रावी व सतलज यांमधील संस्थानें येत. सातव्या शतकापूर्वी अशा प्रकारचे तीन भाग होते असें वाटतें. कारण रावीच्या पूर्वेचीं संस्थानें काश्मीरच्या ताब्यांत होतीं असें दिसत नाहीं. तसेंच उरस, पुनच, आणि राजपुरी हीं काश्मीरच्या ताब्यांत येण्याचे पूर्वी तेथच्या तेथच्या राजांच्या ताब्यांत होती असे उल्लेख आहेत. आणि त्रिगर्त हें स्वतंत्र असें पुष्कळ वेळा राजतरंगिणींत लिहिलें आहे. तसेंच त्रिगर्तच्या इतिहासावरून दिसतें कीं जालंदर टेंकड्यांतील सर्व लहान संस्थानांपैकीं निमीं संस्थानें एकाच वंशापासून निरनिराळ्या वांटण्या झाल्यामुळें झालीं आहेत.

पश्चिम भागांतील म्हणजे काश्मीरच्या ताब्यांतील संस्थानें:—

| | | |
|---|---|---|
| खाक बाम | १. काश्मीर | |
| | २. गिंगल | बेहात नदीवर |
| | ३. मुझफराबाद | ,, |
| | ४. खाजान | कुनिहार नदीवर |
| | ५. गान्ही | ,, |

| | | |
|---|---|---|
| अफगाण | ६. राश | पाखली नदीवर |
| | ७. घंटावर | ” |
| | ८. गंडगर | ” |
| | ९. दरबंद | सिंधूवर |
| | १०. टारवेला | ” |
| गकार | ११. फरवालू | बेहात नदीजवळ |
| | १२. सुलतानपुर | ” ” वर |
| | १३. खानपुर | हारो नदीवर |

खाकबाम संस्थानिकांकडे बारामुळापासूनचा बेहात-चा प्रदेश आहे. तसेंच काश्मीरच्या वायव्येकडील कुनिहार नदीवरील सर्व प्रदेश आहे. हे सर्व मुसलमान आहेत. व मूळच्या रहिवाशांचे वंशज असावे. अफगाण आल्यावर मुसलमान झाले.

पाखली आणि डोर या नद्यांचा प्रदेश काश्मीरच्या नैर्ऋत्येपर्यंतचा अफगाणांकडे आहे. हे सर्व मुसलमान आहेत. या प्रांतांत नुकतेच आले आहेत. अबूल फजलच्या लिहिण्यावरून दिसतें कीं अकबराच्या पूर्वीं पाखलीचा राजा काश्मीरचा ताबेदार होता.

गकारांकडे झेलम नदीवरील खालचा प्रदेश व काश्मीरच्या नैर्ऋत्येपर्यंत हारो नदीवरील प्रदेश आहे. हे मुसलमान आहेत. परंतु अलीकडेच मुसलमान झाले असावे. तैमूरच्या वेळीं त्यांचीं नांवें हिंदूंचीं होतीं. तथापि ते ह्या प्रांतांत पुष्कळ काळापासून आहेत.

मध्य किंवा जमू या भागांतील संस्थानें:—

| | | |
|---|---|---|
| हिंदु | १. जमू | चिनाबच्या पूर्वेस |
| | २. भाओ | ” ” |

| | | |
|---|---|---|
| मुसलमान | ३. रिहासी | चिनाब नदीवर |
| | ४. अकनूर | ,, ,, |
| | ५. पुनच | पुनच नदीवर |
| | ६. राजोरी | टोही ,, |
| | ७. कोटाली | पुनच ,, |
| | ८. भिंबार | डोंगराच्या पायथ्याशीं |
| | ९. खरिआली | भिंबारजवळ |
| | १०. कष्टवार | चिनाबवर |
| | ११. भद्रवार | कष्टवारच्या दक्षिणेस |
| हिंदु | १२. चनेनी | भद्रवारीच्या पश्चिमेस |
| | १३. बंट्राल्ट | चनेनीच्या दक्षिणेस |
| | १४. सांब | बंट्राल्टच्या नैर्ऋत्येस |
| | १५. जसरोटा | ,, दक्षिणेस |
| | १६. तिरिकोट | जसरोटच्या जवळ |
| | १७. मानकोट | बंट्राल्टच्या दक्षिणेस |
| | १८. बदवाल किंवा बांदिवास | |
| | १९. बळावर किंवा बिसोली | |

जमू आणि भाओ हीं शहरें दोघां भावांनीं स्थापिलीं; तीं टोहीच्या दोन्ही तीरांवर समोरासमोर आहेत. टोही ही लहान नदी टेंकड्यांच्या पायथ्याशीं चिनाबला मिळते. तैमूरनें जमू एथील राजा बाटविला, तेव्हांपासून गेल्या शतकाच्या अखेरपर्यंत जमूचा मुसलमानांच्या इतिहासांत पुष्कळ उल्लेख आहे. रणजितसिंगाच्या दरबारांतले तिघे बंधु गुलाबसिंग, ध्यानसिंग आणि सुचेतसिंग हे ह्या घराण्यांतील धाकट्या शाखेंतले होते.

गुलाबसिंगाचा मुलगा हल्लीं काश्मिरांत पश्चिम व दक्षिण संस्थानांत राज्य करितो.

रिहासी आणि अकनूर एथील संस्थानिक जमूच्याच घराण्यांतले व त्याचे ताबेदार असत. पुनच हें कधीं काश्मिरच्या ताब्यांत व कधीं स्वतंत्र असे. राजूरी आणि कोटाली हीं काश्मिरच्या घराण्यांतील दोन शाखांकडे काश्मिरच्या ताब्यांत असत. परंतु मध्यावधीमध्यें हिंदु राजांच्या अमलांत कोटाली हें पुनचचा एक भाग असे. दोन्ही एकाच खोऱ्यांत आहेत. भिंबार आणि खरिआली एथील संस्थानिक, कांग्रा आणि जालंदर एथील सोमवंशी राजांची चिभान शाखा हींतलेच होते. ते अलीकडे मुसलमान झाले असावे. ह्या डोंगरी संस्थानांतले राजे मुसलमान झाल्यावर आपलीं हिंदु नांवें कायम ठेवित. कष्टवार आणि भद्रवार हीं चिनाब नदीच्या वरील भागीं दोन्ही तीरांवर काश्मिरच्या आग्नेयीस आहेत. व त्याच्याच तीं ताब्यांत असत. हीं नऊ संस्थानें व पश्चिम भागांतील तेरा मिळून पश्चिम भागांतील २२ संस्थानें होतात.

बाकी आठ संस्थानांची विशेष माहिती नाहीं. शीकांच्या अमलांत बहुतेक नाहींशीं झालीं. व तीं सर्व आतां काश्मिरच्या राज्यांत जमूच्या घराण्याकडून समाविष्ट झालीं आहेत. बलावर आणि बदवाल हीं एका वेळीं तुक्क याचा मुलगा कलश याजकडेसच होतीं. राजतरंगिणींत ( ७. २२०, ५८९ ) हा बलावरचा राजा असा दोन वेळां उल्लेख आहे ( १०२८—१०८१ ). त्याचें नांव दोन्ही वंशावळ्यांत सांपडतें.

कलशापासून पुढें दोन्ही वंशावळ्यांत नांवें निराळीं आहेत. चंबा एथील राजास काश्मिरचा राजा अनंत यानें मारून शेजारचें राज्य घेतलें; तेव्हां बलावरहि काश्मिरकडे गेलें असावें.

कनिंगहॅम लिहितो कीं, चिभान खेरीज करून बाकी मध्यभागच्या संस्थानांतील राजे मूळचे सूर्यवंशांतले आहेत, असें त्या सर्वांच्या वंशावळ्या मजपाशीं आहेत त्यांजवरून समजतें.

पुढील यादींत पूर्व ( जालंदर ) विभागांतील संस्थानें आहेतः—

| | | |
|---|---|---|
| सोमवंशी | १. कांग्रा | किंवा काटोच |
| | २. गुलर | कांग्राच्या नैर्ऋत्येस |
| | ३. जसवाल | सुहान नदीवर |
| | ४. दतापुर | ब्यासच्या खालच्या भागावर |
| | ५. सिबा | ,, ,, ,, |
| सूर्यवंशी | ६. चंबा | रावी नदीवर |
| | ७. कुलू | ब्यासच्या वरील भागावर |
| पुंडिर किंवा पांड्य | ८. मंदी | ब्यासच्या मधील भागावर |
| | ९. सुकेट | मंदीच्या दक्षिणेस |
| | १०. नूरपुर | रावी व ब्यास यांच्या मध्यें |
| | ११. कोटिल | नूरहारच्या पूर्वेस |
| | १२. कोटलेहार | |

ह्या बारांपैकीं निदान पांच जालंदरच्या राज्याचे भाग आहेत. जालंदरमध्यें बियास आणि सतलज यांच्या मधला दुआब आणि रावी व मंडी आणि सुकेट यांची हद्द यांमधील डोंगरी प्रदेश असत. प्रथम या पूर्व

भागांमध्यें मूळ काय तीं चार संस्थानें होतीं. जालंदर, चंबा, कुलू, आणि मंडी.

## जालंदर

मुसलमानांनीं हा प्रांत व्यापिल्यावर जालंदर संस्थानाची हद्द काय ती त्याच्या डोंगरी प्रदेशांत होती. त्यांतील प्रसिद्ध किल्ला कांग्रा याचेंच नांव त्या प्रदेशास होतें. या प्रांतास त्रिगर्त असेंहि म्हणतात. ( जालंदरास्त्रिगर्तास्युः—हेमकोश ). सातव्या शतकामध्यें हुएननें जालंदरची पूर्वपश्चिम लांबी १६७ मैल आणि उत्तरदक्षिण रुंदी १३३ मैल सांगितली आहे. हें खरें असेल तर यांत उत्तरचें चंबा, पूर्वेचीं मंडी आणि सुकेट आणि आग्नेयीचें शतद्रु हीं येत असावींत. शतद्रु हें सतलजच्या पूर्वेस आहे. जालंदर हीच राजधानी होती; हें प्राचीन आहे. टालमीनें याचा उल्लेख केला आहे. जालंदर दैत्याची ही राजधानी होती. तो तपश्चर्येनें अजिंक्य झाला, तेव्हां शिवानें त्यास कपटानें जिंकिलें; आणि त्याचें शरीर योगिणींनीं भक्षिलें; असें पद्मपुराणांत, उत्तरखंडांत सांगितलें आहे. परंतु जालंदरपुराणांत सांगितलें आहे कीं, " शिवानें त्याजवर पर्वत टाकून त्यास मारिलें. त्याचें तोंड ज्वालामुखीखालीं होतें. त्याच्या तोंडांतून ज्वाला निघाल्या. त्याची पाठ दुआबाच्या वरच्या भागांत होती. ( त्या भागास अद्यापि जालंदरपीठ असें लोक म्हणतात. ) आणि त्याचे पाय दुआबाच्या खालच्या भागांत मुलतान एथे होते " अकबरानें दोआबांस नांवें देते वेळीं ह्या कथेचा थोडासा आश्रय केला आहे असें

दिसतें. कारण सतलज व ब्यास ह्यांच्या मधील देशास सँब दोआब म्हणावयाचें त्याच्या बदला बिस्टजालंदर किंवा बिटजालंदर दोआब असें नांव दिलें आहे.

जालंदर आणि कांग्रा एथील घराणें हिंदुस्थानांतल्या फार प्राचीन घराण्यांपैकीं आहे. मूळपुरुष सुशर्मचंद्र यापासून पुढील वंशावळ ही रजपुतान्यांतील प्रख्यात घराण्याच्या वंशावळ्यांपेक्षां जास्त विश्वसनीय आहे. या घराण्यांतील सर्व निरनिराळ्या शाखा सोमवंशांतल्या म्हणवितात व आपल्या पूर्वजांनीं मुलतान प्रांतावर राज्य केलें व भारती युद्धांत कौरवांकडचे ते होते असें ते म्हणतात. त्या युद्धानंतर त्यांचा देश गेला. व सुशर्मचंद्राबरोबर या जालंदर दोआबामध्यें येऊन राज्य स्थापून कांग्रा किल्ला बांधिला असें ते म्हणतात.

पांचव्या शतकाच्या अखेरीस त्रिगर्तचें राज्य काश्मिरच्या राजानें प्रवरेश यास दिलें. ( राजतरंगिणी ३. १०० ). सातव्या शतकांत तेथील राजा उदित यानें हुएनसंगचा सत्कार केला. इ० स० ८०४ मधील एका कोरींव लेखांत तेथील राजाचें नांव जयचंद्र असें आहे. तो वंशावळींतला आदिम (हुएनचा उदित हाच असावा.) यापासून सातवा आहे. काश्मिरचा राजा अवंत (१०२८–१०८१) यानें जालंदरचा राजा इंदुचंद्र याच्या दोन कन्या वरिल्या ( राजतरंगिणी ७. १९० ). हा इंदुचंद्र कां-

* नद्यांच्या नांवाच्या प्रथमाक्षरावरून त्यांमधील दोआबांस नांवें ठेविलीं आहेत. जसें:—चिनाब व झेलम यांमधील दोआबास चजि दोआब, रावी आणि चिनाब यांमधल्यास रचना दोआब इत्यादि.

ग्राच्या वंशावळींतला इंद्रचंद्र होय. ह्यावरून मुसलमानांच्या पूर्वी हें स्वतंत्र संस्थान असावें असें दिसून येतें.

गुलर, जसवाल, दतारपुर आणि सिबा हीं लहान संस्थानें कांग्रापासून निघालीं. गुलर ( हरिहरपुर ) हें इ०स० १४०० मध्यें हरिश्चंद्र यानें आपला धाकटा भाऊ कर्मचंद्र यास देऊन निराळें केलें. बाकीचीं मुसलमानापर्यंत मुख्यास खंडणी देत असत. महंमद गजनवीनें कांग्रा किल्ला जिंकिला तेव्हां त्यांस स्वतंत्र होण्याची संधि सांपडली. हीं संस्थानें दिल्लीच्या ताब्यांत असत असें दिसतें.

## चंपा किंवा चंबा

हा मोठा प्रांत आहे. रावीच्या सर्व शाखांवरील प्रदेश आणि वरील चिनाबच्या प्रदेशांतील कांहीं भाग इतक्यांचा यांत समावेश होतो. याची प्राचीन राजधानी बुधील नदीवर वर्मपुर अथवा वर्मावर ही होती. तेथे अजून पुष्कळ देवळें व एक नदी आहे. कोरींव लेखावरून हीं देवळें ९ व्या व १० व्या शतकांतील असावीं. राजतरंगिणींत या संस्थानाचा चंपा या नांवानें पुष्कळ वेळा उल्लेख आला आहे. व त्या प्रत्येकाचा चंपाच्या वंशावळीशीं मेळ आहे. काश्मिरचा राजा अनंत यानें यावर स्वारी करून एथील राजा साल यास मारिलें. त्याच्या मुलानें चंपापुर ही नवी राजधानी केली. चंपावती देवीच्या नांवावरून तें नांव पडलें. चंबा या नांवानें तें अजून त्या प्रांताचें मुख्य शहर आहे. पुढें काश्मिरच्या राजानें चंबा घराण्याशीं विवाहसंबंध केला. (राजतरंगिणी ७. २१८; ७.५८९,

१५२० ). पुढें मुसलमानांच्या स्वाऱ्यांच्या वेळीं तें स्वतंत्र झालें; व या शतकाच्या आरंभीं गुलाबसिंग तें घेईपर्यंत स्वतंत्र होतें.

## कुलू

जालंदरच्या उत्तरेस ११७ मैलांवर हुएननें कुलुतो संस्थान सांगितलें आहे. हें ब्यासच्या वरील खिंडीतील कुलू प्रांताशीं मिळतें. विष्णुपुराणांत ( २ . ३ ) उलूत किंवा कुलूत लोक वर्णिले आहेत. हेंच रामायण व बृहत्संहिता ( १४ . २९ ) यांतील कुलूत असावें. हा शब्द चिनी शब्दाशीं मिळतो. यावरून कुलू हा कुलुत याचा अपभ्रंश असावा. घेर ५०० मैल सांगितला आहे. हा जास्त आहे तरी मंडी आणि सुकेट आणि सतलजच्या दक्षिणेकडील कांहीं प्रदेश या राज्यांत होता, असें म्हणतात, त्यावरून तें खरें असावें. हल्लींची राजधानी सुलतानपुर आहे. जुनी राजधानी मकरसा हीस अद्यापि नगर असें म्हणतात. हुएन म्हणतो कीं ह्यांत सोनें, रुपें, तांबें सांपडतें. परंतु हें अंशतः खरें आहे. रेती धुवून सोनें सांपडतें. परंतु तें फार थोडें सांपडतें. रुपें व तांबें यांच्या खाणी आतां रद्द पडल्या आहेत.

## मंडी आणि सुकेट

हें आरंभीं एकच संस्थान होतें. याच्या पश्चिमेस कांग्रा, पूर्वेस कुलू, उत्तरेस धवलधार पर्वत आणि दक्षिणेस सतलज नदी. मंडी ह्याचा अर्थ बाजार असा आहे; व हें रहदारीच्या रस्त्यावर असल्यामुळें त्या-

पाराकारितां प्रसिद्ध आहे. ह्यांत लोखंडाच्या खाणी ह्याच्या जवळ असल्यामुळें याची जास्त भरभराट झाली असावी.

## नूरपुर किंवा पठानीर

जहांगीरची स्त्री नूरजहान हिच्या नांवावरून हें नांव पडलें. मूळचें नांव दहमिरी होतें. इब्राहिम गजनवीनें एथील किल्ला घेतला. या प्रांताचें नांव पठावत आहे; आणि जुनी राजधानी पथीयानी ( हल्लींचें नांव पठाणकोट ) होती. इ० स० १८१५ मध्यें रणजितसिंगानें हें राज्य घेतलें. तेव्हांच कोटिला हेंहि घेतलें. कोटलेहार हें बहुधा कांग्राच्या ताब्यांत असे.

## शतद्रु

शतद्रु प्रांताचा घेर ३३३ मैल होता. राजधानी कुलूच्या दक्षिणेस ११७ मैल व वैराटच्या ईशान्येस १३३ मैल होती. परंतु कुलू आणि वैराट यांमध्यें नकाशावर ३३६ मैल व पायरस्त्यानें ३६० मैल अंतर आहे. तेव्हां हुएनच्या लिहिण्यांत कांहीं तरी चुकी असावी. शतद्रूची राजधानी सरहिंद असावी. सरहिंद हें प्राचीन शहर आहे असें इतिहासावरून व दंतकथांवरून दिसतें. एथील अवशेष मुसलमानांच्या वेळचे आहेत. परंतु महंमद गोरीनें ह्यास वेढा घातला होता यावरून हें महत्त्वाचें असावें. गजनी आणि लाहोर या मुसलमान व हिंदु राज्यांच्या सीमेवर असल्यावरून त्यास तेव्हां तें नांव पडलें, असें पुष्कळ लोकांचें म्हणणें आहे. परंतु ह्याहून तें प्राचीन असावें. कारण वराह-

मिहिरानें कुलूनंतर व ब्रह्मपुराच्या पूर्वी सैरिंध* सांगि-
तलें आहे. ब्रह्मपुर हें हरिद्वाराच्या उत्तरेच्या डोंगरी
प्रांताचें मुख्य शहर होतें असें हुएनसंगच्या लेखावरून
दिसतें. यावरून सरहिंदच्या प्रदेशांत सैरिंध लोक अ-
सावे. वराहमिहिरानें पाराशर तंत्रावरून लिहिलें आहे
यावरून सरहिंद हें प्राचीन असावें.

शतद्रु प्रांताच्या पश्चिम हद्दीवर मोठी नदी होती
असें हुएन लिहितो तें जमतें. अंतरावरून हनसी हें
शतद्रु असें कदाचित वाटेल; परंतु तें नदीपासून १९०
मैल आहे. भाटनेरचें अंतर, वैराटपासून दिलें आहे त्या
अंतराशीं मिळतें. परंतु प्रांतांत सोनें सांपडतें असें त्यानें
लिहिलें आहे, ही गोष्ट सरहिंदच्या उत्तरेकडील टेंक-
ड्यांस लागू पडते. तेथे सतलजच्या लहान शाखांत थोडेंसें
सोनें सांपडतें. यावरून सरहिंद प्रांत हाच शतद्रु होय.

सतलज नदी शतद्रु प्रांताच्या उत्तरेस व पश्चिमेस
१०० मैलपर्यंत म्हणजे सिमल्याच्या जवळून लुधिया-
नाच्या खालील तिहारपर्यंत असावी. दक्षिणेस तिहा-
रापासून अंबालापर्यंत १०० मैल लांबी व पूर्वेस अंबा-
ल्यापासून सिमल्यापर्यंत १०० मैल मिळून ३०० मैल
घेर होतो. सतलजच्या पूर्वेचें एवढें मात्र संस्थान हुएन-
संगनें उत्तरहिंदुस्थानांत धरलें आहे, यावरून हें जालं-
दरच्या ताब्यांत असावें.

## टाकी म्हणजे पंजाब

हुएनसंगनें लिहिलेलें Tsakia चें राज्य हें टाकी-
चें म्हणजे पंजाबचें होय. ह्या राज्यांत सिंधूपासून व्या-

* बृहत्संहिता १४.२९.

सपर्यंत व उत्तरेकडील पर्वतांच्या पायथ्यापासून मुलतानच्या खालीं पांच नद्यांचा संगम होतो तेथपर्यंत सर्व प्रदेश येत असे. सातव्या शतकांत राजधानी टाकी ही होती. तीहून प्राचीन राजधानी शेकिआलो, हिच्या जवळ होती. शेकिआलो ही भारतांतील शाकल आणि एरियनची संगल असें प्रो० लायन यानें सिद्ध केलें आहे. शाकल एथील लोकांस महाभारतांत मद्र, अरट्ट जर्तिक, वाँहीक हीं नांवें आहेत. आणि हेमचंद्रकोशांत वाहिकांस† ' टक्क ' असें नांव आहे. राजतरंगिणींत ( ५.१५० आणि ५.१५५ ) टक्कदेश हा गुर्जर ( चिनाब नदीजवळचें गुजराथ ) च्या राज्याचा एक भाग होता. तो काश्मीरच्या राजास देणें अलरखानास भाग पडलें ( इ० स० ८८३–९०१ ) असें लिहिलें आहे. यावरून टक्कांची राजधानी शाकल ही होती; व देशाचें नांव टक्कदेश असावें. इ० स० ९१५ मध्यें मसाऊद ह्या मुसलमान ग्रंथकारानें टाकीन शब्दाचा प्रयोग पंजाबास अनुलक्षून केला आहे. झेलम आणि रावी ह्यांमधील डोंगरांत टाक किंवा टक्क नांवाचे शेतकरी जातीचे लोक अद्यापि आहेत. तसेंच या सर्व प्रांतांत बामियनपासून जमूपर्यंत जी जुनी देवनगरी लिपी चालते तिला टाकरी असें नांव आहे. तें टाक लोकांवरूनच पडलें असावें.

---

* पंचानां सिंधु षष्ठानां नदीनां येंतराश्रिताः । तान् धर्मबाह्यान शुचीन् वाहीकान्परिवर्जयेत् ॥ ७ ॥ अरट्टा नाम ते देशा नष्टधर्मा न तान् भजेत् ॥ ३२ ॥ भारत, कर्णपर्व, अध्या० ४४. मद्र, जर्तिक हीं नांवें दुसरे स्थळीं आहेत.

† वाहीकाष्टक्कनामानः ।

या व दुसऱ्याहि कांहीं प्रमाणांवरून टाकी म्हणजे सांप्रतचा पंजाब असें कनिंगह्मनें सिद्ध केलें आहे.

सातव्या शतकांत ह्या राज्याचे तीन विभाग होते. (१) टाकी हा उत्तर व पश्चिम भागीं. (२) शारकोट हा पूर्वेस. व (३) मुलतान हा दक्षिणेस. टाकी या विभागांत सिंधु व ब्यास यांमधील प्रदेश म्हणजे सर्व चाज दुआब आणि सिंधसागर, रिचना व बारी ह्या दुआबांचे वरील भाग इतका प्रदेश येत असे. त्या दुआबांचे मधले भाग शारकोटमध्यें आणि खालचे भाग मुलतानमध्यें येत असत. मुलतानमध्यें सिंधूच्या पश्चिमेकडील व सतलजच्या पूर्वेकडीलहि कांहीं प्रदेश येत होता.

### १. टाकी किंवा उत्तर पंजाब

ह्यांत शिकंदर, बुद्ध यांच्या संबंधानें प्रसिद्ध व दंतकथांमुळें प्रसिद्ध अशीं पुष्कळ शहरें येतात. तीं निरनिराळ्या दुआबांतलीं खालीं देतों.—

| दुआब | शहर | | हल्लीचें नांव |
|---|---|---|---|
| सिंधसागर | १. जोबनाथनगर किंवा भेडा | | |
| | २. बुकेफाला | ,, | दिलावर |
| चाज | ३. निकिआ | ,, | मांग |
| | ४. गुजराथ | | |
| रिचना | ५. शाकल | ,, | संगल |
| | ६. टाकी | ,, | अशरूर |
| | ७. नरसिंघ | ,, | रानशी |
| | ८. अमाकाटीस | ,, | अंबाकापी |
| बारी | ९. लोहावर | ,, | लाहोर |
| | १०. कुशावर | ,, | कुसूर |
| | ११. चिनापटी | ,, | पटी |

## जोबनाथ नगर किंवा भेडा

सांप्रतचें भेडा शहर जेहलमच्या डाव्या किनाऱ्यावर आहे. परंतु त्यासमोर उजव्या किनाऱ्यावर अवशेष आहेत, त्यांस जुनें भेडा किंवा जोबनाथ नगर म्हणतात. हें राजा जोबनाथ किंवा चोबनाथ याचें नगर होतें. भेडा एथे मीठ वाहणारे लमाणांचे मोठाले प्रसिद्ध दोन रस्ते फुटतात. एक लाहोराकडे जातो व एक मुलतानाकडे जातो. यावरून प्राचीनकाळीं एथे राजधानी असावी. शिकंदराच्यावेळीं सोफिटी म्हणून राजा होता. त्याची राजधानी हीच असावी. या प्रांतांत पिंडदादनखान शहर प्रसिद्धीस येण्यापूर्वी हेंच मोठें शहर होतें. बाबरानें पहिली स्वारी यावरच केली. सोफिटी राजाचा प्रांत कोणता याविषयीं सर्व ग्रीक ग्रंथकारांचें एकमत नाहीं. स्ट्राबोनें त्याच्या प्रांतांत मिठाचा डोंगर आहे, त्यांतून सर्व हिंदुस्थानास पुरण्याजोगें मीठ निघतें असें लिहिलें आहे. यावरून बेहात आणि चिनाब यांमधील दुआब मात्र त्याजकडे होता असें नाहीं; तर सिंधसागर दुआबचा वरचा भागहि होता. म्हणजे हल्लींचे पिंडदादन आणि शहापुर हे प्रांत सिंधूपासून चिनाबपर्यंत होते.

ह्या राजाच्या पुष्कळ कथा ग्रीकांनीं लिहिल्या आहेत. तो फार सुंदर व ६ फूट उंच होता. त्याची प्रजाहि फार सुंदर होती. कुरूप संततीस मारून टाकित. त्यानें शिकंदरास एक कुत्रा दिला होता; तो सिंह, हत्ती यांबरोबर लढत असे.

### २. बुकेफाला किंवा दिलावर

शिकंदराची पोरस राजाशीं लढाई झाली, ती कोठे

झाली याविषयीं वाद आहे. व त्याबद्दल पुष्कळांनीं निरनिराळीं मतें दिलीं आहेत. झेलम नदीवर जलालपुरच्या समोर दुसऱ्या तीरावर ती झाली असें एलफिनूस्टननें लिहिलें आहे. झेलम शहराजवळ झाली असें बर्न्स म्हणतो. इ० स० १८३६ मध्यें जनरल कोर्टनें ह्याविषयीं पुष्कळ विवेचन करून ठरविलें कीं शिकंदराची छावणी झेलम एथे होती आणि लढाई पलीकडच्या तीरावर झेलमपासून ८ मैलांवर पट्टीकोटी एथे झाली व पौरसचें सैन्य भिसा एथे होतें. कनिंगह्यॅमचें मत जलालपुर एथे शिकंदराची छावणी होती असें आहे. लार्ड हार्डिंग गव्हर्नर जनरल ह्याचेंहि तसेंच मत होतें.

कनिंगह्यॅम लिहितो कीं इ० स० १८६३ मध्यें मीं स्वतः झेलमपासून जलालपुरपर्यंत नदीचीं दोन्ही तीरें पाहिलीं. झेलमपासून जलालपुरपर्यंत नदीचा प्रवाह ईशान्येकडून नैर्ऋत्येकडे आहे. *जलालपुरपासून झेलम ३० मैलांवर ईशान्येस आहे.

ग्रीक ग्रंथकारांनीं लिहिलेलें लढाईचें व स्थळाचें वर्णन, अंतरें इत्यादि गोष्टींवरून कनिंगह्यॅमनें सविस्तर ‡विवेचन करून असें ठरविलें आहे कीं जलालपुर एथे शिकंदराची छावणी होती; व पोरसची त्याच्या समोर

---

* जलालपुर हें जुनें गिर्झाक होय. रामायणांत गिरिव्रज म्हणून केकय देशाची राजधानी सांगितली आहे (अयोध्याकांड, सर्ग ६८) ती हीच होय, असें कनिंगह्यॅम म्हणतो.

‡ ह्या विवेचनानें कनिंगह्यॅमच्या पुस्तकाचीं मोठ्या सांच्याचीं १८ पृष्ठें भरलीं आहेत. त्याचा सारांश एथे दिला तरी विस्तार होईल. म्हणून निर्णय मात्र सांगितला आहे.

नदीच्या दुसऱ्या तीरीं निकोई एथे म्हणजे सांप्रतच्या मांग गांवाजवळ होती. छावणीपासून नदीच्या कडेनें सुमारें १० मैल जाऊन शिकंदर झेलम उतरला; व पोरसच्या छावणीच्या बाजूस आला तेथे लढाई झाली.

शिकंदराचा घोडा बुकेफाला हा लढाईत मोठी जखम लागून मेला. त्याच्या स्मरणार्थ त्याच्या नांवाचें शहर स्थापिलें. तें सांप्रतचें दिलावर एथे किंवा जलालपुर एथे असावें. जलालपुर एथे होतें, असें म्हणण्यास जास्त आधार आहे.

## निकी–मांग

पोरस याजबरोबर लढाई ज्या जागीं झाली त्या जागीं शिकंदरानें निकी शहर वसविलें तें हल्लींचें मांग होय. तें जलालपुरच्या पूर्वेस व दिलावरचे दक्षिणेस ७ मैल आहे. मांग हें राजा माग किंवा मग यानें स्थापिलें, अशी दंतकथा आहे. तो शकांचा राजा होता असें म्हणतात. त्याचा भाऊ राम यानें रामपुर किंवा रामनगर ( सांप्रतचें रासूल ) वसविलें. तें दिलावरच्या समोर आहे. त्याच्या बहिणीचा मुलगा कामकर हा गिझक ( जलालपुर ) चा राजा होता. मांग एथे हल्लीं जाटांची वस्ती आहे.

तक्षशिला एथील कोरींव लेखांत महाराजा माग याचें नांव आहे. मांग एथे मोआ नांवाचीं नाणीं पुष्कळ सांपडतात. व त्यांवर 'निक' अशीं अक्षरें असतात. यावरून माग राजाची निक एथे टांकसाळ असावी. मागनें तें पुनः बांधिलें असावें. परंतु तें शिकंदरा इतकें जुनें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण इंडो सिथि-

यन राजांचीं पुष्कळ नाणीं तेथे सांपडतात मांग एथे जुनीं नाणीं इतकीं सांपडतात कीं आसपासच्या प्रदेशांत त्यांस मांगशाही असें म्हणतात.

## गुजरात

हें शहर चिनाब नदीच्या पश्चिमेस ९ मैलांवर आहे. तें झेलमहून लाहोरकडे जाणाऱ्या मोठ्या रस्त्यावर आहे. त्याचें मूळ नांव हैराट व प्रांताचें नांव हैराट देश होतें असें म्हणतात. हें अरट्ट असावें. हें शहर बचनपाल नांवाच्या सूर्यवंशी रजपुतानें बांधलें. व पुनः अलीखान नांवाच्या गुजर राजानें दुरुस्त केलें असें म्हणतात. दुसरें नांव गुर्जरचा राजा अलखान, ज्याचा शंकरवर्मा ( इ० स० ८८३–८९० ) यानें पराभव केला, त्याच्याशीं मिळतें. इ० स० १३०३ मध्यें याचा पुनः नाश झाला व पुनः अकबराच्या राज्यांत इ० स० १५८८ मध्यें गुर्जरांनीं बांधिलें असें म्हणतात.

## शाकल–संगल

शिकंदराचें संगल, बौद्धाचें सागल, व भारतांतील शाकल हीं एकच असें पुष्कळ दिवस ठरलें आहे. परंतु त्याचें स्थान समजलें नव्हतें. संगल हें रावीच्या पूर्वेस ग्रीक ग्रंथकारांनीं सांगितलें आहे. परंतु शिकंदर रावी उतरून गंगेकडे जाण्याकरितां निघाला असतां त्यास कळलें कीं काठीआन लोक युद्ध करण्यास तयार आहेत. म्हणून तो परत फिरला. तो रावीच्या पश्चिमेस पुनः आला असावा असें मानिलें तर हुएनसंगनें शाकल हें रावीच्या पश्चिमेस सांगितलें आहे त्याशीं जु-

र्क्ते. शिकंदरानें संगलवर हल्ला केला तेव्हांचें जें वर्णन आहे तें हल्लीं संगल म्हणून टेंकडी रावीच्या पश्चिमेस आहे, तिच्याशीं बरोबर मिळतें. हुएनच्याहि आणखी एका प्रमाणावरून हेंच खरें ठरतें.

इ० स० ६३० मध्यें शाकल हें शहर मोडलेलें होतें. भिंतीचे पाये होते. मध्यमागीं मात्र थोडीशी वस्ती होती. संगल टेंकडी एथील अवशेष कनिंगहॅमनें पाहिले त्यांत १७½ इंच लांब, ११ इंच रुंद व ३ इंच जाड अशा विटा सांपडल्या. यावरून हें फार जुनें असावें. आसपासच्या टेंकड्यांत लोखंड सांपडतें. हुएन यानेंहि लोखंडाचा उल्लेख केला आहे.

भारतांत सांगितलें आहे कीं मद्र देशाची राजधानी शाकल ही इरावतीच्या पश्चिमेस अपगा नदीवर होती. हिच्या पूर्वेस पिहू वृक्षाचें अरण्य होतें असें वर्णन आहे. सांप्रतहि ह्या भागांत पिहू वृक्ष चोहींकडे आहेत.

या देशास मद्रदेश असें अजूनहि म्हणतात. तो ब्यासपासून झेलमपर्यंत किंवा फक्त चिनाबपर्यंत अशीं दोन मतें आहेत. अपगा नदी ही हल्लींची अयक असावी. हल्लीं अशरूर आणि संगल एथे हिला पाणी नसतें. परंतु अशरूरच्या वर २४ मैलांवर तिला शहाजहानच्या वेळेपर्यंत पाणी असे. शहाजहानचा मुलगा दारा यानें तेथून एक कालवा काढला होता. त्यासहि अयक म्हणतात.

हुएन लिहितो कीं पूर्वीं शाकलचें राज्य सिंधूपासून ब्यासपर्यंत व पर्वतांच्या पायथ्यापासून पांच नद्यांच्या संगमापर्यंत होतें.

एथे एक सरोवर किंवा दलदल होती, असें ग्रीक ग्रंथकारांनीं लिहिलें आहे. ती दलदल अजून आहे. पावसाळ्यांत तींत ३ फूट पाणी असते.

## टाकी–अशरूर

इ० स० ६३३ मध्यें ही टाकीची ( पंजाबची ) राजधानी होती. लाहोर आणि पिंडी-भाटीआन यांमधील मोठ्या रस्त्याच्या दक्षिणेस २ मैलांवर ही आहे. हल्लीं एथे फक्त सुमारें ५० घरें आहेत. लोक म्हणतात कीं यास पूर्वी उद किंवा उदनगर म्हणत असत. तें पुष्कळ शतकें लोकांनीं सोडिलें होतें. पुढें अकबराच्या वेळेस उगरशहानें एथे एक मशीद बांधिली. एथे हल्लीं जुन्या इमारती इत्यादिकांचें अवशेष पुष्कळ आहेत. १८ इंच लांब, १० इंच रुंद व ३ इंच जाड एवढाल्या विटा कनिंगहॅमला पुष्कळ सांपडल्या. इंडो सिथियन राजांचीं नाणीं सांपडतात ह्यावरून हें फार प्राचीन असावें. हुएनच्या वेळीं एथे बौद्धधर्मापेक्षां वैदिक धर्माचें विशेष प्राबल्य असे.

## रानशी किंवा नरसिंह

टाकी एथून पूर्वेस नरसिंघो एथे हुएन गेला. अशरूरच्या अग्नेय–पूर्वेस २५ मैलांवर रानशी एथे अवशेष आहेत तेंच *नरसिंह होय.

---

* याचें स्थान निश्चित झाल्यानें, शाकल रावीच्या पश्चिमेस होतें असें सिद्ध करण्याच्या प्रमाणांस जास्त बळकटी येते असें कनिंगहॅम म्हणतो.

## अंबाकापी किंवा अमाकाटीस

तिघे भाऊ आणि ४ बहिणी अशा ७† भावंडांची एक दंतकथा ह्या भागांत फार प्रसिद्ध आहे. त्यांनीं आपल्या नांवाचें एकेक अशीं ७ शहरें स्थापिलीं, असें सांगतात. व त्यांचीं स्थानेंहि हल्लीं दाखवितात. त्यांतून कांहीं ठिकाणीं हल्लीं खेडीं आहेत; हीं सामान्यतः बागवच्छ नदीच्या पश्चिम तीरावर लाहोरपासून २९ मैलांवर आहेत.

## लोहावर—लाहोर

ही सुमारें ९०० वर्षें पंजाबची राजधानी आहे. रामाचा पुत्र लव यानें ही स्थापिली. त्यावरून लोहावर असेंच नांव पडलें म्हणतात. अबुरिहान लोहावर असेंच नांव देतो. त्याचें लवकरच मुसलमानांनीं लाहोर असें रूप केलें. टालमीचें लावोल्का शहर हेंच असावें, असें थार्नटन यानें ठरविलें आहे. हुएनसंगनें याविषयीं कांहीं लिहिलें नाहीं. काबुलांतील ब्राह्मण राजे यांस पेशावर आणि उहिंद एथून काढून दिल्यावर त्यांनीं प्रथम भेडा, नंतर जेहलम व नंतर लाहोर ह्या राजधान्या केल्या. जयपाळ व त्याचा पुत्र आनंदपाळ हे लाहोरचे हिंदु राजे असें फेरिस्ता यानें म्हटलें आहे. महंमद गजनवी याच्या स्वारीच्या संबंधें लाहोरचा स्पष्ट उल्लेख आला आहे. इ० स० १०३१ मध्यें मुसलमानांच्या ताब्यांत तें गेलें. घोर अफगाणांनीं गजनीहून बहिरामाला घालविलें तेव्हां त्याच्या पुत्रानें लाहोर एथे

† यांचीं नांवें शिरकाप, शिरसूक, अंबा, कापी, काल्पी, मुंडी, मांडेही अशीं होतीं.

गादी केली. परंतु दोन पिढ्या राज्य चाललें.यांचे वंशज, गजनवी घराणें समूळ नाहींसें झालें; तेंव्हां ११८० च्या सुमारास नाहींसे झाले.

## कुशावर किंवा कुसूर

रामाचा पुत्र कुश यानें स्थापिल्यावरून याचें नांव कुशावर पडलें. हें हल्लींचें कुसूर होय. तें लाहोरच्या आग्नेय—दक्षिणेस ३२ मैलांवर ब्यासच्या जुन्या पात्रावर आहे. यांत ३२ किल्ले होते असें म्हणतात. पैकीं ७ हल्लीं आहेत. एथे अवशेष फार आहेत ह्यावरून हें प्राचीन असावें.

## चिनापटी किंवा पटी

हुएनसंग टाकीच्या पूर्वेस ८३ मैलांवर हें शहर सांगतो. तें सांप्रतच्या पटीशीं मिळतें. अबूलफझलनें ह्याचें नांव पट्टीहैबतपुर असें लिहिलें आहे. अजून यास हैबतपुर-पट्टी म्हणतात. हैबतखान नामक सरदारावरून हें नांव पडलें असें म्हणतात. हुमायुनाच्या वेळीं तो असावा. एथे जुनीं चिन्हें पुष्कळ आहेत.

हुएननें या प्रांताचा घेर ३३३ मैल सांगितला आहे. म्हणजे या प्रांतांत वरचा बारी दुआब सर्व येत असावा.

## ३. शारकोट

पंजाबच्या मध्यप्रांताचें नांव पाराफाटो व त्याचा घेर ८३३ मैल हुएननें दिला आहे. पंजाबांतील लहान कोस घेतला व ‘ प ’ च्या ठिकाणीं ‘ श ’ मानला म्हणजे हें शारकोटाशीं मिळतें. याच्या मर्यादा पूर्वेस सतलज, उत्तरेस टाकी प्रांत, दक्षिणेस मुलतान

प्रांत, पश्चिमेस सिंधु ५० मैलपर्यंत अशा असाव्या. यांतील प्राचीन शहरें:—
रिचना दुआब—(१) शारकोट (२) कोट कमालिया
बारी ,, (३) हरप (४) अकबर (५)सतगड
जालंदरपीठ.,, (६) दिलापुर (७) अजुधान.

## शारकोट

एथे अवशेषांचा मोठा उंचवटा आहे. रिचना दुआबाचे खालील अंर्धास याचें नांव पडलें आहे. या शहराभोंवतीं जुनी भिंत आहे. तिच्या विटा मोठ्या आहेत. एथे इंडो सिथियन राजांचीं पुष्कळ नाणीं सांपडतात. तसेंच कांहीं हिंदूंचीं व मुसलमानांचीं सांपडतात. यावरून हें प्राचीन असावें. लोक सांगतात कीं १३०० वर्षांपूर्वीं पश्चिमेकडील एका राजानें याचा नाश केला. हें शार राजानें स्थापिलें असें म्हणतात. परंतु त्याविषयीं कांहीं माहिती नाहीं. एरियाना आणि पंजाब एथील ग्रीक राजांच्या वेळीं हें होतें. इंडो सिथियन राजांच्या वेळीं ( इ० स० पूर्वीं १२६ पासून इ० स० २५० पर्यंत ) व पुढेंहि हें भरभराटींत होतें. काबूलच्या ब्राह्मण राजांचीं फार थोडीं नाणीं सांपडतात,यावरून मध्यें हें ओस पडलें असावें. व पुनः १० व्या शतकांत सदरहू राजांनीं पुन्हां स्थापिलें असावें.

## कोट कमालिया

रावीच्या उजव्या तीरावर एकीकडच्या एका उंचवट्यावर हें जुनें शहर आहे. नांव जुनें असो किंवा नसो, शिकंदरानें माली लोकांचें शहर अगदीं प्रथम घेतलें तें हें असावें.

## हरप

कोट कमालियाच्या आग्नेय–पूर्व दिशेस १६ मैलांवर हें आहे. अलेक्झांडर कोट कमालिया घेत असतां त्यानें आपला एक सरदार पुढें पाठविला. त्यानें एक शहर घेतलें तेंच हें असावें. हें राजा हरप यानें बांधिलें. व शारकोट, कोट कमालिया हीं ज्यानें मोडिलीं त्यानेंच हें मोडलें असें म्हणतात. पुढें हें पुष्कळ शतकें ओस पडलें होतें. शारकोटप्रमाणेंच एथे नाणीं सांपडतात. यावरून अरबांनीं इ० स० ७१३ मध्यें मुलतान घेतल्यावर सर्व पंजाब घेतला तेव्हां हीं दोन शहरें मोडलीं असावीं.

## अकबर

हें खेडें लाहोर व मुलतान यांमधील रस्त्यावर आहे. अवशेषांचे दोन उंचवटे आहेत. त्यांत २०×१०×३॥ *एवढाल्या विटा सांपडतात. ह्यावरून हें फार जुनें असावें. कारण अशा विटा अलीकडे पुष्कळ शतकें कोणी करित नाहीं. इ० स० १८२३ मध्यें हें गुलाबसिंगानें पुनः स्थापिलें.

## सतगड

ह्याचा अर्थ ७ सात किल्ले असा होतो. परंतु आतां ते किल्ले नाहींत. जुने बरेच उंचवटे आहेत. जुनीं नाणीं बरींच सांपडतात. हें इ० स० च्या आरंभापासून असावें.

## देपालपुर

दिल्लीच्या पठाण राजांच्या वेळीं हें उत्तर पंजाबचें

---

* याचा अर्थ २० इंच लांब, १० इंच रुंद, ३॥ इंच जाड असा समजावा.

मुख्य शहर होतें. फेरोजशहाचें हें आवडतें शहर होतें. त्यानें शहराबाहेर एक मशीद बांधिली आहे व सतलजचा एक कालवा आणिला आहे. तैमूरच्या वेळेस हें मुलतानच्या खालोखाल होतें. व तेथे ८४ किल्ले, मशिदी, व विहिरी होत्या. आतां बहुतेक मोडलें आहे. जुन्या भागाचा २½ मैल घेर आहे. परंतु पूर्वी याहून जास्त असावा. राजा देवपाळ यानें हें स्थापिलें असें म्हणतात. परंतु त्याचा शक माहित नाहीं. तरी हें फार जुनें असावें. तेथे जुनीं नाणीं सांपडतात; त्यावरून इंडो सिथियन यांच्या वेळचें असावें. टालमीनें डैडल म्हणून शहर सतलज नदीवर लाबोल्का आणि अकबर यांच्या दक्षिणेस होतें म्हणून लिहिलें आहे तें हेंच असावें.

### अजुधान किंवा पाकपतन

सतलजच्या जुन्या पात्रावर व हल्लींच्या प्रवाहापासून १० मैलांवर, डेलापुरच्या नैर्ऋत्येस २८ मैलांवर हें आहे. तें अयुधान नांवाचा राजा किंवा साधु यानें स्थापिलें असें म्हणतात. दुआबाच्या ह्या भागाला अद्यापि सुराटदेश म्हणतात. ह्यावरून ग्रीक ग्रंथकारांनीं लिहिलेले सुराकसी किंवा सुद्रीक लोक एथलेच असावे. यांचा देश व सुद्रीक लोकांचा देश, व व्यास नदीच्या पूर्व तीरावरील उंच प्रदेश एथपर्यंत शिकंदराच्या स्वारीची हद्द प्लिनीनें सांगितली आहे. ही उंच जागा हल्लींच्या सतलजच्या प्रवाहावर हरिकीपटनच्या खालीं सोब्रानजवळ कोठेतरी असावी. एथपर्यंत शूद्रकांचा देश असावा.

पुष्कळ शतकेंपर्यंत अयुधान एथे सतलज नदीवरून उतरण्याची तर होती. महंमुद आणि तैमूर हे एथेच स-

तलन नदी उतरले. सबक्तगीन यानें एथील किल्ला इ० स० ९७७।७८ यांत घेतला. पुन्हा इब्राहिम गजनवीनें १०७९।८० त घेतला. इ० स० १३३४ मध्यें इवन-भतूता यानें अयुधान इतकेंच नांव लिहिलें आहे. हल्लींचें नांव अकबराच्या पूर्वींचें नसावें. तैमूर यानें हें शहर लुटिलें होतें.

### ४. मुलतानप्रांत

मुलतान हा पंजाबांतला दक्षिणचा प्रांत होय. हुएननें त्याचा घेर ६६७ मैल लिहिला आहे. परंतु तो जास्त दिसतो. कदाचित् यांत जास्त प्रांत असतील. अकबराच्या वेळीं ह्यांत १७ परगणे होते. त्यांपैकीं ४ सतलजच्या पूर्वेस होते. मुसलमानी राज्याच्या उतरत्या स्थितींत भावलखान यानें निराळें केलें, तें हल्लींचें भावलपुर संस्थान होय. सातव्या शतकांतहि भावलपुरचा उत्तरभाग मुलतानाकडे असावा. भावलपुरची उत्तर हद्द सिंधु नदीवरील देरादीनपन्हापासून सतलज नदीवरील पाकपट्टणपर्यंत १९० मैल होती. पश्चिमेस सिंधु १६० मैल, पूर्वेस पाकपट्टणपासून घागरनदीच्या जुन्या पात्रापर्यंत ८० मैल, व दक्षिण हद्द खानपुरपासून घागरपर्यंत २२० मैल, मिळून ६१० मैल भरतात. लहान कोस धरले तर हुएननें सांगितलेली हद्द दक्षिणेस मिथुनकोटापलीकडे नसावी.

पंजाबांतील नद्यांच्या प्रवाहांत पुष्कळ फरक झाले आहेत. अकबर व तैमूर यांच्या वेळेस सिंधु आणि चिनाव यांचा संगम हल्लींच्या मिथुनकोट एथील संगमाच्या वर ६० मैलांवर उच्च एथे होता. सन १७८८ त

रेनेल यानें हिंदुस्थानचें वर्णन लिहिलें आहे, तेव्हां व इ० स० १७९६ त विलफोर्डचा सरव्हेअर मिर्झामोगल बेग हा गेला होता तेव्हां तो संगम उच्च एथेच होता. परंतु ह्या शतकाच्या आरंभीं उचच्या वर २० मैलांवर प्रवाह फिरला. तो मिथुनकोट एथे पुन्हां पूर्वीच्या पात्रांत मिळाला. रावी आणि चिनाब यांचा संगम हल्लीं दिवाणसनंद एथे म्हणजे मुलतानच्या वर ३० मैल आहे. परंतु शिकंदराच्या वेळेस हैद्राओती आणि अकिसिनी म्हणजे रावी आणि चिनाब यांचा संगम माली लोकांची राजधानी म्हणजे हल्लींचें मुलतान याच्या खालीं थोड्याशा मैलांवर होता. जुनें पात्र अजून दिसतें. हल्लीं देखील फार पूर असतां रावीचें पाणी जुन्या पात्रांतून मुलतान एथे येतें असें मीं स्वतः दोन वेळां पाहिलें आहे, असें कनिंगहॅम म्हणतो. फरक केव्हां झाला हें समजत नाहीं. परंतु इ० स० ७१३ मध्यें महंमद कासीम यानें मुलतान घेतलें त्यानंतर झाला असावा. कारण जुन्या पात्रांतून नेलेल्या काल्व्यांच्या खुणा अद्यापि दिसतात. यावरून फरक अलीकडेच झाला असावा. कदाचित् तैमूरच्या वेळीं झाला असेल. परंतु चिनाब आणि झेलम यांचा संगम व चिनाब आणि रावी यांचा संगम यांचें अंतर २७ कोश, व चिनाब आणि रावी यांच्या संगमापासून चिनाब आणि सिंधु यांचा संगम ६० कोश याप्रमाणें अंतरें आहेत असें अबूलफजल यानें लिहिलें आहे; हें हल्लींच्या स्थितीशीं जुळतें. यावरून अकबराच्या पूर्वी फरक झाला असावा. व्यास आणि सतलज यांचा ह-

ह्लींचा संगम इ० स० १७९० नंतरचा आहे. इ० स० १७९६ मध्यें सतलज नदीनें धरमकोटापासून आपला मार्ग फिरवून ती हरीकीपट्टण एथे ब्यास नदीस मिळाली. अबूलफजल लिहितो कीं " फिरोजपुराजवळ १२ कोशपर्यंत ब्यास व सतलज एकत्र वाहतात. परंतु पुढें त्यांचे चार भाग होतात. पुढें मुलतानाजवळ पुन्हां एकत्र होतात. " ह्या पात्रांच्या खुणा अजून दिसतात. हे फेरफार सांगितले हे मोठाले मात्र आहेत. लहानसहान फरक नेहमीं होतात. ब्यास नदीमध्यें तर फारच होतात. तिचा स्वतंत्र प्रवाह नाहींसा होऊन ती केवळ सतलजचीच एक शाखा झाली आहे. चिनाब, रावी यांच्या प्रवाहांतहि मोठाले फरक होतात. यामुळें एकदां वसलेलीं शहरें पुनः ओस पडलीं आहेत. सांप्रत वर्णन करण्यासारखीं शहरें आहेत तीं:—

बारी दोआब–( १ ) तुलांब ( २ ) अटारी ( ३ ) मुलतान
जालंदरपीठ –( ४ ) काहरूर
संगमावर —( ५ ) उच्च.

## तुलांब

हें रावीच्या डाव्या तीरावर मुलतानच्या ईशान्येस आहे. भोंवतालीं विटांच्या भिंती आहेत. त्या एक मैलावर जुना किल्ला आहे त्याच्या आणल्या असाव्या. मानसन म्हणतो कीं हा पूर्वीं बळकट किल्ला असावा. त्याप्रमाणें तो होता. त्यास वेढा घातला असतां दिवस मोडतील म्हणून तैमूरलंग तिकडे गेला नाहीं. याच्या भोंवतीं दोन कोट आहेत. त्यांच्या विटा १२×८×२½ ( इंच ) एवढाल्या आहेत. हा किल्ला २०० वर्षांपूर्वी

रावीचें पात्र बदललें, तेव्हां पाणी नाहींसें झाल्यामुळें लोकांनीं सोडिला असावा. विटांचा आकार व दंतकथा यांवरून हें शहर जुनें असावें. जुनें शहर तैमुरलंगानें लुटिलें व लोकांची कत्तल केली; परंतु किल्ला घेतला नाहीं. गिजनीच्या महंमुदानें हा घेतला होता असें म्हणतात. मुलतानास जाणाऱ्या रस्त्यापासून हें शहर जवळच आहे; यावरून तें संभवतें. याच कारणानें शिकंदरानेंहि तें घेतलें असावें. माली लोकांचें शहर घेतल्यावर एक नदी उतरून त्यानें शहर घेतलें तें हेंच असावें.

## अटारी

हें मुलतानास जाणाऱ्या मोठ्या रस्त्यावर तुलांबच्या नैर्ऋत्येस २० मैलांवर आहे. मोडके भाग पुष्कळ आहेत. विटांच्या मोठ्या आकारावरून हें जुनें असावें. हल्लींचें नांव जवळच्या एका नुकत्याच वसलेल्या खेड्याचें आहे. शिकंदरानें माली लोकांच्या स्वारींत जें तिसरें शहर घेतलें व जें ब्राह्मणांचें होतें व ज्यांतील लोकांनीं फार पराक्रम केला असें लिहिलें आहे तें हेंच असावें. शिकंदर याभोंवतीं होडींतून फिरला असें वर्णन आहे. व अतारीच्या किल्ल्याभोंवतीं खंदक आहे त्यावरून हें संभवतें.

## मुलतान

मुलतान शहर पूर्वी रावी नदींतील दोन बेटांवर वसलें होतें. परंतु रावी हल्लीं याच्या वर ३० मैलांवर चिनाबला मिळते. रावी नदीच्या जुन्या पात्राच्या दोन्ही तीरांवर हल्लीं तें वसलें आहे. त्याभोंवताली एक

भिंत आहे व एक किल्ला आहे. नदी, मधून व भोंवता-लींहि वाहत असे. पूर्वीची या शहरांतील जमिनीची उंची आसपासच्या भागांतील जमिनीहून आठ–दहा फूट जास्त होती. हल्लीं सुमारें ५० फूट जास्त आहे. पुष्कळ दिवसांच्या वस्तीमुळें असें झालें असावें.

किल्ल्याचा घेर सुमारें १$\frac{1}{4}$ मैल आहे. सगळ्या शहराचा घेर ३ मैल आहे. व भोंवतालच्या वाड्या धरल्या तर ४$\frac{1}{2}$ मैल आहे. हें ह्युएनसंग व एलफिन्स्तन यांच्या वर्णनाशीं मिळतें. एलफिन्स्तन व बर्न यांनीं हें शहर पाहिलें तेव्हां खंदक नव्हता. परंतु पुढें रणजितसिंगाचा सुभेदार सावनमल्ल यानें तो खणिला. कनिंगह्यॅम लिहितो कीं इ० स० १८५४ त मला भिंतींत दोन भाग दिसून आले. आंतील सुमारें ४ फूट व बाहेरील सुमारें ४ फूट आहे. शहाजहानाचा धाकटा मुलगा मुरादबक्ष यानें भिंत बांधिली असें म्हणतात. ती बाहेरील असावी. भिंती, विटा आणि चिखल यांच्या आहेत. वर चुन्याचा ९ इंच गिलावा आहे.

मुलतानाचीं अनेक नांवें आहेत. त्यांचा विष्णु किंवा सूर्य यांशीं संबंध आहे. किल्ल्याच्या शिखरावर सूर्याचें देवालय होतें. अबूरिहान हा काश्यपपुर, हंसपुर, भगपुर आणि सांबपुर इतकीं नांवें देतो. प्रल्हादपुर आणि आद्यस्थान अशीं आणखी दोन नांवें आहेत. लोक सांगतात कीं काश्यप यानें काश्यपपुर वसविलें. त्याच्या मागें त्याचा मुलगा हिरण्यकशिपु हा झाला. त्याचा पुत्र प्रल्हाद यावरून त्याचें नांव पडलें. प्रल्हादाचा पणतु बाण यापासून कृष्णानें त्याचें राज्य

घेतलें. कृष्णाचा पुत्र सांब यानें एथे मित्रवनांत राहून सूर्याची उपासना केली. तेव्हां त्याचें कोड बरें झालें. त्यानें आद्यस्थान नांवाच्या देवळांत सूर्याची स्थापना केली. तेव्हांपासून मुलतान एथे आजपर्यंत सूर्याची पूजा सुरू आहे. सांबाची कथा भविष्यपुराणांत सांगितली आहे. त्यांत मित्रवन हें चंद्रभागा (चिनाब) नदीच्या कांठीं सांगितलें आहे. सातव्या शतकांत हुएन लिहितो कीं एथें एका भव्य देवालयांत एक सोन्याची मूर्ति होती. तिला हिंदुस्थानांतले सर्व राजे देणग्या देत. प्रथम स्वाऱ्या करणाऱ्या आरब लोकांमध्यें ' सोन्याचें देवालय ' या नांवानें हें प्रसिद्ध होतें. मसाउद तर म्हणतो कीं मुलतान म्हणजे सोन्याचें उपवन. हुएनसंग ह्या शहरास मुलोस्तनपुर असें म्हणतो. हें मूलस्थानपुर याबद्दल आहे असें मार्टिन म्हणतो. तेथील लोकहि मूलस्तान असें म्हणतात. अबूरिहान हा यास मुलतान असेंच म्हणतो. कनिंगह्यॅम म्हणतो कीं अमरकोशांत ब्रध्न असें एक सूर्याचें नांव आहे त्याचा अर्थ मूल असाहि आहे; तेव्हां मूल याचा अर्थ सूर्य असा होऊं शकेल. यावरून मूलस्थानपुर म्हणजे सूर्याच्या देवालयाचें नगर. भग आणि हंस हीं सूर्याचींच नांवें आहेत. तेव्हां भगपुर आणि हंसपुर हीं मुलतान याशीं समानार्थक आहेत. अगदीं पहिलें नांव काश्यपपुर होतें. हें हिराडोटसचें कास्पतुरो व टालमीचें कास्पिरा होय. टालमीनें तें रावी नदीवर तिचा सांडोबाग (चंद्रभागा= चिनाब) शीं संगम होतो, त्याच्या जवळच सांगितलें आहे. हें स्थान काश्यपपुर म्हणजे मुलतान याशीं ब-

रोबर मिळतें. ह्यांचें एकत्व सिद्ध होतें, हें फार महत्त्वाचें आहे. कारण कास्पिरी म्हणून लोक होते. त्यांचें राज्य काश्मीरपासून मथुरापर्यंत होतें. त्याची राजधानी इ० स० १५० च्या सुमारें कास्पिरा म्हणजे मुलतान ही होती असें यावरून सिद्ध होतें. ७ व्या शतकांत त्यास मूलस्थानपुर किंवा मुलतान हें नांव मिळालें होतें. हें मात्र अबूरीहानपर्यंत मुसलमान ग्रंथकारांस ठाऊक होतें. अबूरिहाननें संस्कृतचा अभ्यास केला होता, यामुळें संस्कृत ग्रंथ वाचून माहित झालेलीं दुसरीं संस्कृत नांवें त्यानें दिलीं. भविष्यपुराणांत सांबानें स्थापिलेल्या सूर्याच्या देवालयास आद्यस्थान हें नांव दिलें आहे. परंतु आद्य हें आदित्य ह्याबद्दलहि झालें असावें. प्रऱ्हादपुर ह्या नांवाचा संबंध प्रऱ्हादपुर देवळाशीं आहे. बर्न्स तेथे होता, तेव्हां प्रऱ्हादपुर एथील देवालयांतील देवाचीच विशेषतः लोक भक्ति करित. ह्या देवळास अजूनहि प्रऱ्हादपुर म्हणतात. परंतु इ० स० १८४९ च्या वेढ्यांत दारूखाना पेटून छत उडालें तें पुनः नीट झालें नाहीं. तें देऊळ किल्ल्यांत ईशान्य कोंपऱ्यास आहे. सूर्याचें देवालय अगदीं मध्यावर होतें. परंतु औरंगजेबाच्या राज्यांत तें मोडून तेथे जुमा मशीद बांधिली. ही मशीद १८४९ मध्यें शीखांची दारूगोळ्याची कोठी होती.

हुएनसंगनें रावीचा उल्लेख केला नाहीं. परंतु त्यानंतर थोडेच वर्षांनीं सिंधचा ब्राह्मण राजा चाच यानें मुलतानावर स्वारी करून तें घेतलें. तेव्हां ( ७ व्या शतकामध्यें ) रावी मुलतानच्या जवळून वहात होती

असें वर्णन आहे. ब्यास ही मुलतानच्या पूर्वेस व दक्षिणेस वहात होती असेंहि त्यावरून दिसतें.

माली लोकांचें मुख्य शहर शिकंदरानें घेतलें तें फार बळकट होतें. व तें त्या प्रांताची राजधानी होतें. हें सर्व मुलतानशीं जुळतें. त्या व आणखीहि एका प्रमाणावरून मुलतान हेंच माली लोकांचें मुख्य शहर असावें.

## काहरूर

हें जुनें शहर ब्यासच्या जुन्या पात्रावर मुलतानच्या आग्नेयीस ५० मैल व भावलपुरच्या ईशान्येस २० मैल आहे. चाच यानें मुलतान घेतल्यावर हेंहि त्यास मिळालें असें सांगितलें आहे. विक्रमादित्य आणि शक यांचें एथे युद्ध झालें अशी प्रख्याति आहे.

## उच्च

हें जुनें शहर पंचनदाच्या पूर्व तीरावर मुलतानच्या नैर्ऋत्य-दक्षिणेस ७० मैल व मिथुनकोट एथे हल्लीं पांच नद्यांचा सिंधूशीं संगम होतो तेथून ईशान्येस ४९ मैल आहे. मिर्झामोगल ह्यानें इ०स० १७८७।८८ मध्यें या प्रांताची पहाणी केली. त्यानंतर सिंधूच्या प्रवाहांत फेर झाला आहे. जुनें पात्र अजून दिसतें. सिंधु व पांच नद्या यांचा संगम १८ व्या शतकाच्या बहुधा अखेरीपर्यंत एथेच होता. संगमावर असल्यामुळें प्राचीन कालापासून हें महत्त्वाचें असावें. उच्च शब्दाचा अर्थ संस्कृत व हिंदी या भाषांत सारखाच होतो. संगम जेथे होता त्याहून उंच प्रदेशावर हें असल्यामुळें उच्च असें नांव पडलें असेल. बर्न म्हणतो कीं, तें तीन गांवांमिळून

झालें आहे. मोगलबेगच्या नकाशांत ७ गांवांमिळून झालें असा शेरा आहे; व दंतकथा अशीच आहे. हें शहर अनेक वेळां मोडल्यामुळें पुनः पुनः बांधलेलें आहे. शेवटचा वेढा हुसेनशहा अरेघन यानें १५२४।२५मध्यें घातला होता. तेव्हां भोंवतालच्या भिंती वगैरे पाडून सामान बकरकडे नेलें. शिकंदरानें संगमावर एक शहर स्थापण्यास सांगितलें तें हेंच असावें. व चाच यानें मुलतानावर स्वारी करतेवेळीं इसकंदर शहर घेतलें तें हेंच असावें. मुसलमानांनीं घेतल्यावर त्याचा उल्लेख उच्च या नांवानेंच आला आहे. महंमद गजनवी व गोरी यांनीं हें घेतलें होतें. व नाशीरउद्दीन कुबाच्छ याच्या वेळीं हें वरील सिंध प्रांताचें मुख्य शहर होतें. तैमुरलंगानंतर मुलतानचें स्वतंत्र राज्य झालें त्याचा हा एक भाग होता, असें फेरिस्ता लिहितो. इ० स० १५३४ मध्यें हुसेनशहानें तें घेतलें परंतु मग त्यानें एथील किल्ला पुनः बांधविला. अकबराच्या वेळीं तें मोंगलांच्या राज्यास कायमपणें जोडलें. मुलतानच्या सुभ्यांतला तो एक परगणा होता असें ऐन-अकबरींत आहे.

मुलतानच्या आसपासच्या प्रदेशास अद्यापि जोधियाबार असें म्हणतात. जोहिया रजपुत लोक अजुधानपासून उच्चपर्यंत सतलज नदीवर प्राचीन काळापासून आहेत. यांच्या तीन जाती आहेत. त्यांचीं नांवें लंगवीर किंवा लकवीर, मधोवीर* किंवा मधेर आणि आदमवीर किंवा अदमीर अशीं आहेत. जोहिया किंवा जो-

* मधोवीर, आदमीर हे शब्द मध्यवीर, आद्यवीर या शब्दांचे अपभ्रंश दिसतात.

धिया ( संस्कृत यौधेय ) यांचीं नाणीं इ० स० च्या पहिल्या शतकापासून सांपडतात. त्यांतहि तीन प्रकार आहेत. एकावर " जय यौधेय गणस्य " असे शब्द असतात. दुसऱ्यावर द्वितीय आणि तिसऱ्यावर तृतीय एवढीं अक्षरें जास्त असतात. यावरून तेव्हांहि त्यांचे तीन वर्ग होते. हीं नाणीं सतलजच्या पश्चिमेस देलापुर, सतगड, अयुधान, काहरूर, आणि मुलतान एथे व पूर्वेस भाटनेर, अभोर, सिर्सा, हनसी, सोनपत, पानपत एथेहि सांपडतात. यावरून तीं सतलजवर जोधेय लोक हल्लीं आहेत व शिरसा एथे अकबरच्या वेळेपर्यंत होते त्यांचीं असावीं. समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद एथील कोरींव लेखांत, व रुद्रदाम याच्या जुनागड एथील कोरींव लेखांत यौधेयांचा उल्लेख आहे. पाणिनीनेंहि यौधेयांचा उल्लेख ( ४. १. १७८ ) केला आहे. शिकंदराच्या वेळीं व त्यानंतर या प्रदेशांतील लोकांचीं नांवें ग्रीक ग्रंथकारांनीं लिहिलीं आहेत त्यांशीं यौधेयांचें साम्य कनिंगह्यॅमनें दाखविलें आहे. रुद्रदाम यानें त्यांस घालविल्याचें लिहिलें आहे. यावरून ते तेव्हां दक्षिणेस सुराष्ट्र देशापर्यंत अंमल बसवित गेले होते असें दिसतें.

---

## पश्चिम हिंदुस्थान

सिंध, गुर्जर, आणि वल्लभी हीं तीन राज्यें पश्चिम हिंदुस्थानांत हुएनसंग यानें सांगितलीं आहेत. पहिल्यांत सिंधु नदीचा सर्व प्रदेश पंजाबपासून समुद्रापर्यंत कच्छबेटासुद्धां येत असे. तिसऱ्यांत पश्चिम राजपुताना

आणि त्याजवळचें मोठें वाळवंट व दुसऱ्यांत काठेवाड द्वीपकल्प व त्याच्या शेजारचा कांहीं प्रदेश येत असे.

## १. सिंध

सातव्या शतकामध्यें सिंधचे ४ विभाग होते. त्यांस वरचा, मधला, खालचा, आणि कच्छ अशीं नांवें देऊं. इ० स० ६४१ मध्यें हे सर्व एका शूद्र राजाकडे होते. ह्याच्याहि पूर्वी सिंधचे ४ विभाग होते. त्यांचीं नांवें झोर, अस्कलदुसा, सामिद आणि लोहान अशीं होतीं. हुएननें सांगितलेले ४ विभाग ह्यांच्याशीं मिळतात. त्यांचें क्रमानें वर्णन करूं.

### १. वरील सिंध

हुएनसंगनें ह्या भागाचा घेर ११६७ मैल सांगितला आहे. कच्छगंडावा प्रांताचा सर्व पश्चिमभाग यांत असण्याचा संभव आहे. तसें असेल तर हा घेर जमतो. चाचच्या पूर्वीचा राजा बलवान् होता त्यावेळीं तो प्रांत या राज्यांत निःसंशय होता. म्हणजे यांत सिंधूच्या पश्चिमचे कच्छगंडावा, काहन, शिकारपुर आणि लारखाना हे प्रांत व सिंधूच्या पूर्वेचे सबझलकोट, व खैरपुर हे प्रांत होते. म्हणजे उत्तर, पश्चिम, पूर्व आणि दक्षिण ह्या हद्दी अनुक्रमें ३४०, २९०, २८०, २६० मैल होतात. तेव्हां ११३० मैल घेर झाला.

सातव्या शतकांत राजधानी पिचेनपोपुलो ( Pichenpopulo ) होती. जुलिअननें ह्याचें रूप विचवपुर असें केलें आहे. सिंध प्रांताचा इतिहास तद्देशीयांनीं लिहिलेला आहे. त्यास चाचनामा म्हणतात. त्याव-

रून व दंतकथेवरून हुएनसंगच्या पूर्वी व नंतर आलर ही या प्रांताची राजधानी होती. तिचेंच विचवपुर हें दुसरें नांव असावें. हुएननें ती सिंधूच्या पश्चिमेस होती म्हणून लिहिलें आहे. आणि आलरचे अवशेष सिंधूच्या पूर्वेस आहेत. परंतु सिंधु ही पूर्वी आलरच्या पूर्वेकडून वहात होती. व तिच्या प्रवाहांत फरक राजा दाहीर ह्यापर्यंत म्हणजे हुएनसंगानंतर ५० वर्षें झाला नव्हता. दाहीर ६८० मध्यें गादीवर बसला. त्यानंतर हा फरक झाला. त्याच्या दुष्टाचरणामुळें सिंधूनें प्रवाह फिरविला असें लोक सांगतात. परंतु पंजाबांतील सर्वच नद्यांचे प्रवाह पृथ्वीच्या दैनंदिनगतीमुळें पश्चिमेस सरकत आहेत. शिवाय मोठमोठे फेरफारहि पुष्कळ होतात हें मागें सांगितलेंच आहे. महंमद कासीम यास इ० स० ७११ मध्यें पश्चिमेकडून आलर एथे येण्यास मध्यें सिंधु नदी उतरावी लागली होती. यावरून तेव्हां सांप्रतच्या जागीं प्रवाह आला होता. आलरच्या पूर्वेच्या जुन्या पात्रास हल्लीं नारा म्हणतात. आलरपासून१०० मैलांवर जकरावपर्यंत हा दक्षिणेस वाहतो. तेथे त्याच्या अनेक शाखा होतात. त्यांपैकीं सर्वांत पूर्वेस जी आहे तीस नारा म्हणतात. ती किप्रा आणि उमरकोटपर्यंत आग्नेयीस वाहून पुढें नैर्ऋत्येस वळते. आणि वंगणबाजार एथे कच्छचे रणांत गुप्त होते. अगदीं पश्चिमची शाखा जिला पुराण ( जुनी ) म्हणतात ती ब्राह्मणाबाद आणि नाशीरपुर यांवरून हैद्राबादपर्यंत दक्षिण-नैर्ऋत्य दिशेनें वाहते. पुढें तिच्या दोन शाखा होतात. पैकीं एक हैद्राबादेच्या खालीं १५ मैलांवर हल्लींच्या

सिंधूस मिळते. दुसरी रोमकबाजारजवळ नारास मिळते. आलरपासून जकरावपर्यंत जो नाराचा भाग त्यांतला वरचा अर्धा भाग अगदीं कोरडा आहे. सिंधूस मोठा पूर आला असतां कधींकधीं यांत पाणी येतें.

वरील सिंधमध्यें आलर, रोरीबकर, आणि लारखान्याजवळचें मोहोर्ते हीं जुनीं शहरें आहेत. शिकंदर, चाच, महंमद कासीम, हुसेनशहा यांच्या स्वाऱ्यांच्या वर्णनांत आणखीहि आलीं आहेत. परंतु त्यांचीं अंतरें दिलेलीं नसल्यामुळें त्यांचा ठिकाण लावणें कठिण.

शिकंदराच्या स्वारींत वरील सिंधमधील पुढील शहरें आलीं आहेत.—

## सोगडी

पंजाबांतील नद्यांच्या संगमापासून निघाल्यावर अलेक्झांडर सोगडी लोकांच्या राज्यांत आला. त्यांत त्यानें अलेक्झांड्रिया नांवाचें एक शहर स्थापिलें. त्या लोकांस सोड्री असेंहि नांव होतें. ते व मासानी हे लोक शिकंदरास शरण आले होते. हल्लींचे सिंधूच्या डाव्या तीरावरचें फजिलपुर आणि उजव्या तीरावरचें कासमोर ह्याजवळ असावें. मुलतान आणि आलर यांच्या मध्यें भाटिआ नांवाचा किल्ला तद्देशीय व मुसलमान इतिहासकार सांगतात. तो याच जागीं असावा. तो १००३ मध्यें महंमुद गजनवी यानें घेतला तेव्हां तेथे त्यास पुष्कळ लूट मिळाली होती.

## म्युझिकानी—आलर

सोगडीहून निघाल्यावर शिकंदर म्युझिकान नांवा-

च्या लोकांच्या राज्यांत गेला. तें फार संपत्तिमान् व फार वस्तीचें होतें. वर्णनावरून वरील सिंधप्रांत, ज्याची राजधानी आलर होती तोच हा प्रांत असावा. तो संपत्तिमान् होता असें मुसलमान भूगोल लिहिणारांच्या लेखांवरून सिद्ध होतें.

आलरचें पूर्वीचें नांव समजत नाहीं. तें रोरा असावें. याचा उच्चार हल्लीं आरर असा करितात. आरब ग्रंथकार आलरोर लिहितात. अल् हा उपसर्ग काढिला म्हणजे रोर राहतें. शेजारच्या रोरी ह्या नांवाशींहि हें मिळतें. आलर एथून सिंधूचा प्रवाह गेल्यावर हें मागें पडून बकर हें वाढलें.

## प्रीस्टी–पोर्टिकानस किंवा आक्झिकानस

म्युझिकान लोकांच्या प्रांतांतून निघाल्यावर जहाजें पुढें पाठवून शिकंदर आपण आक्झिकानस राजावर गेला. तो प्रीस्टी लोकांचा राजा असें कर्टिअस म्हणतो. प्रीस्टी किंवा पोर्टिकानस असें शहराचें नांव ग्रीक ग्रंथांवरून दिसतें. लारखान्यापासून १० मैलांवर घार नदीच्या तीरावरील मोहोर्त म्हणून शहर होतें तें तें असावें. तेथे सांप्रत मोठा उंचवटा आहे. सिंधमधून कच्छगंडावा प्रांतांतून कंदाहारकडे जाणाऱ्या मोठ्या रस्त्यावर तें होतें. यामुळें तें महत्त्वाचें असलें पाहिजे. तें लोकांनीं सोडिल्यावर त्याच्या पश्चिमेस १० मैलांवर असणारें लारखाना ह्यास तें महत्त्व प्राप्त झालें.

## २. मध्यसिंध

ह्यास साधारण नांव विचलो ( मधील जमीन ) असें

आहे. ह्युएनसंगनें ह्या प्रांताचा घेर ४१७ मैल सांगितला आहे. तेव्हां यांत हल्लींचा सेहवान प्रांत व हैद्राबाद आणि उमरकोट या प्रांतांचे उत्तरेकडील भाग येत असावे. म्हणजे उत्तर व दक्षिण ह्या हद्दी ११० मैल व पूर्व-पश्चिमच्या ४९ मैल मिळून ४१० मैल होतात. मुख्य शहर ओफांचा हें वरील सिंधच्या राजधानीपासून ११७ मैल व खालील सिंधच्या राजधानीपासून ९० मैल होतें. पैकीं पहिलें आलर असें वर सांगितलेंच आहे आणि दुसरें हैद्राबाद असें पुढें सिद्ध केलें आहे. या दोहोंपासून वर सांगितलेल्या अंतरावर बंभरकाथळ किंवा बंभर नांवाचें शहर पूर्वीं होतें. त्याच्या अगदीं जवळ ओफांचा असावें. ब्राह्मणवास किंवा ब्राह्मणवाडा म्हणून जें प्रसिद्ध शहर तें बंभरच्या जागींच होतें अशी दंतकथा आहे. ओफांचा याचा उच्चार अवंडा असा जुलिअननें लिहिला आहे.

हल्लीं या भागांत प्रसिद्ध शहरें सेहवान, हाल, हैद्राबाद आणि उमरकोट हीं आहेत. मध्यावधीमध्यें हिंदु राजांच्या वेळीं यांत मोठीं शहरें सदुसान, ब्राह्मण किंवा बाहमणवा हीं होतीं. बाहमणवा ह्याच्या जवळ प्रथमच्या मुसलमानांनीं मनसुरा नांवाचें शहर स्थापिलें. तेव्हां तें त्यांच्या सुभेदाराची राहण्याची जागा असल्यामुळें प्रांताची राजधानी होतें व लवकरच सर्व सिंधप्रांतांत तें एक मोठें शहर झालें. शिकंदराच्या वेळीं सिंदोमाना आणि हरमाटेलिया नांवाचें एक ब्राह्मणांचें शहर अशा दोनच डायोडोरसनें लिहिलीं आहेत. ह्यांचें उत्तरेकडून क्रमानें वर्णन करूं.

## सिंडोमान किंवा सेहवान

आक्सिकानस या शहरापासून शिकंदर यानें आपलें सैन्य सांबूस याजवर नेलें. तो हिंदुस्थानांतील डोंगरी लोकांचा मुख्य असें शिकंदरास वाटलें होतें. त्यानें आपली राजधानी सिंडोमान ही सोडिली ती त्याच्या नातलगांनीं शिकंदरास दिली असें एरियन म्हणतो. परंतु ग्रीक ग्रंथांत मतभेद आहेत. कनिंगह्यॅम म्हणतो कीं सिंडोमान हें हल्लींचें सेहवान असें इतर विद्वानांप्रमाणें माझेंहि मत आहे. तेथे जुना मोठा उंचवटा आहे. त्यावरून हें जुनें असावें असें अनुमान होतें. सिंधूचा प्राचीन मुख्य प्रवाह, ज्यास हल्लीं नारा म्हणतात त्यापासून याचें अंतर ६९ मैलांहून कमी नाहीं. हल्लीं सिंधूचा मुख्य प्रवाह त्याच्या पूर्वेकडून वाहतो; व उत्तरेकडूनहि सिंधूचा लहान प्रवाह वाहतो. तो मंचर सरोवरांतून येतो. मंचर सरोवरास हल्लीं त्याच प्रवाहाचें पाणी आहे. परंतु सिंधूचा प्रवाह इकडून वाहूं लागण्यापूर्वींचें मंचर सरोवर असावें, असें दिसून येतें. तें मध्यभागीं बरेंच खोल आहे. व हालालाकी पर्वतांतून निघणाऱ्या लहान दोन नद्या त्याला मिळतात. तें सेहवान शहरापर्यंतहि पूर्वीं असावें.

सेहवान हें एका उंच टेंकडीवर आहे. जवळ मंचर सरोवर आहे. यावरून हें प्राचीन वसलेलें असावें. आरब भूगोल लिहिणारांच्या ग्रंथांत सदूस्तावा किंवा सदुसान असें नांव आढळतें. हें ग्रीक सिंडोमान याशीं जुळतें. हल्लींचें नांव सेविस्तान ( शिवस्तान ) पासून निघालें असावें असें हिंदु लोक म्हणतात. परंतु सें-

धवस्थान किंवा सिंधुमान किंवा सैंधववन यापासून हें नांव निघालें असावें. हुएननें याविषयीं कांहीं लिहिलें नाहीं. परंतु सिंधच्या इतिहासांत, हें इ० स० ७११ मध्यें महंमद कासीम यानें घेतलें व पुढें ११ व्या शतकाच्या आरंभीं महंमुद गजनवीनें घेतलें असें लिहिलें आहे. हल्लीं हें मोडकळीस आलेलें आहे.

## ब्राह्मण किंवा ब्राह्मणाबाद

हेंच मोडकें शहर शिकंदराच्या इतिहासकारांनीं वर्णिलेलें ब्राह्मणांचें शहर असावें. हर्मेटेलीया हें नदीवरील ब्राह्मणांचें शेवटचें शहर असें डायाडोरस यानें लिहिलें आहे, तेंहि हेंच असावें; कारण हर्मिस आणि ब्रह्म यांच्या उच्चारांत साम्य आहे. अंतरहि जुळतें. म्यूझिकानस ह्याच्या शरण येण्याचें व मागाहून बंड करण्याचें वगैरे वर्णन सदरील शहर घेतलें तेव्हांच्या वर्णनाशीं जुळतें. ह्यावरून हें म्यूझिकानस ह्याच्या राज्यांत असावें. व यावरून आक्झिकान आणि सांबूस या प्रांतांखेरीज डेलट्यापर्यंत सिंधूच्या कांठचा प्रांत त्याच्या राज्यांत असावा. म्यूझिकानसचें राज्य सर्व हिंदुस्थानांत संपत्तिमान् असें शिकंदरानें ऐकिलें त्याच्याशीं हें जुळतें. टालमीच्या भूगोलापैकीं एकहि या सेहवान शहराशीं जुळत नाहीं. रेस वंशाच्या राजांच्या वेळीं ( इ० स० ५०७–६४२ ) सिंधचे चार भाग होते, त्यांपैकीं एका भागाचें हें मुख्य शहर होतें, व इ०स० ६८० त दाहीर राजा होईपर्यंतहि होतें. दाहीरनें आलरचा नाश झाल्यावर हेंच मुख्य शहर केलें असें तद्देशीय इतिहासावरून कळतें.

हुएननें सांगितलेल्या चार भागांपैकीं दुसरा भाग ओफांचा हेंच ब्राह्मणाबाद असें वर सांगितलेंच आहे.

मुसलमानी अमलांत ब्राह्मणाबादचें महत्त्व मोडून मनसुरा शहर मुख्य झालें. तें महंमद कासीमचा मुलगा अमरू यानें स्थापून त्यास अब्बलसाइड घराण्यांतला दुसरा खलीफ मनसूर ( इ०स० ७५३–७७४ ) याचें नांव दिलें, असें बिलादुरी म्हणतो. परंतु मसाउद म्हणतो कीं जमहूर, सिंधचा प्रतिनिधि यानें तें इ० स० ७४९ च्या सुमारास स्थापून त्यास आपल्या बापाचें नांव दिलें. हें ब्राह्मणाबादच्या इतकें जवळ होतें कीं, तीन मुसलमान भूगोल लिहिणारांनीं तीं दोन्ही एकच असें लिहिलें आहे. तें मिहरान ( सिंधु ) हिच्या उजव्या शाखेवर वसलें होतें. ह्याचीं निरनिराळ्या शहरांपासून अंतरें मुसलमानांनीं लिहिलीं आहेत. त्यावरून मुलतानपासून सिंधूच्या मुखापर्यंत जें अंतर त्याच्या दोनतृतीयांशांहून अधिक हें होतें. ह्याच स्थळीं बेलासिस यानें एका शहराचा अवशिष्ट भाग शोधून काढिला आहे. तो सिंधूच्या एका जुन्या पात्रावर हैदराबादेच्या ईशान्येस ४७ मैलांवर, हालाच्या पूर्वेस २८ मैलांवर आणि नाराच्या पश्चिमेस २० मैलांवर आहे. त्यास बंभरकाथळ असें म्हणतात. तेथे विटांची एकच इमारत हल्लीं आहे. सर्व भागाचा घेर ४ मैल आहे. परंतु जवळच १॥ मैलावर डोलोरा शहराचा अवशिष्ट भाग आहे. अकबराच्या वेळीं याचा घेर सुमारें ४ मैल सांगितला आहे. इब्न हौकल यानें मनसुराचा तितकाच सांगितला आहे. व बेलासीस यानें काढलेलाहि

तितकाच आहे. यावरून व अंतरें वगैरे जुळतात यावरून सिंध प्रांतांतील अरबी सुभेदारांचें मनसुरा शहर हेंच असावें. बंभरकाथळ एथे मुसलमानी नाणीं पुष्कळ सांपडतात; पूर्वींचीं फारशीं सांपडत नाहींत. यावरून याच्या जवळ १॥ मैलावर जुनें मोडकें डिलूरा शहर आहे तें ब्राह्मणाबाद असावें.

तद्देशीय इतिहासांत सांगितलें आहे कीं डिलूरा या राजाच्या दुष्ट आचरणामुळें भूकंपानें ब्राह्मणाबाद शहर नाश पावलें. बेलासीसनें लिहिलें आहे कीं दरवाज्यांत हाडें सांपडतात. हाडांचे पिंजरे सांपडले, ते कांहीं उभे व कांहीं बसलेले आहेत. खोल्यांच्या कोंपऱ्यांत हाडांचा चुरा झालेला आहे. यावरून भूकंपानें या शहराचा नाश झाला हें स्पष्ट आहे. एथे जमहूरपासून उमरपर्यंत ( इ० स० ७५०–९४० ) नाणीं सांपडतात. यावरून तेव्हां तें शहर चांगलें होतें. इ० स० ९७० च्या नंतर त्याचा नाश झाला असावा. अबूरिहान यानें इ० स० १०३१ त याचा उल्लेख केला आहे. परंतु ११ व्या शतकाच्या आरंभापूर्वींच नाश झाला असावा. मग वस्ती असली तरी थोडी असावी. कारण महंमुद गजनवी सोमनाथाहून परत आला तो इकडे न वळतां सेहवानवरून गिजनीस गेला.

## खालील सिंध किंवा लार

हुएनसंग यानें पिटासिला या प्रांताचा घेर ९०० मैल सांगितला आहे. हा हैदराबादेपासून मुखापर्यंत सिंधूचा डेलटा व दोहींकडचा थोडकासा प्रदेश म्हणजे पूर्वेकडील उमरकोटच्या ओसाडीचा कांहीं भाग, व प-

श्चिमेकडील मॉझ भूशिरापर्यंतचा प्रदेश, यांच्या वेरा-
शीं जुळतो. पश्चिमेकडील पर्वतापासून उमरकोटपर्यंत
१६० मैल व मॉझपर्यंत ८९ मैल, व मॉझपासून सिंधू-
च्या कोरी नांवाच्या मुखापर्यंत १३५ मैल आणि ते-
थून उमरकोटापर्यंत १४० मैल, मिळून ५२० मैल
होतात. जमीन वाळवट व खारी परंतु तींत धान्य व
भाजीपाला पुष्कळ होतो. फळें व फुलें थोडीं. तसेंच
सांप्रत आहे. शिकंदराच्या वेळीं यांत प्रसिद्ध असें प-
टल हें एकच शहर होतें. परंतु तो आपलें आरमार
निघण्यास अनुकूल वाऱ्याची वाट पहात या प्रदेशांत
बराच काळ राहिला होता, तेंव्हां त्यानें पुष्कळ शहरें
स्थापिलीं परंतु त्याचा इतिहास लिहिणारांनीं त्यांचीं
नांवें दिलीं नाहींत. जस्टीन यानें बार्क हें एक मात्र
सांगितलें आहे. टालमीनें बार्बरा, सौसिकाना, बोनिस,
कोलक हीं सांगितलीं आहेत. यांतील बार्बरा हेंच पे-
रिप्लस ग्रंथांत लिहिलेलें बारबरीक बंदर व जस्टीननें
लिहिलेलें बार्क असावें. पेरीप्लसच्या वेळीं खालील सिं-
धची राजधानी मिन्नागर ही होती. ह्युएनसंग पिटाशि-
ला किंवा पटल हें एकच शहर सांगतो. महंमद का-
सीमचे इतिहासकार ८ व्या शतकांत देबल, निरनकोट
हीं सांगतात. १० व्या शतकांतील आरब भूगोल लि-
हिणारांनीं मनहाबरा किंवा मनहाबरी किंवा मंजबरी हें
सिंधूच्या पश्चिमेचें सांगितलें आहे. उत्तरेकडून यांचा
क्रमानें विचार करूं.

## पटल किंवा निरनकोट

निरनकोट हें हल्लींच्या हैदराबादेच्या जागीं होतें

असें पुष्कळांचें मत आहे. तें देबालपासून २९ पॅरसंग व मनसुरापासून १९ परसंग असें अबूफेदा यानें सांगितलें आहे. तें नदीच्या पश्चिमतीरावर मजबूद परंतु लहान असें वर्णिलें आहे. सांप्रतचें हैदराबाद हें ब्राह्मणाबाद ( मनसुरा ) पासून ४७ मैल आहे. आणि लारबंदरपासून ८९ मैल आहे. देबाल म्हणजे लारीबंदर असें पुढें सिद्ध केलें आहे. निरनकोट म्हणजे जरक असें इलिअट म्हणतो. परंतु त्यापेक्षां हैदराबादेशीं हीं अंतरें जमतात. त्याअर्थी निरनकोट म्हणजे हैदराबादच होय. सांप्रत सिंधु, हैदराबादेच्या पश्चिमेकडून वाहते. परंतु फलेली ही पूर्वींची मुख्य नदी होती. मुख्य प्रवाह हैदराबादेच्या पश्चिमेकडे १५९२ च्या पूर्वीं वाहूं लागला. अकबराच्या राज्याच्या आरंभापर्यंत मुख्य प्रवाह हैदराबादेच्या पूर्वेकडून वाहत होता. निरनकोट हें टेंकडीवर वसलें होतें. तसें हैदराबाद हें आहे. या दुसऱ्या प्रमाणावरून निरनकोट हें जरक नव्हे, हैदराबादच असें सिद्ध होतें. एथील हल्लींचा किल्ला मीर गुलामशहा यानें १७६८ त बांधिला. हैदराबादेचें नीरनकोट हें नांव अजून लोकांस माहित आहे. हुएन हा कच्छची राजधानी कोटेश्वर एथून उत्तरेस ११७ मैलांवर पिटोशिलो एथे गेला. पाटलपुर असें हैदराबादेचें जुनें नांव होतें, असें बर्टन म्हणतो. या दोन व आणखीहि प्रमाणांवरून पिटाशिला हेंच हैदराबाद होय.

शिकंदराच्या इतिहासकारांनीं लिहिलेलें पट्टल जें डे-

१. परसंग म्हणजे सरासरी ३॥ मैल.

लट्याच्या शिरोभागीं होतें असें ते म्हणतात, हें हैद्राबाद होय. हल्लीं हैद्राबादेच्या उत्तरेस १२ मैलांवर फलेली सिंधूपासून वेगळी होते. तेथे डेलट्याचा शिरोभाग आहे. परंतु पूर्वी हैद्राबाद एथेच किंवा आग्नेयीस १५ मैलांवर, जेथे सिंधूची पूर्वशाखा गुनी ही पश्चिमशाखा फलेली हिच्यापासून वेगळी होत होती, तेथे डेलट्याचा शिरोभाग असावा. आणखीहि तीन स्वतंत्र प्रमाणांवरून पट्टल हें हैद्राबाद असें कनिंगह्यामनें सिद्ध केलें आहे.

## जरक

जरक हें लहानसें शहर सिंधूजवळील एका टेंकडीवर हैद्राबाद व ठठ्ठा यांच्या मध्यें आहे. विचलो (मध्यसिंध) आणि लार ( खालचा सिंध ) ह्यांच्या हद्दीवर हें हल्लीं आहे. मनहाबरी आणि फिरबुझ म्हणजे ठठ्ठा आणि नीरनकोट यांच्या मध्यें खोर किंवा अलखोर म्हणून लहानसें परंतु मोठ्या वस्तीचें शहर एड्रसी यानें सांगितलें तें हेंच असावें. याच्या खालीं तीन मैलांवर अवशिष्टांश आहेत, त्यांस लोक काफरकोट असें म्हणतात; व तें राजा मंजिहीर याच्या वेळचें असें म्हणतात. अवशिष्टांशांमध्यें बौद्ध मूर्तीचे तुकडे सांपडले होते. जवळच एक कोरींव लेख सांपडला होता. यावरून हें बौद्धांसंबंधी असावें.

## मिनागर, मनहाबरी किंवा ठठ्ठा

हें सिंधूच्या पश्चिम तीरापासून तीन मैलांवर आणि सिंधूची पूर्वशाखा वागर ही नदीचा मुख्य प्रवाह सट्टा

यापासून जेथे वेगळी होते त्याच्या वर ४ मैलांवर आहे. एक-दोन ग्रंथकारांच्या लेखांवरून हें सिंधूवर असावें असें दिसतें. ठठ्ठा याचा अर्थ तीर असा आहे. मुरडो म्हणतो कीं हें सिंधचा अधिकारी निजामउद्दीन यानें इ० स० १४९९ त स्थापिलें. यापूर्वी समा लोकांची राजधानी सामीनगर जी ठठ्ठाच्या वायव्येस ३ मैलांवर होती, ती खालील सिंधची राजधानी होती. सामीनगरची स्थापना दिल्लीचा बादशहा अल्लाउद्दीन (इ० स० १२९९–१३१५) याच्या वेळीं झाली असें मुरडो म्हणतो. ठठ्ठाच्या नैर्ऋत्येस ४ मैलांवर कल्याणकोट किंवा तघलखकोट आहे तें त्याच्या पूर्वीचें असावें.

ठठ्ठाचें स्थान अलीकडचें आहे. परंतु सामीनगर आणि कल्याणकोट यांचीं स्थानें जुनीं आहेत. हें स्थान व्यापारास फार सोईचें आहे. परंतु नद्यांच्या फेरफारामुळें डेलट्याचा शिरोबिंदु बदलतो; यामुळें शहराची जागा व त्यामुळें नांवहि पुष्कळ वेळां बदललें असावें. आरब भूगोलवेत्त्यांचें मनहाबरी आणि पेरीप्लस ग्रंथांतलें मिनागरा ह्यांचें स्थान ठठ्ठा हेंच असें कांहीं प्रमाणांवरून सिद्ध होतें. मांड जातीचे लोक खालील सिंधमध्यें ख्रिस्ती शकाच्या आरंभापासून आहेत. रासिदउद्दीन लिहितो कीं नोहाचा मुलगा हाम याचे वंशज मेड आणि झाट हे, सिंधच्या लोकांचे महाभारतापूर्वीचे पूर्वज होते. मेर, मेड, मंड, मिंड इतक्या प्रकारांनीं हें नांव लिहिलेलें आढळतें. ग्रीक ग्रंथकारांनीं तें मेदी आणि मंडुएनी असें लिहिलें आहे.

ह्या मांड लोकांच्या नांवावरून मिनागर ( मिनांचें

नगर ) हें नांव पडलें असें कनिंगह्यमनें बऱ्याच खटप-
टीनें दाखविलें आहे. व तेथे सिथियन लोक अंमल क-
रित होते असें त्यानें सिद्ध केलें आहे.

मिनागरा हें कोठे होतें हें ग्रीक ग्रंथांत सांगितलेलें
नाहीं. मिननगर आणि मनहाबरी ( मंडआबरी ) हीं
एकच हें खरें असेल तर मिनागरा ही इंडो सिथिअन
राजांची राजधानी निःसंशय ठठ्ठा एथे होती. तिहीं-
च्या स्थितीचीं वर्णनें जुळतात.

## बार्बारिक—भांबुरा

बांभोरा किंवा भांबुरा हें जुनें मोडलेलें शहर घारा
नदीच्या शिरोभागीं आहे. सिंधेंतील फार प्राचीन बं-
दर एथे होतें असें तद्देशीय लोकांचें मत आहे. हल्लीं
एथे वस्ती नाहीं. घरांचे पाये वगैरे आहेत.

भांबुरा हेंच शिकंदरानें स्थापिलेलें बार्क, टालमीचें
बार्बारि, व पेरिप्लस ग्रंथांत लिहिलेलें बार्बारिक बंदर हो-
य असें कनिंगह्यम म्हणतो.

शिकंदर आणि निआर्कस ह्यांच्या वेळीं जींतून ग-
लबतें चालत असत व ते जींतून गेले अशी जी सिंधू-
ची अगदीं पश्चिमची शाखा ती सांप्रतचें घाराचें उत्त-
रचें पात्र होय. इ० स० २०० च्या पूर्वीं तिचें पाणी
दक्षिणच्या पात्रांतून जाऊं लागलें. हा दक्षिणचा प्रवाह
हल्लीं सिंधूच्या मुख्य प्रवाहास हल्लीं लारी बंदराच्या
खालीं मिळतो. पेरिप्लसच्या वेळीं याच पात्रांतून व्या-
पाराचीं गलबतें जात. व बारबारिक एथे माल उतरून
मिनागर एथे नेत. परंतु कांहीं काळानें हेंहि पात्र को-
रडें पडलें. आठव्या शतकाच्या आरंभीं आरबांनीं स्वा-

री केली तेव्हां देबल हें सिंधूवरील मुख्य बंदर झालें होतें. व भांबुरा ( बार्बारिक ) मागें पडलें होतें. घारांतून गलबतें जात नसत तरी तिचें पाणी जुन्या बंदराजवळून १३ व्या शतकापर्यंत वहात असे. परंतु पुढें तें बंद होऊन तें शहर अगदीं ओस पडलें.

## देबाल सिंधी किंवा देबाल

मध्यावधीमध्यें सिंधूवरचें बंदर देबाल होतें. त्याचें स्थान अद्यापि निश्चित झालें नाहीं. त्याविषयीं निरनिराळीं मतें आहेत. परंतु इ० स० १८०० च्या सुमारें क्रो म्हणून सिंध प्रांतांत बरेच वर्षें रेसिडेंट होता, त्याचें मत आहे कीं तें कराची व ठठ्ठा यांमध्यें कोठे तरी होतें. व तें खरें आहे. इलिअटनें चाचनाम्यांतला उतारा घेतला आहे त्यांत लिहिलें आहे कीं सेरनदीपचीं गलबतें आश्रयाकरितां देबालच्या किनाऱ्यास आलीं होतीं व तीं टंगामर लोकांनीं लुटलीं. यावरून तें किनाऱ्यास असावें. आणि टंगामर लोक कराची व लारबंदर यांमधील किनाऱ्यावर रहाणारे होते. यावरून त्यांमध्यें कोठे तरी तें असावें. म्हणजे बघार आणि घाराचें दक्षिणपात्र ह्यांच्या संगमावर तें असावें असें सिद्ध होतें. ही जागा लारी बंदरच्या उत्तरेस ९ मैल आणि भांबुराच्या नैर्ऋत्येस १७ मैलांवर आहे. हें वरील गोष्टींशीं जुळतें. इबन भतूता १३३३त लिहितो कीं " सिंधु समुद्रास मिळते तेथे लाहारी शहरांत मी गेलों. तेथून जवळच एका शहराचे अवशिष्टांश होते. तेथील लोक सांगत कीं ईश्वरी क्षोभानें माणसें इत्यादिकांचे दगड झालेले आहेत. " ही जागा वरचीशीं मिळते. या

प्रदेशाचा अद्यापि शोध नसल्यामुळें अवशिष्टांशांविषयीं कांहीं माहिती नाहीं. इबन यानें लिहिलेली गोष्ट आरेबियननाइटमधील एका गोष्टीशीं मिळते. सिंधच्या तद्देशीय इतिहासांत राजा डिलु आणि त्याचा भाऊ चोटा यांची तशीच गोष्ट सांगितलेली आहे. चोटा हा मुसलमान झाला होता व भूकंपांतून वांचला होता. सिंधमधील पुष्कळ शहरांविषयीं अशीच गोष्ट सांगतात. ब्राह्मणाबाद इ० स० ७५७ मध्यें नाश पावलें. झुबेदीची गोष्ट खलीप हरून अलरशीद (इ० स० ७८६–८०९) च्या वेळची आहे.

लारी बंदरहि हल्लीं रद्द पडून जवळच धाराज हें बंदर झालें आहे.

### ४. कच्छ

सातव्या शतकांत सिंधेंतला चवथा प्रांत कच्छ होता. अकबराच्या वेळींहि तो सिंधेंत होता. हुएननें हा सिंधची राजधानी (आलर) हिच्या नैर्ऋत्येस २६७ मैलांवर लिहिला आहे. प्रांताचें नांव Otienpochilo असें लिहिलें आहे. त्याचें रूप जुलियननें अध्यवकिल किंवा अंत्यवकेल असें लिहिलें आहे. त्याबद्दल संस्कृत शब्द त्यानें लिहिला नाहीं. परंतु तो औदुंबरतीर किंवा औदुंबर असा असावा. हें कच्छच्या लोकांचें नांव असें लासन म्हणतो. प्लिनीचे ओदोंबोरी लोक हेच असावे. हल्लीं त्यांचा मागमूस नाहीं. प्रांताचा घेर ८३३ मैल लिहिला आहे. रणाच्या उत्तरचा प्रांत नगरपारकर त्यांत येत असेल तर तो घेर खरा आहे. व तसें असण्याचा संभव आहे. कारण तो कच्छचा भाग मानित

असतात व हल्लींहि आहे. उत्तर हद्द उमरकोटपासून आबूपर्यंत घेतली तर एकंदर घेर ७०० मैल होईल. राजधानी Kietsishifalo ह्याचा घेर५ मैलांचा सांगितला आहे. जुलिअन, तें खजिश्वर आणि लासन कच्छेश्वर असें लिहितो. परंतु तें कोटेश्वर असावें. कच्छच्या पश्चिम किनाऱ्यावर कोटेश्वर हें यात्रेचें स्थान आहे. तें सिंधूच्या जवळ व समुद्रकिनाऱ्यावर होतें, असें हुएन लिहितो. हल्लीं तें सिंधूची शाखा कोरी हिच्या मुखाजवळ आहे. शहरांत एक शिवाचें देवालय होतें असें हुएननें लिहिलें आहे. त्याप्रमाणें हल्लीं शिवलिंगें तेथे पुष्कळ आहेत. प्रांतांतील जमीन सखल आणि ओलसर व खारी असें लिहिलें आहे. हें कच्छच्या रणाशीं जुळतें. कोटेश्वराच्या दक्षिणेसहि पुष्कळ मैल पसरलेली एक दलदल आहे.

## सिंधूच्या पश्चिमचे प्रांत

खालील सिंधच्या पश्चिमेस आराबी किंवा आराबिटा आणि ओरिटी किंवा होरीटी ह्या दोन रानटी जाती होत्या असें सर्व ग्रीक ग्रंथकार लिहितात. आरबांचा देश हा हिंदुस्थानांत पश्चिमेकडील शेवटचा असें एरियन लिहितो. स्ट्राबो देखील तो हिंदुस्थानांतलाच म्हणतो. परंतु ओरिटी हा दोघेहि हिंदुस्थानांतला धरित नाहींत. कर्टीयसनें तो हिंदुस्थानांतला असें म्हटलें आहे. डायाडोरस म्हणतो कीं ते लोक हिंदूंसारखे आहेत. एरिअन लिहितो कीं त्यांचा पोषाख व शस्त्रें हीं हिंदूंसारखीं आहेत. परंतु भाषा व रीतरिवाज हीं निराळीं आहेत. हुएन लिहितो कीं कोटेश्वरापासून ३३३ मैलां-

वरील लांगकिलो एथील लोकांच्या रीतिभाती, कच्छम-
धील लोकांसारख्या आहेत. त्यांची लिपि हिंदुस्थानांत-
ल्यासारखीच आहे. भाषा मात्र थोडी निराळी आहे.
तेव्हां दोन्ही जाती देशवर्णनसंबंधानें हिंदुस्थानांत येतात
असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. राजकीय संबंधानें
मात्र नेहमीं बाहेर आहेत. इ० स० पू० ६ व्या शतकां-
त दोन्ही लोक डयारस इस्टास्पीस याच्या अमलाखा-
लीं होते. व पुढें बाराव्या शतकानंतर हुएनच्या वेळींहि
इराणच्या ताब्यांत होते. परंतु त्यांची उत्पत्ति हिंदु आहे.

## आराबी

आराबी, आराबिटी, आंब्रिटी आणि आरबिस अशीं
नांवें ग्रीक ग्रंथकारांनीं लिहिलीं आहेत. त्यांच्या व
आरिटी लोकांच्या सीमेवरून वाहणाऱ्या आरबिस न-
दीवरून त्यांचें नांव पडलें. ही नदी हल्लीं त्यासप्रांतांतू-
न पुराली या नांवानें वाहून सोनमियानीच्या अखातास
मिळते. शिकंदराच्या वेळच्या दिलेल्या अंतरावरून
कराची हें त्याच्या पूर्वहद्दीवर असावें. नियार्कस क-
राचीहून आराबीच्या प्रदेशाकडे असतां त्यास उजवे-
कडे एक पर्वत व डावेकडे एक बेट लागलें. ही गोष्ट
कराचीच्या स्थितीशीं जुळते. आराबीसच्या मुखाज-
वळील बंदर चांगलें होतें असे नियार्कस म्हणतो.

## ओरिटी किंवा होरिटी

शिकंदर यांच्या प्रांतांत आल्यावर आंतल्या भागीं
गेला, तेव्हां त्यास रामबाकिया शहर लागलें. तेंच
त्यांचें मुख्य शहर होतें. तेथे वसाहत केली असतां तें

संपत्तिमान् होईल असें वाटल्यावरून त्यानें ती कामगिरी एका सरदारास सांगितली. ग्रीकांच्या वर्णनावरून हे लोक आघर नदीवरचे असें वाटतें. ह्या नदीच्या पात्रांत कांहीं झरे आहेत. ते फार प्राचीनकाळापासून रामचंद्रकी कूप ( रामचंद्राच्या विहिरी ) या नांवानें प्रसिद्ध आहेत. तेथे आणखी दोन गुहा आहेत. एक काली देवीची आणि दुसरी हिंगुलाज देवीची. परंतु ह्या आघारच्या खोऱ्यांत हल्लीं जीं यात्रेचीं ठिकाणें आहेत, त्यांचा रामाशीं संबंध आहे. यात्रेकरू रामबाग एथे जमतात. कारण राम व सीता तेथून निघून गोरखतलावाकडे गेलीं. व तेथे मुक्काम करून टांगदेरा एथे गेलीं. यात्रेकरू रामबाग एथून गोरखतलावाकडे जातात. तेथून टांगदेरा एथे जातात. व तेथून ज्या स्थळीं राम सैन्य घेऊन हिंगुलजेवर गेला असतां त्यास परतावें लागलें, तेथे जातात. रामबाग हें एरियनचें रामबाकिया होय. व टांगऱ्हेरा ही प्लिनीची टानबेरा नदी होय. शिकंदरानें स्थापिलेलें शहर रामबाकिया एथे असावें. इतक्या अंतरावरच्या हिंदुस्थानच्या एका टोंकास रामबाग हें नांव शिकंदराच्या वेळीं आढळतें, हें आश्चर्यकारक होय. हिंदूंचें वर्चस्व किती लांबवर पसरलें होतें, हें यावरून दिसतें. बौद्ध धर्माचा प्रसार होण्यापूर्वींचेंच हें नांव पडलेलें आहे. हुएननें लांगकिलो या नांवाखालीं हे प्रांत वर्णिले आहेत. जुलिअन तें लांगल असें म्हणतो. हें विष्णुपुराणांतील जांगल याचें एक रूप असावें. हुएननें लिहिलेले अंतरावर ( ३३३ ) कच्छपासून वायव्येस लाकुर नांवाचें मोडकें शहर हल्लीं

आहे. हें हुएनच्या नांवाशीं जुळतें. सातव्या शतकांत राजधानी सुनूलिशिफालो होती. जुलिअन ती सुनुरीश्वर लिहितो; शहरांत एक शिवाचें देवालय होतें असें हुएन लिहितो. यावरून राजधानीचें नांव शंभुरीश्वर असावें.

## गुर्जर

पश्चिम हिंदुस्थानांतील दुसरें राज्य Kinchelo गुर्जर नांवाचें हुएनसंग यानें वल्लभीच्या उत्तरेस ३०० मैल व उज्जनीच्या वायव्येस ४६७ मैल सांगितलें आहे. राजधानी Pilomilo म्ह० बालमीर ही होती. ही वल्लभीच्या अवशेषांच्या उत्तरेस बरोबर ३०० मैल आहे. उज्जनीहून ती सरळरेषेनें ३९० मैलांहून जास्त दूर आहे. परंतु मध्यें अरवली डोंगर असल्यामुळें तो उत्तरेकडे अजमिराजवळ किंवा दक्षिणेस अन्हलवाडाजवळ कोठेहि वलांडिला तरी सुमारें ४९० मैल होतात. राज्याचा घेर ८३३ मैल सांगितला आहे. यावरून त्यांत हल्लींचीं बिकानीर, जसलमीर, जोधपुर हीं राज्यें येत असावीं. मर्यादा अशा असाव्या असा अजमास दिसतो.—उत्तर हद्द बालर ( सरदारकोट ) पासून जंजनूपर्यंत १३० मैल; पूर्वेस जंजनूपासून अबू पहाडापर्यंत २९० मैल; दक्षिणेस अबूपासून उमरकोटपर्यंत १७० मैल व पश्चिमेस उमरकोटपासून बालरपर्यंत ३०० मैल.

पाहिले सर्व आरब भूगोल लिहिणारे जझ्र किंवा ज*झ्रर नांवाचें एक राज्य लिहितात. तें हुएनचें ‘ गुर्जर ’ असावें. तें राजपुतान्याचें राज्य होय असें बऱ्याच गो-

* या मूळ आरबी अक्षरांचा उच्चार हझर किंवा कझर असाहि होईल.

ष्टींवरून ठरतें. सुलिमान नामक व्यापारी इ० स०८५१ मध्यें लिहितो कीं त्याच्या पश्चिमेस टाफेक किंवा टाकी ( पंजाब ) चें राज्य होतें. त्यांत रुप्याच्या खाणी होत्या. व मोठें सैन्य होतें. हिंदुस्थानांत रुप्याच्या खाणी राजपुतान्यांत मात्र आहेत. या व बाकीच्या गोष्टींवरून राजपुताना हेंच ठरतें.

इबन खोरदाद्बेद हा ( इ० स० ९१२ ) लिहितो कीं 'तातारीया द्रहम' हें नाणें हजर प्रांतांत चालू होतें. आणि इबन हाकर लिहितो कीं (इ०स०९७७) तें नाणें गांधार देशामध्येंहि चालू होतें. गांधार देशांत त्यावेळीं पंजाब प्रांत होता. सुलिमान हा बल्हार ( हल्लींचें गुजराथ ) राज्याविषयीं तेंच सांगतो. व सिंधेंत इ० स० ७२९ मध्यें तें नाणें होतें; खजिन्यांत १८० लक्षांहून कमी नाणीं नव्हतीं, असें दुसऱ्या आधारावरून आपल्यास समजतें. ह्या नाण्याचें वजन ५४ पासून ७२ ग्रेन होतें. ह्यावरून असें दिसतें कीं 'इंडो सासनिअन' असें नांव ज्यास आहे तें रुप्याचें नाणें हेंच होय. तातारचे ( सिथीयाचे ) राजे काबूल व पश्चिम हिंदुस्थान ह्यांत राज्य करित होते. त्यांनीं हें सुरू केलें असावें. कारण तें काबूल नदीचा प्रदेश व पंजाब ह्यांत जिकडे तिकडे सांपडतें. व सिंधु, राजपुताना, आणि गुजराथ ह्यांतहि आढळतें. कनिंगह्यम म्हणतो कीं ह्या सर्व देशांतून ह्या नाण्याचे नमुने मीं मिळविले आहेत. त्याचें वजन ५० पासून ६८ ग्रेनपर्यंत आहे. व पांचव्या किंवा सहाव्या शतकापासून महंमुद गजनवीपर्यंत तीं आहेत. त्यांबरोबर काबूलच्या ब्राह्मण राजांचीहि नाणीं सांपड-

तात. ते इ० स० ८९० पासून काबूलमध्यें राज्य करूं लागले. आरवली पर्वताच्या पूर्वेस मध्यहिंदुस्थानांत, हें नाणें क्वचित् सांपडतें. यावरून तें तेथे चालू नसावें. तेथे मध्यावधीमध्यें वराह अवताराचें चित्र काढलेलें 'वराह' नामक नाणें होतें. या प्रमाणावरून आरबांचे हजर किंवा जझर म्हणजे पश्चिम राजपुतानाच होय. एड्रिसी लिहितो कीं, जझर ही राजांची वंशपरंपरागत पदवी व देशाचें नांव होतें. यावरून गुजर ह्याशीं त्याचें ऐक्य दाखविलेलें सिद्ध होतें. कारण त्या लोकांचें नांव शहरास व प्रांतास आढळतें. हल्लींच्या गुजराथेस हें नांव कधीं लागूं लागलें नकळे. इ० स० ८१२ पर्यंत सौराष्ट्र हें नांव होतें असें एका ताम्रपटावरून दिसतें. ह्या लेखांत गुर्जर हें स्वतंत्र राष्ट्र असा दोनदां उल्लेख आला आहे. इ० स० ७७० च्या सुमारें गुर्जरांचा राजा सौराष्ट्राच्या इंद्र राजानें जिंकिला. आणि इ० स० ८०० च्या सुमारें इंद्राचा पुत्र कर्क यानें मालव राजास गुर्जरावर स्वारी करण्यास मदत केली. ह्यावरून गुर्जर हें हुएनानंतर दोन शतकें सुराष्ट्राहून निराळें राज्य होतें. व तें मालव व सौराष्ट्र ह्यांच्या जवळ होतें असें दिसतें. अर्थात् तें राजपुताना होय. दुसऱ्या एका प्रमाणावरूनहि हुएनचें कुचेलो (गुर्जर) हें राजपुताना असें कनिंगह्यमनें सिद्ध केलें आहे. ह्यांतील शहरें हुएननें दिलीं नाहींत.

### बलभद्र किंवा वल्लभी

वल्लभी ह्या प्रसिद्ध शहराचे अवशेष काठेवाडच्या पूर्वभागांत भावनगराजवळ टाड यानें शोधून काढिले.

पांचव्या शतकांतील एका कोरींव लेखांत त्यास बलभद्रांचें सुंदर राज्य म्हटलें आहे. परंतु तेथील इतिहास व देशकथा यांत तें वल्लभी या नांवानेंच प्रसिद्ध आहे. हुएनसंगच्या वेळीं हेंच नांव होतें. यापूर्वी प्राचीनकाळीं ह्यास सुराष्ट्र हें नांव होतें. महाभारत व पुराणें ह्यांत हें प्रसिद्ध आहे. टालमीनें व पेरिप्लसमध्यें त्यास सुराष्ट्रेनी म्हटलें आहे. शके ७३४ (इ० स०८१२) मधील कर्क राजाच्या एका लेखांत नांवें बदलण्याचें कारण लिहिलें आहे. त्याचा मागील एक पूर्वज गोविंद म्हणून होता. "कांहीं कारणानें त्याचा नाश झाला, यामुळें सौराज्य हें त्याचें नांव गेलें" असें लिहिलें आहे. कर्कच्या बापास लाटेश्वर म्हटलें आहे. पुष्कळ गोष्टींवरून अनुमान ठरतें कीं सौराष्ट्र हें नांव ३१९ मध्यें नाहींसें झालें. कारण तेव्हां साह राजांचे वंशजांचे जागीं वल्लभ झाले व राजधानी जुनागड ही बदलून वल्लभी झाली. वल्लभी शक इ० स० ३१९ पासून सुरू झाला. गुप्त राजांचीं नाणीं गुजराथेंत पुष्कळ सांपडतात. त्या राजांचा लोप झाला याचें दर्शक हा शक असें अबुरिहान म्हणतो.

तद्देशीय इतिहासांत लिहिलें आहे कीं ९८० शकामध्यें* म्हणजे इ० स० ६५८ मध्यें वल्लभीवर कोणीं स्वारी करून तिचा नाश केला. व वल्लभी घराणें मोडलें. हें खरें असेल तर बडोद्यास सांपडलेल्या ताम्रपटांतील गोविंद राजा यानें तें घेतलें असें दिसतें. त्या गोविंद राजानें जुन्या वंशाची स्थापना करून जुनें नांव

* हा विक्रम शक असें टाड म्हणतो. परंतु शालिवाहन शक असें कानिंगह्यॅमनें सिद्ध केलें आहे.

सौराष्ट्र हें स्थापिलें असें लिहिलें आहे. गोविंद हा, कर्क राजा इ० स० ८१२ मध्यें राज्य करित होता त्याच्या आजाचा पणजा होय. तेव्हां तो इ० स० ६५० च्या सुमारास असेल. हें वर्ष वरील ६९८ शीं मिळतें.

वल्लभीहून घालविल्यावर त्या वंशांतील बप्प किंवा बपक नांवाच्या पुरुषानें चितोर एथे एक नवीन राज्य स्थापिलें. त्याचा मुलगा गुहिल किंवा गुहादित्य यानें आपल्या जातीस गुहिलावत किंवा गाहिलात असें नांव दिलें. तें अद्यापि चालतें. त्याच सुमारास चौर वंशांतला एक पुरुष वनराजा यानें सरस्वतीच्या तीरावर अबूच्या नैर्ऋत्येस ७० मैलांवर अनलवाडपत्तन शहर स्थापिलें, तें लवकरच पश्चिम हिंदुस्थानांत प्रख्यात झालें. त्याच्या थोडें अगोदर ( सुमारें इ० स० ७२० ) काठेवाड द्वीपकल्पांतील पहलव वंशांतला राजा कृष्ण यानें एलापुर किल्ला बांधला, त्याच्या शोभेनें देव आश्चर्य पावले, असें एका कोरींव लेखांत आहे. त्यांत त्यानें शिवाचें देवालय स्थापिलें. हें सोमनाथ असें वाटतें. कारण सोमनाथास पत्तनसोमनाथ म्हणत. व पत्तन हें जुनें शहर वेरावलच्या उपसागरावर आहे. तेथे वेरावल बंदर आहे. यावरून वेरावल हेंच एलापुर असें दिसतें.

सोमनाथाविषयीं पहिला लेख महंमुदाच्या स्वारीचा आहे. त्या शहराच्या तीन बाजूंस समुद्र होता असें वर्णन आहे. तेथे राजा रहात असे. व अनलवाडा हें गुजराथच्या हद्दीवर होतें असें वर्णन आहे. हें तद्देशीय इतिहासांशीं मिळतें. त्यांत अनलवाड्याचें चौरे घराणें इ० स० ९४१ मध्यें बुडालें व तें राज्य चालुक्य

वंशांतील मूळराज याजकडे गेलें. तो सोमनाथ व अनलवाडा एथचा अधिकारी झाला असें लिहिलें आहे.

महंमुद गजनवीनंतर राजे अनलवाड्यास गेले, असें दिसतें. कारण महंमुद गोरीच्या वेळीं गुजराथची राजधानी अनलवाडा सांगितली आहे. अल्लाउद्दीन खिल्जीच्या वेळीं तीच राजधानी होती. ती घेऊन त्यानें दिल्लीच्या राज्यास जोडिली.

ह्या सर्व वर्णनांत फेरिस्तानें गुजराथ हें नांव घातलें आहे. अबूरिहाननें सोमनाथ, अनलवाडा ह्यांचें वर्णन केलें आहे. परंतु गुजराथ हा शब्द घातला नाहीं. राशीदउद्दीन (इ० स० १३१०) च्या ग्रंथांत गुजराथ हें नांव प्रथम आढळतें. गुजराथ हें नांव हुएनच्या वेळीं पश्चिम राजपुतान्यास होतें. व लाटेश्वर कर्क ह्यानें इ० स०८१२मध्यें एक दानपत्र दिलेलें सांपडलें आहे, तेव्हांपर्यंत सौराष्ट्रापासून तें वेगळें होतें असें स्पष्ट होतें. मधील पांच शतकांची माहिती नाहीं. काठेवाडांत गुजराथ लोकांची पूर्ण सत्ता कधीं झाल्याचें दिसत नाहीं. यावरून गुर्जरचें जें उत्तरेकडील ( पश्चिम राजपुतान्याचें ) राज्य त्याचा हा एक भाग असल्यामुळें ह्यासहि गुजराथ नांव पडलें असावें. हॅमिल्टन लिहितो कीं माळवा आणि खानदेश ह्यांच्याहि बऱ्याच भागास गुजराथ म्हणत असत. मार्कोपोलो हा काठेवाड आणि गुजराथ ह्यांत भेद करितो. त्यानें द्वीपकल्पास सोमनाथ म्हटलें आहे. व गुजराथचें राज्य ठाण्याचे उत्तरेपासून समुद्रकिनाऱ्यावर होतें असें लिहिलें आहे.सांप्रतहि तेथील लोक आपल्या देशास सुराट आणि काठीआवाड म्ह-

णतात. यांतील दुसरें नांव मराठ्यांपासून घेतलें आहे.

वल्लभीचे अवशेष भावनगरच्या वायव्येस १८ मैलांवर आहेत. त्यास अद्यापि वामिलपुरा म्हणतात. अकबराच्या वेळीं घोघोच्या जवळ एक मोठें पडकें शहर असल्याचें लिहिलें आहे. तेव्हां तें वल्लभीच होय.

हुएननें वल्लभी प्रांताचा घेर १००० मैल सांगितला आहे. सर्व काठेवाड, व भडोच, सुरत ह्यांमिळून तितका घेर आहे. भडोच हें वल्लभीच्या ताब्यांत असावेसें दिसतें.

## सुराष्ट्र

हुएनसंग लिहितो कीं सुराटचें राज्य वल्लभीच्या ताब्यांत होतें. त्याची राजधानी वल्लभीच्या पश्चिमेस ८३ मैल होती. ती उज्जंत पर्वताजवळ होती. जुनागडाजवळ गिरिनार म्हणून टेंकडी आहे तिचेंच हें दुसरें नांव होय. उज्जयंत* हें नांव गिरनार एथील रुद्रदाम व स्कंदगुप्त यांच्या कोरींव लेखांत आहे. यावरून वल्लभीच्या पश्चिमेस ८७ मैलांवर असणारें जुनागड ही सुराष्ट्र देशाची राजधानी असावी. हुएनसंगनें टेंकडीचें वर्णन केलें आहे तें सदरहू टेंकडीशीं मिळतें.

सुराट हें नांव अद्यापि ह्या प्रांतांत चालू आहे, परंतु तें थोडक्या प्रदेशास मात्र लागतें. तो प्रदेश गुजराथच्या १०० भागांपैकीं एक आहे. अकबराच्या वेळीं द्वीपकल्पाच्या दक्षिणभागास तें लागत असे. टेरी नामक प्रवाशानें सुराट हें नांव लिहिलें आहे. त्यानें जहांगीरच्या दरबारांत मिळालेल्या माहितीवरून लिहिलें

---

* सुराष्ट्र देशांत उज्जयंत पर्वत आहे असें महाभारतांतहि आहे. वनपर्व, अ० ८८ श्लोक २१.

आहे. तो लिहितो कीं सोरटची राजधानी जुनागड आहे. हुएन लिहितो कीं प्रांताचा घेर ११७ मैल होता व तो प्रांत मोहीच्या पश्चिम तीरापर्यंत पसरलेला होता. ही नदी हल्लींची मही असें बहुमत आहे. यावरून या नांवाखालीं वल्लभीसुद्धां सर्व द्वीपकल्प येत असावा. वल्लभीचें वर्चस्व होतें तरी जुनें नांव ६४० पर्यंत मागें पडलें नव्हतें असें दिसतें.

## २. भडोच–बार्यगाझा

हुएनसंगच्या वेळीं भरुकच्छ प्रांताचा घेर ४०० मैल होता. मुख्य शहर नैमोथो ( नर्मदा ) नदीवर समुद्राच्या कांठीं होतें. यावरून राजधानी हल्लींची भडोच हीच होय. तिचें संस्कृत नांव भृगुकच्छ असें ब्राह्मण लिहितात. जुन्या कोरींव लेखांत भरुकच्छ असें आहे. भरुकच्छ* हें विशेष प्रचारांतलें असावें. टालमीचा भूगोल आणि पेरिप्लस ग्रंथ ह्यांत लिहिल्या नांवाशीं तें विशेष मिळतें. हुएनसंगनें लिहिलेल्या घेरावरून या प्रांताच्या हद्दी महीपासून दमणपर्यंत व खंभातच्या अखातापासून सह्याद्रीपर्यंत असाव्या.

हुएनसंग भरोच आणि वल्लभी हीं दक्षिण हिंदुस्थानांत, व सुराट पश्चिम हिंदुस्थानांत मानितो. तसेंच उज्जनी मध्य हिंदुस्थानांत, व माळवा दक्षिण हिंदुस्थानांत मानितो. परंतु हें चुकीचें दिसतें. पेरिप्लस ग्रंथांत लिहिलें आहे कीं, बार्यगाझाच्या खालीं किनारा दक्षिणेस वळतो. तेथपासून दक्षिणदेश असें लोक म्हणतात.

* वराहमिहिरानें भरुकच्छ असें लिहिलें आहे.

## मध्यहिंदुस्थान

हुएनसंग यानें मध्यहिंदुस्थान या भागांत सतलज-पासून गंगेच्या मुखापर्यंत व हिमालयापासून नर्मदा व महानदी एथपर्यंत प्रदेश मानिला आहे. बंगाल खेरीज करून बाकी हिंदुस्थानांतील सुपीक व भरभराटीच्या प्रांतांपैकीं बहुतेक प्रांत यांत येतात. हुएनच्या वेळच्या ८० राज्यांपैकीं ३७ यांत होतीं, त्यांचें क्रमानें वर्णन करूं.

### १. स्थानेश्वर

हुएननें (Satanishifalo) स्थानेश्वर ही एका प्रांताची राजधानी सांगितली आहे. तो प्रांत ११६७ मैल घेराचा होता. त्यावर निराळा राजा नव्हता. तो प्रांत कनोजचा राजा हर्षवर्धन याच्या स्वाधीन होता. मोठ्या विस्तारावरून तो सतलज नदीपासून गंगेपर्यंत होता असें वाटतें. स्थानेश्वर एथील अवशिष्टांश सुमारें चार मैल विस्तृत आहेत. एथील किल्ला दिलिप म्हणून कुरु वंशांतल्या पुरुषानें बांधिला; व ह्यास ५२ बुरूज होते; असें सांगतात. पैकीं कांहीं शिल्लक आहेत.

स्थानेश्वर हें हिंदुस्थानांतील फार प्राचीन व फार प्रसिद्ध स्थान आहे. एथे शिवाचें स्थान आहे. परंतु शिवाच्या संबंधापेक्षां पांडवादिकांच्या संबंधें हें विशेष प्रसिद्ध आहे. स्थानेश्वरच्या आसपासचा सर्व प्रदेश, जो सरस्वती आणि दृषद्वति या नद्यांच्या मध्यें आहे, त्यास कुरुक्षेत्र हें नांव आहे. त्याचें वर्णन पूर्वीं केलेंच आहे.

### पेहोआ (Pehoa) किंवा पृथूदक

पेहोआ हें जुनें शहर स्थानेश्वरच्या पश्चिमेस १४

मैलांवर सरस्वतीच्या दक्षिण तीरावर आहे. पृथुचक्रवर्ति, ज्यास राजा ही पदवी प्रथम मिळाली, त्याच्या नांवावरून हें नांव पडलें आहे. विष्णुपुराणांत (१.१३) लिहिलें आहे कीं पृथ्वीवर अनर्थ चालला होता तो नाहींसा करण्यास तो जन्मला. म्हणून सर्व प्राण्यांस आनंद झाला. त्याच पुराणांत लिहिलें आहे की सरस्वतींत स्नान केल्यानें वेन राजाचें कुष्ठ गेलें. तो मेल्यावर पृथूनें त्याचें श्राद्ध केलें, व कोणी येई त्यास उदक देत सरस्वतीच्या तीरावर १२ दिवस राहिला. त्यावरून तेथील तीर्थ व नगर यांस पृथूदक असें नांव पडलें. कुरुक्षेत्रमाहात्म्यांत याचा उल्लेख आहे.

## अमीन

स्थानेश्वरच्या आग्नेयीस ५ मैलांवर अमीन नांवाचा उंचवटा आहे. हा अभिमन्यु ह्या नांवाचा संक्षेप असें तेथील ब्राह्मण सांगतात. ह्यास चक्रव्यूह असेंहि नांव आहे. एथे जयद्रथानें अभिमन्यूस मारिलें. एथे अदिति ही पुत्राकरितां तपश्चर्या करित होती, तिला सूर्य हा पुत्र झाला. हा उंचवटा उत्तर-दक्षिण २००० फूट लांब, ८०० फूट रुंद आणि २५।३० फूट उंच आहे. त्याच्या शिखरावर अमीन नांवाचें खेडें आहे, तेथे गौडब्राह्मण रहातात. अदितीचें एक देवालय आहे. पूर्वभागीं सूर्यकुंड आहे. व पश्चिमभागीं सूर्याचें एक देवालय आहे. सूर्यकुंडाच्या जागीं सूर्य जन्मला. ज्या स्त्रियांस पुत्रप्राप्तीची इच्छा असेल त्या रविवारीं आदितीचें दर्शन घेतात, आणि सूर्यकुंडांत स्नान करितात.

## २. वैराट-मत्स्यदेश

हुएनसंगनें लिहिलेलें पालियोटोलोचें राज्य हें पारियात्र किंवा वैराट असें रेनाड म्हणतो. ह्याची राजधानी मथुरेच्या पश्चिमेस ८३॥ मैलांवर व शतद्रूच्या (सतलजच्या) नैर्ऋत्येस १३३ मैलांवर होती. व ती मत्स्यदेशाची जुनी राजधानी, असें हुएननें सांगितलें आहे. मथुरेपासून वर सांगितलेल्या दिशेस सदरील अंतरावर सांप्रत वैराट शहर आहे. तेव्हां मत्स्यदेशांतली विराटाची राजधानी हीच होय असें निःसंशय सिद्ध होतें.

वैराटाची राजधानी नरायण असें निरनिराळ्या मुसलमानी ग्रंथकारांनीं लिहिलें आहे. महंमुद गजनवी याच्या वेळचा अबूरिहान यानें कर्झातची राजधानी नरन ही मथुरेच्या पश्चिमेस २८ परसंग (९८ मैल) असल्याचें लिहिलें आहे. नरायण आणि नरान हीं एकच असें मुसलमानी ग्रंथांवरून निःसंशय दिसतें. सांप्रतहि वैराटच्या ईशान्येस १० मैलांवर नारायणपुर नांवाचें गांव आहे. ह्या प्रमाणावरूनहि हल्लींचें मथुरेच्या पश्चिमेचें वैराट हीच विराट देशाची राजधानी असें सिद्ध होतें. विराटनगरसंबंधी* कथा प्रसिद्धच आहेत.

---

* भारतांत, सहदेवाच्या दिग्विजयांत, इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेस दोन मत्स्यदेश सांगितले आहेत. पहिला अगदीं जवळ होता. दुसरा त्याहून थोडा लांब होता. तसेंच भीमाच्या दिग्विजयांत पूर्वेस एक मत्स्यदेश सांगितला आहे. तो इंद्रप्रस्थापासून फार लांब होता असें दिसतें. भा० व० प्रा० ऐ० कोशाचे कर्ते गोडबोले यांनीं पश्चिमेस एक मत्स्यदेश लिहिला आहे, ती तर चुकीच आहे. परंतु पूर्वेस फार दूर जो मत्स्यदेश होता तेथें विराट

एथील लोक शूर अशी प्रसिद्धि असे. कुरुक्षेत्र, मत्स्य आणि शूरसेन एथील लोक सैन्यांत ठेवावे, असें मनु (अ० ७, श्लो० १९३) सांगतो. वैराट शहराच्या उत्तरेस १ मैलावर एक लांब सखल टेंकडी आहे. तिच्या माथ्यावर लोक भीमाचें स्थान दाखवितात. तेथे भीमगुहा म्हणून एक गुहा आहे. व इतर चार पांडवांचींहि ४ ठिकाणें आहेत. तीं भीमाच्याहून लहान आहेत. सांप्रत तेथे ब्राह्मणांची थोडी वस्ती आहे.

हल्लींचें वैराट शहर एका वर्तुळाकृति खिंडीच्या म-

---

( मागील पृष्ठावरून )
राजा होता, आणि पांडव वनवासास तेथेच गेले होते, असें ते म्हणतात, तीहि चुकीच आहे. विराटाचा देश हस्तिनापुरापासून व इंद्रप्रस्थापासूनहि फार लांब नव्हता. याविषयीं भारतांत पुष्कळ प्रमाणें आहेत.

विराटाच्या गाईंचें हरण करण्याचा कौरवांचा विचार झाला तेंव्हांचें असें वर्णन आहे:—

आदातुं गाः सुशर्माथ कृष्णपक्षस्य सप्तमीं ॥ २६ ॥
अपरे दिवसे सर्वे राजन्संभूय कौरवाः ॥
अष्टम्यांते न्यगृण्हंत गोकुलानि सहस्रशः ॥ २७ ॥

विराटपर्व, अध्याय ३०.

तसेंच कृष्ण शिष्टाईकरितां विराट नगरीसमीपच्या उपलव्य नगराहून हस्तिनापुरास निघाला तो दुसरे दिवशीं प्रातःकालीं पोंचला. व परत देखील एकाच दिवसांत आला, असें पूर्वापरसंबंधावरून दिसतें (उद्योगपर्व अ० ८३,८४,८६,१३७ पहा). यावरून व विराटपर्व, अध्याय ५ श्लोक ३।४ यांवरूनहि कुरु देशाच्या अगदीं जवळचा दक्षिणचा जो मत्स्यदेश तोच विराटाचा व तेथेच पांडव वनवासास होते असें सिद्ध होतें.

ध्यभागीं आहे. तिच्या भोंवतीं टेंकड्या आहेत. त्यांत तांबें सांपडतें. हें शहर दिल्लीच्या नैर्ऋत्येस १०९ मैल व जयपुरच्या उत्तरेस ४१ मैल आहे. खिंडींत शिरण्याचा मुख्य रस्ता वायव्येकडून एका ओढ्याच्या कांठानें आहे. तो ओढा बाणगंगेला मिळतो. खिंडीचा घेर ८ मैल व व्यास २॥ मैल आहे. जमीन सामान्यतः सुपीक आहे. व वृक्ष पुष्कळ आहेत. एक मैल लांब व अर्ध मैल रुंद असा एक अवशिष्टांशांचा उंचवटा आहे, त्याच्या सुमारें चतुर्थांशावर हल्लींचें वैराट आहे. जुनें वैराटनगर पुष्कळ शतकें ओस पडलें होतें. तें सुमारें ३०० वर्षांच्या पूर्वीं अकबराच्या वेळीं पुनः वसलें असें म्हणतात. अकबराच्या वेळीं तेथे वस्ती होती. कारण अबूलफझलनें तांब्याच्या खाणींच्या संबंधें त्याचा उल्लेख केला आहे. शहरापासून पूर्वेस अर्ध मैलावर आणखी उंचवटे आहेत. ते जुन्या नगराचेच भाग असें सांगतात. हुएननें याचा घेर २॥ मैल लिहिला आहे. हल्लीं वस्ती सुमारें ७००० आहे. अलीकडील इतिहासांत या शहराचा प्रथम उल्लेख काय तो हुएननें केलेला हाच होय. तेथे एक वैश्य राजा होता; लोक शूर होते; बौद्धधर्माचे लोक थोडे होते; वैदिकधर्माचा प्रचार विशेष होता; असें हुएन लिहितो. त्यावेळीं सुमारें ३० हजार वस्ती असावी.

दुसरा उल्लेख महंमुद गजनवीच्या वेळीं आहे. त्यानें इ० स० १००९ व १०१४ मध्यें यावर स्वारी केली होती. अबूरिहान लिहितो कीं लोकांचा नाश होऊन ते शहर सोडून गेले. फेरिस्ता लिहितो कीं कै-

राट आणि नार्दिन ( वैराट आणि नारायण ) एथील लोक अजून मूर्तिपूजा करितात, असें ऐकून महंमुदानें त्यांवर १०२२ मध्यें स्वारी केली. त्या वेळीं धोंड्यावर कोरलेला लेख आढळला, त्यांत नारायण एथील देवालय ४० हजार वर्षांपूर्वी बांधल्याचें लिहिलें होतें असें लिहिलें आहे. दुसऱ्या एका ग्रंथकारानेंहि या लेखाचा उल्लेख केला आहे. मेजर बर्ट यास बैराट एथे एक अशोकाच्या वेळचा लेख सांपडला होता, तो हल्लीं कलकत्त्यास आहे.

हुएनच्या वेळीं या राज्याचा घेर ९०० मैल होता. तेथे बैल व मेंढरें चांगलीं होत, परंतु फळें, फुलें फारशीं नसत. ह्या प्रांताच्या तेव्हांच्या मर्यादा अजमासानें अशा असतीलः—उत्तरेस झंजनुपासून कोटकासीमपर्यंत ७० मैल; पश्चिमेस झंजनुपासून अजमीरपर्यंत १२० मैल; दक्षिणेस अजमीरपासून बनास आणि चंबळा यांच्या संगमापर्यंत १९० मैल आणि पूर्वेस संगमापासून कोटकासीमपर्यंत १९० मैल.

### ३. श्रुघ्न

स्थानेश्वराहून हुएन श्रुघ्न ( Sulukinna ) च्या राज्यांत गेला. त्यानें दिलेलें अंतर इत्यादिकांवरून हल्लींचें सुघ खेडें ही श्रुघ्नची राजधानी असें दिसतें. हें स्थानेश्वरच्या ईशान्येस ३०।४० मैल आहे. याची जागा फार सोईकर आहे. ती त्रिकोणाकृति उंचवट्याची आहे. तिच्या कोंपऱ्यांवर हल्लीं निरनिराळीं गांवें व किल्ले आहेत. तीन बाजूंस यमुना नदीचें जुनें पात्र आहे. एथे जुनीं नाणीं बरींच सांपडतात. त्यांतून कां-

हीं तर इ० स० पू० हजार वर्षांचीं असावीं. हें नाणें रुप्याचें किंवा तांब्याचें चौकोनी आहे. या प्रतीचें नाणें इ० स० पू० १००० च्या सुमारें उत्तर हिंदुस्थानांत चालत होतें. तेव्हांपासून दिल्लीच्या चव्हाण व तोमर राजांपर्यंतचीं नाणीं एथे सांपडतात. यावरून हें स्थान निःसंशय फार प्राचीन आहे. हुएननें या प्रांताचा घेर १००० मैल सांगितला आहे. पूर्वेस गंगेपर्यंत हें पसरलें होतें. उत्तरेस डोंगरांची रांग होती. व यमुना नदी मधून वाहत होती. यावरून सिरपुर आणि गरवाल हीं डोंगरी संस्थानें व अंबाला व सहारानपुर यांचा कांहीं भाग इतका प्रदेश यांत येत असावा. हुएन यानें सांगितलेल्या घेरांत कांहीं चुकी आहे. त्यानें यमुना आणि गंगा ह्यांचें अंतर १२२ मैल लिहिलें आहे. परंतु हिमालयाच्या पायथ्यापासून दिल्लीपर्यंत त्या दोहों नद्यांमध्यें हल्लीं सर्वत्र सुमारें ९० मैल अंतर आहे.

### ४. मडावर

श्रुघ्न एथून हुएन मादिपुर[1] ( Motipulo ) एथे गेला. हें शहर सांप्रतचें पश्चिम रोहिलखंडांतलें मडावर होय. एथे हल्लीं ७ हजार वस्ती आहे. जुन्या अवशेषांचा उंचवटा आहे त्यांत मोठ्या आकाराच्या विटा सांपडतात, यावरून हें प्राचीन असावें. एथे मालिनी नांवाची लहानशी नदी आहे. शाकुंतलादिकांतील कण्वाश्रमींची प्रसिद्ध मालिनी हीच होय.

हुएन यानें या राज्याचा घेर १००० मैल लिहि-

१. भारतांत उत्तरदिग्विजयांत आलेलें मोदापुर हेंच असावें.

ला आहे. एथील राजा शूद्र होता. गोविषाण आणि अहिच्छत्र हीं संस्थानें यांतच असावीं. कारण त्यांस निराळा राजा नव्हता. तीं धरलीं म्हणजे सदरहू घेर बरेच अंशीं खरा दिसतो. सदरील प्रांत यांत धरले तर गंगेच्या पूर्वेकडील घाग्रा नदीपर्यंत प्रदेश हरिद्वारापासून कनोजपर्यंत यांत येत असावा. इतक्याचा घेर सुमारें ७०० मैल आहे.

## मायापुर किंवा हरिद्वार—गंगाद्वार

मडावरच्या वायव्य सरहद्दीवर गंगेच्या पूर्वतीरीं मयूर ( Moyulo ) नामक शहर होतें. शहरापासून थोड्या अंतरावर गंगाद्वार नांवाचें देवालय होतें. त्यांत एक तलाव होता त्यास गंगेतून काल्व्यानें पाणी येत असे असें हुएन लिहितो. सांप्रत मायापुर शहराचे अवशेष ज्या जागीं आहेत तेथेच मयूर असावें. परंतु मायापुर व हरिद्वार हीं दोन्ही हल्लीं गंगेच्या पश्चिमतीरीं आहेत. यावरून गंगा पूर्वी यांच्या पश्चिमेकडून वहात असावी असें दिसतें. कनिंगह्यॅम म्हणतो कीं स्वतः हें स्थान पाहिल्यावरून गंगा पूर्वी पश्चिमेकडून वहात होती अशी माझी खात्री झाली आहे. हल्लीं त्या प्रवाहाच्या जागीं हरिद्वारचीं घरें आहेत. खालीं ज्वालपुरापर्यंत पूर्वीचा प्रवाह असावा असें दिसतें.

हरिद्वार हें नांव अर्वाचीन आहे. भारतांत तें कोठे आढळत नाहीं. गंगाद्वार हें नांव भारतांत आलें आहे. एथे गंगा हिमालयावरून खालीं सपाट मैदानांत वाहू

---

१. शैलं शिखरिणां वरं विभेद तरसा गंगा गंगाद्वारं युधिष्ठिर॥ महाभारत, वनपर्व, अध्याय ९०.

लागते. एथेच कनखल नामक तीर्थ आहे. भारतांत गंगाद्वार आणि कनखल यांचीं नांवें जवळ जवळच आलीं आहेत. परंतु दोहोंचीं माहात्म्यें निरनिराळीं सांगितलीं आहेत. कालिदासानें कनखलाचा उल्लेख केला आहे. हरिद्वार असा उल्लेख केला नाहीं. एथलें विष्णुपदाचें देवालय अबूरिहानपर्यंत नव्हतें. अबूरिहान आणि राशिदउद्दिन यांनीं गंगाद्वार हेंच नांव दिलें आहे. अकबराच्या वेळीं हरिद्वार नांव प्रसिद्ध होतें. अबूलफझलनें तें लिहिलें आहे.

हरिद्वार आणि कनखल यांच्या मध्यें मायापुर शहराचे अवशेष आहेत. तेथे माया देवीचें देवालय अद्यापि आहे. तिच्या नांवावरून मायापुर नांव पडलें असें लोक सांगतात. हुएन यानें मयूरचा घेर ३$\frac{1}{2}$ मैल सांगितला आहे. तो मायापुर ह्या जुन्या शहराच्या घेराशीं बरोबर मिळतो. एथे नारायणशिला, मायादेवी आणि भैरव हीं तीन जुनीं देवालयें आहेत. पडक्या इमारतींच्या विटा फार मोठ्या आहेत. जुनीं नाणीं सांपडतात. यावरून हें स्थान प्राचीन असावें. याच्या जवळच गंगाद्वार देवालय आहे. हरिद्वार शहर हल्लीं बरेंच मोठें आहे.

## ५. ब्रह्मपुर

मदावराहून हुएनसंग ब्रह्मपुरच्या राज्यांत गेला. ब्रह्मपुर हें हल्लींचें लखानपुर किंवा वैराट असावें. हें मडावरच्या ईशान्येस ८० मैलांवर रामगंगेच्या कांठीं आहे. हें पूर्वीं कटिउरी राजाची राजधानी होती. व

ह्याच्याहून मोठें शहर हल्लीं या प्रांतांत नाहीं. यावरून वैराट हेंच ब्रह्मपुर असावें.

ह्या राज्याचा घेर ६६७ मैल होता. यावरून हें अलकनंदेपासून कर्णालीपर्यंत होतें, व त्यांत हल्लींचे कमाऊन व गर्वाल हे प्रांत येत असें दिसतें. इतक्या प्रदेशाचा घेर ६०० मैल आहे.

६. गोविषाण किंवा काशिपुर

हुएनसंग मदावरच्या आग्नेयीस ६७ मैलांवर गोविषाण म्हणून राजधानी सांगतो. ह्या अंतरावर जुनें स्थान पाहिलें असतां काशीपुराच्या पूर्वेस एक मैलावर उज्जैन म्हणून खेडें आहे त्याजवळ एक किल्ला आहे तें होय. किल्ल्याचा आकार वीणेसारखा आहे. शहराभोंवतीं बागा, तळीं पुष्कळ होतीं, असें हुएन लिहितो. तशीं सांप्रतहि आहेत. पाणी ९।६ फुटांवर लागतें. द्रोणसागर म्हणून तलाव आहे तेथे पुष्कळ यात्रेकरू येतात. किल्ला व तलाव द्रोणाकरितां पांडवांनीं बांधिला असें लोक म्हणतात. तलाव ६०० फूट औरसचौरस आहे, व तो फार पवित्र मानितात. गंगाद्वारास जातांना यात्रेकरू एथे येतात. किल्ल्याच्या विटा १५×१०×२॥ इंचांच्या आहेत. यावरून तो फार जुना आहे.

प्रांताचा घेर ३३१ मैल होता. राजा सांगितला नाहीं, यावरून तो मदावरच्या ताब्यांत होता असें दिसतें. याच्या उत्तरेस ब्रह्मपुर, पश्चिमेस मदावर व दक्षिणेस आणि पूर्वेस अहिच्छत्र, हे प्रांत होते. यावरून यांत पश्चिमेस रामगंगेपासून पूर्वेस सारडा म्हणजे

घागरा नदीपर्यंत प्रदेश म्हणजे हल्लींचे काशिपुर, रामपुर आणि पिलिभीत हे प्रांत येत असावे.

## ७. अहिच्छत्र

ह्या प्रसिद्ध प्राचीन नगराचें नांव अद्यापि कायम आहे. तथापि हल्लीं लोकांनीं हें शहर सोडिलें आहे. पांडवांच्या वेळीं ही उत्तरपंचाल देशाची राजधानी होती. अहिक्षेत्र किंवा अहिच्छत्र असें दोन प्रकारांनीं हें नांव लिहितात. एथील मूळचा आदिराजा याजवर सर्पानें आपल्या फडेचें छत्र केलें होतें अशी दंतकथा आहे. एथे एक जुना किल्ला आहे तो आदिराजानें बांधिला असें म्हणतात. भारतांत अहिच्छत्र असें नांव आढळतें. भारतांत सांगितलें आहे कीं पंचालदेश हिमालयापासून चर्मण्वती ( हल्लींच्या चंबळा ) नदीपर्यंत पसरला होता. उत्तरपंचाल (हल्लींचें रोहिलखंड) याची राजधानी अहिच्छत्रा होती. व दक्षिणपंचाल ( अंतर्वेदी ) ची राजधानी कांपिल्य ( हल्लींची कांपिल ) होती. कांपिल ही बुदाऊं आणि फराकाबाद यांच्या मध्यें गंगेच्या जुन्या पात्रावर आहे. भारती युद्धापूर्वी पांचाल देशाचा राजा द्रुपद ह्यास द्रोणानें जिंकून उत्तरपंचाल आपण ठेवून दक्षिणपंचाल द्रुपदास दिला.

'पांचाल' असें नांव पडण्याचें कारण चमत्कारिक आहे. भर्म्याश्व नामक राजा होता. त्यास पांच पुत्र मोठे पराक्रमी होते. तो असें म्हणत असे कीं माझें राज्य रक्षिण्यास हे पंच ( पांच ) पुत्र असले म्हणजे पुरत. यावरून त्या पांचांस पंचाल नांव पडलें व त्या-

वरून त्यांच्या देशास व लोकांस नांव पडलें.

आदिराजा आणि सर्प यांची दंतकथा आहे, तशा-च प्रकारची एक कथा बुद्ध ग्रंथांत आहे. परंतु बौद्धांनीं ती आदिराजाच्या कथेवरून रचिली असावी, कारण आदिराजाची कथा प्राचीन आहे.

अहिच्छत्र शहराचा घेर ३ मैल आहे, व त्याच्या भोंवतीं नैसर्गिक तट आहे असें हुएनसंग लिहितो. हें सर्वांशीं जमतें. याच्या उत्तरेस व पूर्वेस एक ओढा आहे. आणि पश्चिम व दक्षिण बाजूंस रामगंगा आणि घोघा यांच्या मध्यें किल्ला आहे. हुएनच्या वेळीं एथे १२ विहार, चार-पांच स्तूप, आणि वैदिक धर्माचीं ९ देवालयें होतीं. किल्ला हल्लीं मोडकळीस आला आहे. आंत जिकडेतिकडे जंगल आहे. तरी ३२ बुरूज अद्यापि आहेत.

हुएनसंगनें या राज्याचा घेर ४०० मैल सांगितला आहे. यावरून त्यांत रोहिलखंडाचा पूर्वभागहि येत असावा.

## ८. पिलोषण

हुएन अहिच्छत्राहून पिलोषण एथे गेला. हें शहर कोणतें याविषयीं संशय आहे. गंगेच्या जुन्या पात्रा-वर सोरन म्हणून गांव आहे. कालिंदीनदीवर अत्रंजी म्हणून खेडें आहे. तसेंच पिलकुनी किंवा पिलोकुनी म्हणून खेडें, यांपैकीं कोणतें तरी पिलोषण असावें. दोन-तीन प्रमाणांवरून अत्रंजी हेंच पिलोषण असें कनिंगहॅम यानें सिद्ध केलें आहे.

हुएननें ह्या प्रांताचा घेर ३३३ मैल सांगितला आ-

* भारत, वनपर्व, अध्याय ९१.

हे. परंतु हा जास्त आहे. बुलंदशहरापासून यमुनेवरील फिरुजाबादपर्यंत व गंगेवरील कादिरगंजपर्यंत या राज्याची हद्द असावी, असें भोंवतालच्या प्रांताच्या मर्यादांवरून दिसतें. इतक्याचा घेर २५० मैल आहे.

### ९. संकिसा–संकास्या

पिलोषण आणि कनोज यांच्या मध्यें संकिसा आहे. त्याचें नांव हुएन यानें सेंगाशी (Sengkiashe) असें लिहिलें आहे. हें हल्लींचें नांव संकिसा व संस्कृत नांव संकास्या यांशीं बराबर जुळतें. हुएन कपित्थ असेंहि याचें नांव लिहितो. हें बौद्धधर्माच्या संबंधें प्रसिद्ध स्थान होतें. बुद्धाची माता माया ही बुद्धाच्या जन्मानंतर सात दिवसांनीं मृत्यु पावली, आणि त्रयस्त्रिंशत्स्वर्गांमध्यें गेली. परंतु तेथे तिला बुद्धाचा उपदेश ऐकण्यास सांपडेना, म्हणून बुद्ध स्वर्गांत गेला. व तेथे त्यानें तीन महिने उपदेश केला. नंतर तो खालीं आला तो संकास्या एथे आला. त्याबरोबर ब्रह्मा आणि इंद्र हेहि आले होते. रत्नें, सोनें व रूपें ह्यांच्या शिड्यांवरून ते खालीं उतरले. तेव्हां देवांनीं पुष्पवृष्टि केली. इत्यादि कथा आहे. अशोकाच्या वेळीं ती प्रसिद्ध होती. चिनी प्रवाशांनींहि ती लिहिली आहे. ब्रह्मदेशांतहि अद्यापि ती खरी मानितात.

संकिसा हें सांप्रत लहानसें खेडें आहे. तें ४१ फूट उंचीच्या एका उंचवट्यावर वसलें आहे. याच्या पश्चिम अंगानें कालिंदी नदी वहाते. इ०स०पू० १००० वर्षांच्या मागें चालू असलेलीं जुनीं नाणीं एथे सांपडतात. रामायणांतील संकास्या (वा० रा० बालकां० अ० ७०)

आणि हुएनचें सेंकिसा ह्यांचें हल्लींच्या संकिसाशीं ऐक्य सिद्ध करण्यास नांवांचें साम्य एवढाच आधार आहे असें नाहीं. तर मथुरा, कनोज व अहिच्छत्र एथून हुएन यानें जीं अंतरें सांगितलीं आहेत तींहि जमतात. आणि घेर सांगितला आहे तो हल्लींच्या संकिसा एथील अवशेषांशीं मिळतो. हुएन लिहितो कीं एथे हजारों ब्राह्मण होते. तें एथील दंतकथेशीं जुळतें. १३०० वर्षांपूर्वीं हें स्थान ब्राह्मणांस दिलें होतें व याजवळील खेड्यांत सर्व ब्राह्मणच होते अशी कथा सांगतात.

हुएन यानें या राज्याचा घेर ३३३ मैल सांगितला आहे. परंतु उत्तरेस व दक्षिणेस गंगा व यमुना आणि पश्चिमेस व पूर्वेस अत्रंजी आणि कनोज हे प्रांत, ह्यांमधील प्रदेशाचा घेर २२० मैल होतो.

## १०. मथुरा

सातव्या शतकांत मथुरा ही एका मोठ्या राज्याची राजधानी होती. त्या राज्याचा घेर ८३३ मैल होता, हें खरें असेल तर त्यांत वैराट आणि अत्रंजी ह्यांमधील सर्व प्रांत होता इतकेंच नाहीं, तर आग्र्याच्या दक्षिणेस नरवर आणि शिवपुरी ह्यांपर्यंत प्रदेश, व पूर्वेस सिंधुनदीपर्यंत प्रदेश यांत होता. इतक्याचा घेर नकाशावर ६५० मैल आहे. पायरस्त्यानें सुमारें ७५० मैल होईल. ह्यांत हल्लींचा मथुरा प्रांत; व भरतपुर, खिरवली आणि धोलपुर हीं लहान संस्थानें; आणि ग्वालेरचा उत्तरेकडील अर्धा भाग इतका प्रदेश येतो. पूर्वेस जिझोटी आणि दक्षिणेस माळवा हीं हुएन यानें वर्णिलेलीं राज्यें असावीं.

हुएन यानें मथुरेचा घेर ३½ मैल सांगितला आहे. तो हल्लींच्याशीं मिळतो. परंतु यमुना थोडथोडी पश्चिमेकडे सरकत असल्यामुळें मूळच्या जागेच्या कांहींशीं उत्तरेस व पश्चिमेस घरें गेलीं असावीं. जुने अवशेषांचे बरेच उंचवटे आहेत. शहराच्या दक्षिणेस ३ मैलांवर एक उंचवटा आहे. त्यांत पुष्कळ मूर्ति व कोरींव लेख अलीकडे सांपडले आहेत. त्यांवरून तेथें दोन-तीन बौद्ध मठ होते असें दिसतें.

मथुरेसंबंधी पुराणांतल्या कथा प्रसिद्धच आहेत. प्लिनी आणि टालमी यांनीं मथुरेचा उल्लेख केला आहे. एरिअन यानेंहि ती शूरसेन देशाची राजधानी सांगितली आहे.

पांडवांच्या वेळेस कुरु देशाच्या दक्षिणेस पहिलाच *शूरसेन देश होता, याविषयीं मागें आलेंच आहे.

---

* यमुनातीरीं मधुवनांत मधु नामक असुर रहत असे. त्याचा पुत्र लवण नामक झाला. तो ऋषींस फार त्रास देत असे म्हणून ते ऋषि रामास शरण आले. रामानें शत्रुघ्नास पाठवून त्याचा वध केला. आणि त्या मधुपुरींत शत्रुघ्नाची स्थापना केली. नागरिक, जानपद, शूर सेना, इत्यादि राहण्याविषयीं ती नगरी योग्य व्हावी असा शत्रुघ्नानें वर मागितला. तेव्हां देवांनीं ‘ जीमध्यें सेना शूर आहे अशी ही नगरी होईल ’ असा वर दिला. पुढें शत्रुघ्नाची शूर सेना त्या देशांत राहूं लागली. यावरून त्या देशास शूरसेन असें नांव पडलें. ( रामायण, उत्तरकांड, सर्ग ६९-७०पहा.) मधुपुरीस पुढें मथुरा नांव पडलें.

शूरसेन देश, त्याची राजधानी यमुना किंवा कालिंदी हिच्या कांठीं असणारी मथुरा, तसेंच वृंदावन आणि गोवर्धनपर्वत यांचा उल्लेख कालिदासानें केला आहे. ( रघु, सर्ग ६ श्लोक ४५-५१ पहा ). अर्वाचीन प्रख्यात कवि जगन्नाथराय यानेंहि मथुरेचें मधुपुरी हें नांव दिलें आहे.

### वृंदावन

मथुरेच्या उत्तरेस ६ मैलांवर यमुनातीरीं वृंदावन आहे. कृष्णकथांच्या संबंधें हें प्रसिद्धच आहे. ह्या शहराचें पूर्वीचें नांव कालियावर्त होतें. एथे यमुनेंत एक मोठा भोंवरा आहे. कालिया सर्पानें ओकलेल्या विषानें हा भोंवरा झाला आहे असें प्रेमसागर ग्रंथांत सांगितलें आहे. ग्रीक ग्रंथकारांनीं क्लिसोबोरा म्हणून शहर सांगितलें आहे तें हेंच असावें.

### ११. कनोज

हुएन यानें या राज्याचा घेर ६६७ मैल सांगितला आहे. फक्त कनोज प्रांताचा घेर हल्लीं २०० मैल आहे. यावरून यांत दुसरे प्रांत असावे. गंगेच्या उत्तरेकडील कांहीं प्रांत, व अंतर्वेदीचा दक्षिण भाग; म्हणजे घाग्रा नदीवरील खैराबाद आणि तांडा व यमुनेवरील इटावा आणि अलाहाबाद यांमधील प्रदेश, यांत असावा. याचा घेर ६०० मैल आहे.

कनोज एथील अवशेष थोडे आहेत व फार महत्त्वाचे नाहींत. इ० स० १०१६ मध्यें महंमुद गजनवीनें कनोजवर स्वारी केली तेव्हांचें वर्णन इतिहासकारानें केलें आहे कीं " त्या शहराचें मस्तक आकाशात लागलें होतें. त्याच्यासारखें बळकट व सुंदर शहर दुसरें नव्हतें. " मसाऊद यानें इ० स० ९१५ मध्यें लिहिलें आहे कीं तें एका राजाची राजधानी होतें. ९०० च्या सुमारें अबुझैड यानें लिहिलें आहे कीं गोझरच्या राज्यांत तें एक मोठें शहर आहे. ६३४ मध्यें

हुएनसंगनें लिहिलें आहे कीं तें ३½ मैल लांब व पाऊण मैल रुंद आहे. मजबूत कोट व खंदक भोंवतीं आहे, व पूर्वेस गंगा वाहते. त्याच्या पूर्वी फाहिआन हाहि गंगेचा निर्देश करितो (इ० स० ४००). टालमीनेंहि कनोजचा उल्लेख केला आहे.

या शहराचें व देशाचें प्राचीन नांव कान्यकुब्ज आहे. कुशिक नामक राजाचा चौथा पुत्र कुशनाभ यानें महोदयनामक नगर स्थापून ती आपली राजधानी केली होती. याच्या शंभर कन्या उद्यानांत क्रीडा करण्यास गेल्या असतां वायूच्या कोपानें कुब्ज्या (कुब्जा) झाल्या. त्या पुढें कांपिलीपुरीच्या ब्रह्मदत्त राजास दिल्यावर सरळ झाल्या. परंतु जेथे त्या कन्या कुब्जा झाल्या त्या नगरास कान्यकुब्ज नांव पडलें. (वाल्मीकि रामायण, बालकांड, सर्ग ३४.) व तेंच पुढें देशासहि पडलें.

हुएनसंगच्या वेळीं कनोज ही उत्तर हिंदुस्थानांतील प्रबळ राजा हर्षवर्धन याची राजधानी होती. तो वैश्य होता असें हुएन लिहितो. परंतु तो बैस रजपूत असावा. माळवा आणि वल्लभी एथील रजपुतांशीं त्याचा विवाहसंबंध होता. लखनौपासून खारामाणिकपुरपर्यंत अयोध्या प्रांताचा बहुतक दक्षिणभाग हा बैस रजपुतांचा देश होय. त्यास बसवाडा म्हणतात.

हुएन यानें लिहिलेला हर्षवर्धन हा सुमारें इ० स० ६०७ पासून ६५० पर्यंत राज्य करित होता असें

---

* यद्वापुना च ताः कन्यास्तत्र कुब्जीकृताः पुरा। कान्यकुब्जमिति ख्यातं ततःप्रभृति तत्पुर ॥ श्लोक ३७.




त्याच्या लेखावरून दिसतें. यावरून कनोज प्रांतांत हर्षनामक राजानें इ० स० ६०७ मध्यें एक शक सुरू केला तो हर्षराजा हर्षवर्धनच होय.

हल्लींचें कनोज शहर पूर्वीच्या शहराच्या उत्तर-भागांत आहे. हिंदूंच्या संबंधाच्या खुणा हल्लीं मुळींच नाहींत. मुसलमानांनीं त्या नष्ट केल्या आहेत. हल्लीं या शहराच्या पूर्व अंगानें कालिंदी नदी वहाते. परंतु लोक तिला छोटा-गंगा म्हणतात. गंगा पूर्वी एथूनच वहात असे. व कालिंदी ही या शहराच्या वर संग्रामपुर एथे गंगेस मिळत असे. परंतु कांहीं शतकांपूर्वी संग्रामपुरापासून गंगेचा प्रवाह फिरून पूर्वेस वळला व तिच्या पूर्वीच्या पात्रांतून कालिंदी वाहूं लागली, असें लोक सांगतात. छोटागंगा या नांवावरून व दोघां चिनी प्रवाशांच्या लेखांवरूनहि हें खरें ठरतें.

कनोजच्या खालींहि गंगेच्या प्रवाहांत थोडासा फरक झाला आहे. कनोजच्या जवळच ईशान नदी गंगेस मिळते, तेथून गंगा पूर्वी थेट दक्षिणेस वहात असे. परंतु कांहीं शतकांपूर्वी तेथून प्रवाह आग्नेयीस वळून चार-पांच मैल गेल्यावर नैर्ऋत्येस वळला व पुढें आणखी चार-पांच मैलांवर मूळच्या पात्रांतून वाहूं लागला.

## १२. अयुटो. उत्पलारण्य.

कनोज एथून अयुटो नामक शहरास हुएन गेला. हें अयोध्या असें जुलिअन आणि सेंट मार्टिन यांचें मत आहे. परंतु अयोध्या पूर्वेस आहे आणि हुएन आग्नेयीस गंगेच्या कांठानें गेला होता. अयुटो हें सांप्रतचें

* ही कालिंदी म्हणजे यमुना नव्हे.

गंगेच्या कांठचें काकुपुर असें कनिंगह्यॅम यानें सिद्ध केलें आहे.

काकुपुर हें बिठूर ( ब्रह्मावर्त ) च्या वायव्येस ९ मैलांवर आहे. दोहोंमधील प्रदेशास उत्पलारण्याची पंचक्रोशी असें सांप्रत म्हणतात. वनपर्वांत, धौम्य पूर्वेकडचीं पवित्रस्थलें सांगत असतां, गंगेचा उल्लेख आल्यावर लागलेंच पंचाल देशांत उत्पलावन सांगितलें आहे. तेथे विश्वामित्रानें यज्ञ केला. आणि कान्यकुब्ज देशांत विश्वामित्रासह इंद्रानें सोमपान केलें असें वर्णन आहे. तेव्हां वर सांगितल्याप्रमाणें उत्पलारण्य ज्यास म्हणतात तेंच उत्पलावन होय. या वर्णनावरून असेंहि सिद्ध होतें कीं कनोज व त्याच्या आसमंताद्भागींचा प्रदेश हाच पुराणादिकांतला कान्यकुब्ज होय. त्याचा पांचाल देशांतच समावेश होत असे, असेंहि टीपेंत दिलेल्या उताऱ्यांतील वर्णनपद्धतीवरून दिसतें. निराळाच असला तर ते दोन्ही परस्परांस लागून होते हें निःसंशय आहे.

काकुपुर एथे हल्लीं क्षीरेश्वरमहादेव आणि अश्वत्थामा ह्यांचीं देवालयें आहेत. एथे वर्षास मोठी यात्रा भरते. अश्वत्थाम्याच्या देवालयावरून हें स्थान प्राचीन असावें.

अयुटो ह्या राज्याचा घेर हुएन यानें ८३३ मैल सांगितला आहे, परंतु तो चुकीचा आहे.

---

* पंचालेषु च कौरव्य कथयंत्युत्पलावनं । विश्वामित्रोऽयजद्यत्र पुत्रेण सह कौशिकः ॥ १५ ॥ ... कान्यकुब्जेऽपिबत्सोममिंद्रेण सह कौशिकः । ... अध्याय ८७ ॥

### १३. हयमुख

हुएन अयुटो एथून हयमुख एथे गेला. तें गंगेच्या उत्तरतीरीं होतें. अयुटो म्हणजे काकुपुर हें खरें असेल. हयमुख हें सांप्रतचें दौंडिकाखेडा होय. हें शहर बैस-रजपुत लोकांचें एकदां मुख्य शहर होतें. हल्लीं फार मोठें नाहीं. हुएन यानें या राज्याचा घेर ४१७ मैल सांगितला आहे. तेव्हां यांत साई आणि गंगा ह्यांमधील सर्व बैसवाड प्रांत, कानपुरपासून माणिकपुरपर्यंत, आणि दक्षिणेस यमुनेपर्यंत प्रदेश, येत असावा.

### १४. प्रयाग

हयमुखाहून हुएन प्रयागास गेला. तो लिहितो कीं " हें शहर दोन नद्यांच्या संगमावर एका रेतीच्या मैदानाच्या पश्चिमेस वसलें आहे. तेथे देवास कांहीं द्रव्य अर्पण केलें असतां इतर स्थळीं त्याच्या हजारोंपट द्रव्य दिल्यानें होणारें श्रेय येतें असें सांगतात. देवालयाच्या मुख्य भागाच्या समोर एक मोठा विस्तारलेला वृक्ष आहे. त्यावर एक मनुष्यभक्षक राक्षस राहतो असें म्हणतात. देवालयापुढें देहत्याग केलेल्या यात्रेकऱ्यांच्या अस्थि वृक्षाभोंवतीं पडलेल्या आहेत. असा देहत्याग करण्याचा परिपाठ प्राचीनकालापासून आहे."

प्रयागाचें माहात्म्य मोठें आहे. एथे ब्रह्मदेवानें याग केला म्हणून प्रयाग* नांव पडलें हें मागें सांगितलेंच आहे. कुरुक्षेत्रास पितामहाची वेदी म्हणतात त्याप्रमाणें या-

---

* यत्राऽयजत भूतात्मा पूर्वमेव पितामहः । प्रयागमिति विख्यातं तस्माद्भरतसत्तम ॥ भारत, वनपर्व, अध्याय ८७ श्लोक १९.

च्या आसमंतातच्या गंगायमुना यांच्यामधील प्रदेशा-सहि पितामहाची वेदी म्हणतात.

अकबरानें एथे किल्ला बांधिला त्यास शहाजहानानें अलाहाबाद असें नांव ठेविलें तेव्हांपासून प्रयागाचें नांव अलाहाबाद पडलें. हुएनसंग यानें सांगितलेला वृक्ष हल्लीं या किल्ल्यांत आहे. तो जमिनीखालीं एका भुयाराच्या कोंपऱ्यांत आहे. सांप्रत याच्या दर्शनास जाण्यास एक जिना उतरून खालीं जावें लागतें. हुएन यानें सांगितलेलें देवालय एथेंच असावें. ७ व्या शतकांत शहर एथेच वसलेलें असावें. वटवृक्ष आणि देवालय हीं तेव्हां जमिनीच्या वर होतीं. परंतु फार वर्षे माती वगैरे जमून तीं खालीं गेलीं असावीं. ७ व्या शतकांत शहर व संगम यांच्या मध्यें दोन मैल घेराचें एक मैदान होतें, व शहराच्या मध्यभागीं वटवृक्ष होता: यावरून संगमाच्या पश्चिमेस निदान एक मैलावर तो

---

१. ... ततो गच्छेत राजेंद्र प्रयागमृषिसंस्ततं ॥ ६९ ॥ ... तत्र त्रीण्यग्निकुंडानि येषां मध्येन जान्हवी ॥ ७३ ॥ वेगेन समतिक्रांता सर्वतीर्थपुरस्कृता ॥ ७४ ॥ यमुना गंगया सार्धं संगता लोकपावनी । गंगायमुनयोर्मध्ये पृथिव्या जघनं स्मृतं ॥७५॥ प्रयागं जघनस्थानमुपस्थमृषयो विदुः । प्रयागं सप्रतिष्ठानं कंबलाश्वतरौ तथा ॥ ७६ ॥ तीर्थं भोगवती चैव वेदिरेषा प्रजापतेः ... प्रयागं सर्वतीर्थेभ्यः प्रवदंत्यधिकं प्रभो ॥ ७९ ॥ ... एषा यजनभूमिर्हि देवानामभिसंस्कृता । ... ॥ ८२ ॥ ... भारत, वनपर्व, अध्याय ८५.

२. हा अक्षयवट असें कनिंगहॅम म्हणतो. भारतांत प्रयागाच्या वर्णनांत वटाचा उल्लेख मुळींच नाहीं. तथापि हल्लीं त्याचें माहात्म्य आहे हें खरें.

असला पाहिजे. परंतु अकबराच्या वेळीं अबदुल कादीर यानें लिहिलें आहे कीं त्यावरून लोक नदींत उड्या टाकित. यावरून ९०० वर्षांत नद्यांनीं वाळवंट धुपून जाऊन, त्या वटवृक्षाच्या अगदीं जवळ आल्या असें होतें. अकबराच्या पूर्वीच लोकांनीं तेथील वस्ती सोडून दिली असावी. कारण त्या जागीं अकबरानें किल्ला बांधला (इ० स० १५७२) व शहर पुनः वसविलें.

प्रयाग प्रांताचा घेर हुएनसंग यानें ८३३ मैल सांगितला आहे. परंतु तो ८३ असावा. गंगायमुना यांच्यामधील अरुंद प्रदेश मात्र त्यांत असेल.

## १५. कोशांबी

हें नगर वैदिक व बौद्ध या दोन्ही धर्मांच्या लोकांत प्रसिद्ध आहे. पुरूरव्यापासून १० वा पुरुष कुशांब यानें ही नगरी स्थापिली. अर्जुनापासून आठवा पुरुष निमिचक्र हा हस्तिनापुरांत राज्य करित असतां भागीरथीच्या पुरानें तें वाहून गेल्यावर त्यानें कोशांबी ही आपली राजधानी केली, तेंव्हांपासून ती विशेष प्रसिद्ध आहे. रामायणांतहि कौशांबीचा उल्लेख आला आहे. कौशांबी एथील उदयन राजाची कथा पुष्कळ ग्रंथांत आली आहे. कालिदासानें मेघदूतांत ( श्लोक ३१ ) तिचा उल्लेख केला आहे. सोमदेव कवीच्या बृहत्कथा ग्रंथांत ती सविस्तर सांगितली आहे. रत्नावली नाट-

---

१. कुशांबस्तु महातेजाः कौशांबीमकरोत्पुरीं । वाल्मीकिरामायण, ३४.६.–हा कुशांब, ब्रह्मपुत्र कुशराजाच्या ४ पुत्रांपैकीं एक असा पर्वसंदर्भ आहे.

कांतील कथा उदयनाचीच होय. ती कौशांबी एथेच घडलेली आहे. रत्नावलींत त्या राजाचें नांव वत्सराज आहे व त्याच्या नगरीस वत्सपत्तन असेंहि म्हटलें आहे. यावरून वत्सपत्तन हें कोशांबीचेंच दुसरें नांव होय.

कौशांबी एथील उदयनाची बौद्ध लोकांत तर विशेष प्रसिद्धि आहे. बौद्ध लोकांच्या पांचवार्षिक सभांपैकीं दुसरीच्या अगोदर यस हा वैशालीहून कोशाबी एथे पळून गेल्याचें लिहिलें आहे. हा कोशांबीचा उल्लेख महावंसो ग्रंथांत आहे. तो ग्रंथ ५ व्या शतकांत झाला असावा. ललितविस्तर ग्रंथ इ० स० पूर्वींचा निःसंशय आहे. त्यांत कौशांबीचा राजा शतानीक याचा पुत्र उदयनवत्स हा बुद्धाचा जन्म ज्या दिवशीं झाला त्याच दिवशीं जन्मला असें लिहिलें आहे. सिंहलद्वीपांतील ग्रंथांत कौशांबी ही हिंदुस्थानांतील १९ राजधान्यांपैकीं एक असें लिहिलें आहे. उदयन हा कोशांबीचा राजा अशी तिबेटांतहि प्रसिद्धि आहे. बुद्धानें बुद्धत्व स्वीकारल्यावर ६ वें आणि ९ वें वर्ष एथे घालविलें अशी प्रसिद्धि आहे. हुएन लिहितो कीं उदयन राजानें बुद्धाच्या वेळीं त्याची चंदनी लांकडाची मूर्ति

---

१. महाभारत हें कथांचा केवळ सागर म्हटलें तरी चालेल. असें असून, उदयन राजाच्या ह्या इतक्या प्रसिद्ध कथेचा त्यांत मागमूसहि नाहीं. भारत हें अर्वाचीन अशा मताच्या विरुद्ध हें एक प्रमाण होय. आतां, भारतांत कांहीं भाग प्रक्षिप्त असतील. परंतु मूळ ग्रंथ प्राचीन आहे यांत संशय नाहीं. तो पाणिनीच्य पूर्वींचा असें कै० प्रोफे० कुंटे यांचें मत आहे. आणि पाणिनी बुद्धाच्या पर्वी निदान ३००वर्षांवर झाला असें त्यांनीं सिद्ध केलें आहे.

केली होती, ती कोशांबी एथे जुन्या राजवाड्यांत होती.

वैदिक व बौद्ध दोन्ही धर्मांत प्रसिद्ध असें हें नगर कोणतें याविषयीं अलीकडे पुष्कळ वर्षे शोध नव्हता. कनिंगह्यम लिहितो कीं "१८६१ मध्यें मि० बेलीनें मला सांगितलें कीं अलाहाबादेच्या वर ३० मैलांवर यमुनेच्या कांठीं कोसाम म्हणून खेडें आहे तेंच कौशांबी असावें. पुढें लागलेंच विद्यालयांतील बाबू शिवप्रसाद नामक शोधक गृहस्थानें मला कळविलें कीं कोसाम खेड्यास अद्यापि तेथील लोक कोशांबी नगरी म्हणतात. तेथे जैन लोक पुष्कळ आहेत व सुमारें १०० वर्षांपूर्वी तें मोठें शहर होतें. त्यावरून मीं तें स्वतः पाहिलें व हेंच कौशांबी अशी माझी खात्री झाली." प्रयागाहून नैर्ऋत्य दिशेस हुएन गेला, तेव्हां कौशांबीस गेला. ती दिशाहि जमते. कोसाम यमुनेवर आहे. कौशांबी नगर यमुनेवर होतें याविषयीं एक प्रमाण सांपडलें आहे. बौद्ध धर्मांतील बकुल नामक अर्हताची कथा हार्डी यानें आपल्या बौद्ध धर्मासंबंधें इंग्रजी पुस्तकांत लिहिली आहे. तींत असें आहे कीं बकुल हा कौशांबी एथे जन्मला. तो लहान होता तेव्हां त्याची आई यमुनेंत स्नान करित असतां बकुल यमुनेंत पडला. पुढें तो माशाच्या पोटीं एका स्त्रीस सांपडला वगैरे मोठी कथा आहे. यावरून कौशांबी यमुनेच्या कांठीं होती असें सिद्ध होतें. हुएनच्या प्रवासवृत्ताच्या दोन ग्रंथांत प्रयागापासून तिचें अंतर ५० व ५०० ली लिहिलें आहे. व परत जाते वेळेस प्रयागापासून कौशांबीस जाण्यास त्यास ७ दिवस लागले. आणि कोसाम तर प्र-

यागापासून ३० मैल आहे. परंतु हुएनसंग परत जातांना हर्षवर्धन राजाच्या मोठ्या स्वारीबरोबर होता. प्रयागापासून संकास्यापर्यंत जाण्यास ३७ दिवस लागले त्यांत कौशांबीपर्यंत ७ दिवस लागले. प्रयागापासून संकास्यापर्यंत अंतर फक्त २०० मैल आहे. तेव्हां कौशांबीपर्यंत सुमारें ३७ मैल येतात. तेव्हां अंतर बरोबर मिळतें. ५० किंवा ५०० यांत चुकी असावी. त्याबद्दल १५० धरले तर बरेंच मिळतें. कौशांबीचा घेर हुएन यानें ५ मैल लिहिला आहे. तो कनिंगह्यॅमनें मोजलेल्या अवशेषांच्या घेराशीं मिळतो. तसेंच तेथे एका दगडी खांबावर अकबराच्या वेळचा एक लेख अद्यापि आहे त्यांत हें कोशांबी नगर असें स्पष्ट आहे. तेव्हां नांव, विस्तार, दिशा, अंतर इत्यादि गोष्टींवरून कोसाम हेंच कोशांबी नगर असें सिद्ध होतें.*

कोशांबीच्या राज्याचा घेर हुएनसंग यानें १००० मैल सांगितला आहे. परंतु ती चुकी आहे. तो १००मैल असावा. खरा एथील किल्ल्याच्या दरवाजावरील कोरींव लेखांत कोशांबी किंवा कोशांबीमंडल या राज्याचा उल्लेख केला आहे. त्यांत संवत् १०९२ ( इ० स० १०३५ ) आहे. यावरून तेव्हां तें कनोजपासून स्वतंत्र होतें असें दिसतें.

## १६. कुशपुर

हुएन कौशांबीहून ईशान्येस गंगा उतरून उत्तरेस

* राम वनवासास जातांना शृंगबेरपुरास गंगा उतरून वत्स देशास आला. पुढें प्रयागाकडे गेला. ( वाल्मीकिरामायण, अयोध्या कांड, सर्ग ५३ ). हें नांव व स्थान वरील लेखांशीं सर्वांशीं मिळतें.

Kiashepulo कुशपुर एथे गेला. अंतर ११७ मैल होतें. तेथून पुढें ३० मैलांवर विशाखा एथे गेला. विशाखा म्हणजे अयोध्या हें पुढें दाखविलें आहे. यावरून कुशपुर हें मध्यें गोमती नदीवरील सुलतानपुर एथे असावें. त्याचें जुनें नांव कुशभवनपुर किंवा कुशपुर असें आहे. हीं दोन्ही अगदीं मिळतात. त्या शहराजवळ एक स्तूप होता, त्याप्रमाणें सुलतानपुरच्या वायव्येस ९ मैलांवर एक स्तूप आहे.

कुशपुर हें नांव रामाचा पुत्र कुश यावरून पडलें. मुसलमानांचा इकडे प्रवेश झाल्यावर हें नंदकुमार नांवाच्या राजापासून अलाउद्दिन खिलजी यानें घेतलें. याच्या तीन बाजूंस गोमती नदी आहे. तिच्या उत्तरेस तें आहे. परंतु हल्लीं तें ओस पडून, समोरच नदीच्या दक्षिणतीरीं वस्ती झाली आहे.

सुलतानपुरच्या आग्नेयीस १८ मैलांवर गोमतीच्या उजव्या (पश्चिम) तीरावर धोपापपुर म्हणून हिंदूंचें यात्रेचें एक ठिकाण आहे. हें पुष्कळ जुनें आहे असें अनुमान होतें.

## १७. विशाखा–साकेत–अयोध्या

फाहिआन यानें साकी[1] म्हणून एक राज्य सांगितलें आहे आणि हुएन यानें विशाखा म्हणून सांगितलें आहे. दोघांनीं बुद्धानें लावलेल्या एका झाडाची कथा

---

१. साकी ( Shachi ) हा अपभ्रंश हें स्पष्टच दिसतें. विशाखा हें नांव अयोध्येस होतें असें रामायण, महाभारत यांत कोठेहि नाहीं. हुएनच्या वेळीं कदाचित् तें असेल.

या स्थलांच्या संबंधें सांगितली आहे ती सर्वांशीं मिळ-ते. यावरून तीं दोन्ही एकच होत. तसेंच विशाखा हें साकेत असें दोन चांगल्या प्रमाणांवरून कनिंगहॅ-मनें सिद्ध केलें आहे. साकेत म्हणजे अयोध्या ह्याविषयीं रामायण आणि रघुवंश यांत पुष्कळ प्रमाणें आहेत.

अयोध्येसंबंधें कथा प्रसिद्धच आहेत. रामानें निजधामास जातांना हींतील प्राणिमात्रांस उद्धरून नेलें, त्यानंतर ही ओस पडली होती. तींत पुनः ऋषभ नामक राजानें वसति केली (वाल्मीकि रामायण, उत्तर कांड, सर्ग १११). ही १२ योजनें लांब आणि ३ योजनें रुंद होती असें रामायणांत सांगितलें आहे (बालकांड, सर्ग ५ श्लोक ५७). सांप्रत अयोध्या शहर २ मैल लांब व पाऊण मैल रुंद आहे. लोकांचीं घरें तर याच्या निमे भागांत मात्र आहेत. हें सरयूच्या उजव्या (दक्षिण) तीरावर आहे. पश्चिमेकडील गुप्तार घांट आणि पूर्वेकडील रामघांट (यांमध्यें ६ मैल अंतर आहे.) ह्या जुन्या शहराच्या पूर्व-पश्चिम हद्दी, व दक्षिणेस ६ कोशांवर भरतकुंड आहे ती दक्षिण हद्द, असें लोक म्हणतात. इतक्या प्रदेशांत यात्रेचीं सर्व स्थानें येतात. या प्रदेशाच्या ईशान्य कोंपऱ्यांत सांप्रतचें अयोध्या शहर आहे.

अयोध्येंतील गोप्रतार नामक तीर्थाचा उल्लेख भारत व रामायण यांत आला आहे. तेथे राम सर्वांसह

---

१ गोप्रतारं ततो गच्छेत्सरय्वास्तीर्थमुत्तमं ॥ ७० ॥ यत्र रामो गतः स्वर्गं सभृत्यबलवाहनः ॥ वनपर्व, अध्याय ८४. तसेंच वाल्मीकिरामायण, उत्तरकांड, सर्ग ११० पहा.

स्वर्गास गेला असें सांगितलें आहे. वर सांगितलेला गुप्तारघाट तेंच गोप्रतार तीर्थ होय.

सरयू नदी रामायणादिकांत प्रसिद्ध आहे. हिलाच घाग्रा म्हणतात. संस्कृतांतील घर्घर शब्दाचा हा अपभ्रंश होय. घर्घर हा एक नद सांगितला आहे. सरयूच्या जवळच उजव्या बाजूनें दहा-पंधरा मैलांवर तानसा नदी वहाते. हीच तमसा होय. दशरथानें सरयू आणि तमसा यांचे तट यज्ञयूपांनीं सुशोभित केले असें रघुवंशांत वर्णन आहे. ( ९.१७ पहा. ) तसेंच तो मृगयेस गेला असतां तमसा नदीवर गेला व पुढें तेथे श्रावणाचा वध त्याच्या हातून घडला इत्यादि कथा आहे. ( ९.७२ व पुढील श्लोक पहा. ) यावरून तमसा ही अयोध्येच्या व सरयूच्या जवळच असली पाहिजे. यावरून वर सांगितलेली नदीच तमसा होय.

नंदिग्राम अयोध्येजवळच एका कोशावर होता. (युद्धकांड, सर्ग १२७. )

---

१. कैलासशिखरे राम मनसा निर्मितं सरः । ब्रह्मणा प्रागिदं तदग्स्मभून्मानसं सरः ॥ तस्मात् सुस्राव सरसः सायोध्यामुपगूहते । सरः प्रवृत्तासरयूः पुण्या ब्रह्मसरः सुता ॥ ९ ॥ वाल्मीकिरामायण, बालकांड, सर्ग २६.

२. वाल्मीकीचा आश्रम जिच्या कांठीं होता ती तमसा भागीरथीच्या दक्षिणस आहे. अयोध्येच्या जवळच अयोध्या आणि गोमती यांमध्यें एक तमसा होती तिचा उल्लेख रामायणांत पुष्कळ वेळां आला आहे ( अयोध्या कांड, सर्ग ४५ इत्यादि ). तेव्हां वर सांगितलेली अयोध्येच्या जवळची तानसा हीच ही तमसा होय.

अयोध्येच्या जवळच फैझाबाद शहर आहे. त्या दोहोंमिळून ६ चौरस मैल क्षेत्र होईल. फैझाबाद ही प्रथम अयोध्येच्या नबाबांची राजधानी होती. परंतु अझोफ अद्दवला यानें इ० स० १७७५ मध्यें ती सोडली. हुएनच्या वेळीं विशाखनगराचा घेर २$\frac{२}{३}$ मैल होता. राज्याचा घेर ६६७ मैल हुएनसंग लिहितो. हा जास्त असावा. तो सुमारें ६७ मैल असेल व गोमती आणि घाग्रा यांच्या मध्यें तें असावें.

अयोध्या ही प्राचीन कोसल देशाची राजधानी होय.

## १८. श्रावस्ती

प्राचीन अयोध्या प्रांताचे सरयू नदीनें मोठे दोन भाग झाले होते. उत्तरेकडच्यास उत्तर कोसल हें नांव होतें. प्रत्येकाचे दोन दोन पोटभाग असत. दक्षिणच्याचे पूर्वराष्ट्र आणि पश्चिमराष्ट्र असे विभाग होते. व उत्तर कोसलाचे दोन होते. रापती नदी, जिला सर्व अयोध्या प्रांतांत रावती म्हणतात, तिच्या दक्षिणच्या भागास गौड आणि उत्तरच्यास कोसल नांव होतें. गौड हें नांव अद्यापि गोंड या रूपानें आहे. यांपैकीं कांहीं नांवें पुराणांत आढळतात. वायुपुराणांत सांगितलें आहे कीं लवानें उत्तर कोसल देशांत श्रावस्ती एथे राज्य केलें. ( लवानें श्रावस्ती एथे राज्य केलें असें वाल्मीकिरामायणांतहि आहे. ) परंतु मत्स्य, लिंग आणि

---

१. दक्षिणच्यास बनौध नांव होतें असें कनिंगहॅम म्हणतो. हें नांव व पूर्वराष्ट्र आणि पश्चिमराष्ट्र असे विभाग त्यानें कोणत्या आधारावरून सांगितले आहेत हें समजत नाहीं.

कूर्म या पुराणांत सांगितलें आहे कीं श्रावस्ती गौडदेशांत होती. यांत प्रथम विसंगतता दिसते. परंतु गौड हा उत्तरकोसलाचाच एक भाग होता असें समजल्यावर विसंगतता नाहीं. कनिंगह्यॅम म्हणतो कीं गौडब्राह्मण हे मूळचे या प्रांतांतले असावेत. बंगालप्रांतांतील गौड शहरचे नव्हत. गौडब्राह्मण अद्यापिहि घाग्रा नदीच्या उजव्या अंगास अयोध्या आणि जहांगिराबाद् एथे व डाव्या तीरावरील गौडप्रांतांत व शेजारच्या गोरखपुर प्रांताच्या बहुतेक भागांत पुष्कळ आहेत.

असो. वरील विवेचनावरून श्रावस्ती ही उत्तरकोसल देशाची राजधानी आणि अयोध्या ही शरयूच्या दक्षिणेकडील भागाची असें होतें. भारतावरूनहि असेंच दिसतें. कारण, सभापर्वांत ३० व्या अध्यायांत, कोसलाधिपतीस अयोध्येंत जिंकून पुढें गोपालकक्ष घेतल्यावर उत्तरकोसल भीमानें जिंकला असें वर्णन आहे. आतां हे दोनहि भाग नेहमीं निराळ्या राजांच्या स्वाधीन असत असें दिसत नाहीं. इक्ष्वाकूपासून सातवा पुरुष युवनाश्व याचा पुत्र श्रावस्त यानें श्रावस्ती नगरी स्थापिली. तेव्हां हे दोन्ही भाग एकाकडे होते हें स्पष्टच आहे. रामानंतर लवाची एथे स्थापना केली यावरून तेव्हांहि दोन्ही भाग एकाच राज्यांत होते. कर्णदिग्विजयाचें वर्णन, अश्वमेधपर्व, यांत कोसलदेश एकदांच आला आहे. वराहमिहिरानें कोसल ए-

---

१. मूळ श्लोक परिशिष्टांत पहा.

२. तस्य ( युवनाश्वस्य ) श्रावस्तको ज्ञेयः श्रावस्ती येन निर्मिता ( वनपर्व, अध्याय २०२ श्लोक ४ व १ पासून ३ पहा ).

कच सांगितला आहे. यावरून पुष्कळ वेळां दोन्ही भाग एकाकडेसच असत, अर्थात् दोहोंमिळून कोसल हें एकच नांव असे, असें दिसतें. दोन्ही भाग परस्परांस लागून होते असें एकंदर संदर्भावरून निःसंशय दिसतें. रामायणांत अयोध्या ही कोसलदेशांत आहे एवढेंच सांगितलें आहे. कोणत्या कोसलदेशांत हें सांगितलें नाहीं असें दिसतें.

---

१. भारतवर्षीय प्रा० ऐ० कोशांत गोडबोले यानीं ईशान्यकोसल आणि आग्नेयकोसल असे दोन भाग सांगितले आहेत. त्यामुळें त्यांस रामायणांत आधार आहे असा भ्रम होतो आणि ते एकमेकांपासून बरेच दूर आहेत असें वाटतें. परंतु ईशान्य व आग्नेय असे कोसलाचे भाग अगदीं निर्मूल आहेत व ते फार दूर तर नव्हतेच. बहुधा परस्परांस संलग्न होते असें वरील सर्व विवेचनावरून दिसून येईल. उत्तरकोसल व दक्षिणकोसल असे भाग सांगितले असते तर त्यांस आधार होता. दक्षिणेस दुसरा एक कोसलदेश होता, तर त्यास पाहिजे तर अपरदक्षिण अशी खुणा द्यावयाची होती. इंद्रप्रस्थास अनुलक्षून विभाग सांगितले आहेत खरे, परंतु असे निर्मूल व मुख्यतः भ्रमोत्पादक लेख लिहिणें प्रशस्त नाहीं. कौसल्येचा बाप भानुमान् हा ईशान्यकोसलचा (ज्याची राजधानी श्रावस्ती असें ते लिहितात) राजा या त्यांच्या म्हणण्यास कांहीं आधार नाहीं. त्यांनीं बालकांड सर्ग १३ आधार दिला आहे. परंतु त्या व १२ व्याहि सर्गांत त्याचें नांवहि नाहीं. रामायणाच्या एका प्रतींत बालकांड सर्ग १३ यांत त्याचें नांव आहे, परंतु त्याचा देश, नगर हीं नाहींत.

२. कोशलो नाम मुदितः स्फीतो जनपदो महान्। निविष्टः सरयूतीरे पशुधान्यधनर्द्धिमान् ॥ ५ ॥ अयोध्या नाम नगरी तत्रास्ति लोकविश्रुता ॥ बालकांड, सर्ग ५.

अयोध्या ही कोसल देशाच्या दक्षिण भागांत असें वर लिहिलें, यास एक आक्षेप आहे. कालिदासानें अयोध्येच्या राजांस उत्तरकोसलाधिप असें किंवा अयोध्या ही उत्तरकोसल देशांत होती असें रघुवंशांत पुष्कळ वेळां म्हटलें आहे. कोसलदेशाची मर्यादा उत्तरेस शिवालिक पहाडाच्यापर्यंत मात्र असली पाहिजे. दक्षिणेस ती भागीरथीपर्यंत कधीं असेल,—व तितकी असण्याचा संभव आहे—तर मधील प्रदेशाचे बरोबर दोन भाग केले असतां अयोध्या ही उत्तरभागांत येते. असो.

---

* ३.५; ९.१; १३.६२; १८.७ पहा. ११.४९ यांत फक्त कोसलाधिपति एवढेंच म्हटलें आहे.

२. रामायणांत बहुधा सर्वत्र कोसल इतकेंच नांव आढळतें. त्याची दक्षिण सीमा स्यंदिका नामक नदी होती. राम वनवासास जातांना पहिल्या दिवशीं तमसा नदीवर राहिला. दुसरे दिवशीं वेदश्रुति, गोमती, ह्या नद्या उतरल्यावर स्यंदिका नदी लागली. मनूनें इक्ष्वाकुराजास कोसलदेश दिला त्याची ती दक्षिण-सीमा म्हणून तेथून रामादिकांनीं आपल्या देशाची प्रार्थना केली. पुढें सायंकाळीं रामादिक गंगेवर शृंगबेरपुरास आले ( वा० रा०,अयोध्या कांड,सर्ग ४५, ४६, ४९ पहा). उत्तरकोसल हें नांव रामायणांत बहुधा एकदांच ( उत्तरकांड, सर्ग १०७ ) आलें आहे. उत्तरकोसलदेशांत श्रावस्ती नगरींत लवाची आणि कोसलदेशांत कुशावती नगरींत कुशाची स्थापना केली असें तेथे वर्णन आहे. ती कुशावती नगरी विंध्यपर्वताच्या तटप्रदेशीं होती उत्तरकांड. सर्ग १०८ ). वायुपुराणांतहि असेंच आहे. भारतांतहि, सहदेवदिग्विजयांत, दक्षिणेकडे एक कोसलदेश सांगितला आहे. रत्नावली नाटकांत ( अंक ४ ) हि कोसल नामक एक राज्य विंध्यपर्वताजवळ होतें असा उल्लेख आहे. ह्युएनसंग यानेंहि दक्षिणेस

श्रावस्तीचें स्थान कोणतें याविषयीं विद्वानांस पुष्कळ दिवस शंका आहे. हुएनसंगचा लेख व सीलोनमधील बौद्धग्रंथ यांवरून ती अयोध्येच्या उत्तरेस म्हण-

---

( मागील पृष्ठावरून )

एक कोसलदेश सांगितला आहे. ( त्याचें वर्णन पुढें येईल. ) यावरून असें दिसतें कीं अयोध्येच्या भोंवतालचा कोसलदेश, विंध्यसंबंधी कोसलापासून भिन्न दाखविण्याकरितां, उत्तरच्यास उत्तरकोसल असें नांव दिलें. अयोध्या अगदीं ओस पडली, तिच्या ऐवजीं श्रावस्ती झाली अयोध्या ही निराळ्या भागांतली नव्हती. असती तर रामानें सर्व राज्याची व्यवस्था केली त्यांत त्या भागावरहि कोणाची योजना केली असती परंतु तसें कांहीं केलें नाहीं. यावरून ज्या भागाची पूर्वी अयोध्या ही राजधानी होती त्याच भागाची पुढें श्रावस्ती ही झाली. तेव्हां स्यदिकानदीपासून उतरच्या सर्व अयोध्या प्रांतास पूर्वी कोसल एवढें मात्र नांव होतें; अयोध्यानगर ज्यांत तो दक्षिणकोसल आणि श्रावस्ती ज्यांत तो उत्तरकोसल, असे भाग नव्हते असें मला निःसंशय वाटतें. कालिदासाच्या वर्णनावरून असेंच दिसतें. त्यानें तें आधाराशिवाय लिहिलें नसेल. कनिंगह्यामनें तरी पुराणांचा आधार दिला आहे. त्यावरून श्रावस्ती उत्तरकोसल देशांत होती एवढेंच दिसतें; अयोध्या दक्षिणकोसल भागांत होती असें स्पष्ट होत नाहीं. परंतु त्या मतास थोडासा भारताचा आधार मिळतो. म्हणून वाय्वादिपुराणें साग्र पाहिल्याशिवाय आजच तें खोटें म्हणवत नाहीं.

रामायणावरून असेंहि अनुमान होतें कीं, विंध्यपर्वताजवळचा कोसल हा रामाच्या वेळीं नवीनच देश वसला. कुशाची स्थापना त्यांत करून त्यास कोसल नांव द्यावें लागलें.

गोमती आणि गंगा यांच्या मध्यें साई म्हणून एक नदी हल्लीं आहे ती गोमतीस मिळते. तीच स्यंदिनी असावी.

त्रिकांडशेषांत " साकेतमयोध्योत्तरकोसला " असें स्पष्ट आहे.

जे गौड किंवा उत्तरकोसल यांत होती. व या गोष्टीस ४ पुराणांचा आधार आहे. फाहिआन यानें अयोध्या आणि श्रावस्ती यांमधील अंतर ९६ मैल (८ योजनें) लिहिलें आहे. हुएन यानें १०० ली लिहिलें आहे, परंतु तें ३१० ली (९८ मैल) असावें. या अंतराच्या सुमारास अयोध्येच्या उत्तरेस रापती नदीच्या दक्षिणकांठीं साहेट-माहेट शहर आहे. त्या स्थळीं बुद्धाचा एक मोठा पुतळा कनिंगह्यामच्या पाहण्यांत आला. त्यावर लेख होता त्यांत श्रावस्ती हीं अक्षरें होतीं. यावरून साहेट-माहेट हेंच श्रावस्ती असें सिद्ध होतें. या स्थळीं जुने अवशेष पुष्कळ आहेत. हुएनच्या वेळीं हें मोडकळीस आलेलें होतें. गुप्त वंशाचा शेवट इ० स० ३१९ मध्यें झाला तेव्हां हें मोडलें असावें.

श्रावस्तानें हें स्थापिलें असें पूर्वीं सांगितलेंच आहे. यावरून हें रामाच्या पूर्वीचें आहे. बुद्धाच्या वेळीं हें महाकोसलाचा पुत्र प्रसेनजित् याची राजधानी होतें. बुद्धानंतर ९ शतकंपर्यंत ह्याचा उल्लेख आढळत नाहीं. पुढें तेथील राजा विक्रमादित्य बुद्धधर्माचा द्वेष्टा झाला. विभाषा शास्त्राचा कर्ता मनोरहित ह्यास वादामध्यें ब्राह्मणांनीं जिंकल्यामुळें त्यानें आत्महत्या केली. पुढें त्याच्या पुढच्या राजाच्या वेळीं मनोरहिताचा शिष्य वसुबंधु यानें ब्राह्मणांस जिंकिलें. हे दोन राजे इ० स० ७९ पासून १२० पर्यंत झाले असावे. पुढें दोन शतकेंपर्यंत हें राज्य एथल्याच राजांकडे असावें असें दिसतें. कारण खिरधार आणि त्याचा पुतण्या हे इ०स० २७५ पासून ३१९ पर्यंत एथील राजे होते असा लेख

आहे; परंतु या सर्व कालांत हे मगध एथील गुप्तांचे मांडलिक होते असें दिसतें. कारण साकेत हें त्यांजकडे होतें असें वायुपुराणांत स्पष्ट आहे. त्यांत लिहिलें आहे कीं, " प्रयाग, साकेत आणि मगध हा सर्व प्रदेश गुप्तांच्या स्वाधीन होईल ". यापुढें श्रावस्तीचें मान कमी होत चाललें. फाहिआनच्या वेळीं(इ०स०४००) एथे फक्त २०० घरें होतीं. ६३२ मध्यें मुळींच नव्हतीं. हल्लीं तर जंगल आहे. फाहिआन यानें याचें नांव शेवै असें लिहिलें आहे. हें पालीरूप सेवेट किंवा सावथ्थी याशीं जवळ आहे. हल्लींचें साहेट हेंहि त्याच्या जवळजवळच आहे. माहेट हें उपपद आहे. याचें नांव सावित्री असें तेथील एका मनुष्यानें कनिंगह्यम ह्यास सांगितलें, तें सावथ्थी याशीं पुष्कळ मिळतें. यावरून अद्यापि मूळ नांव कायम आहे.

हुएन यानें या राज्याचा घेर ६६७ मैल सांगितला आहे. ह्यावरून यांत घाग्रापासून हिमालयापर्यंत व पश्चिमेकडील कर्णाली नदीपासून पूर्वेस धवलागिरिपर्वतापासून फैझाबादपर्यंत प्रदेश समजावा.

## १९. कपिला

ही बुद्धाची जन्मभूमि होय. दोघां चिनी प्रवाशांनीं दिलेल्या हकीकतीवरून श्रावस्तीच्या आग्नेयीस सुमारें ८२ मैलांवर नगर म्हणून गांव आहे तेंच कपिल होय असें कनिंगह्यमनें सिद्ध केलें आहे. परंतु तें मीं स्वतः पाहिलें नाहीं म्हणून याबद्दल पूर्ण खात्री नाहीं असें कनिंगह्यम म्हणतो. प्रांताचा घेर ६६७ मैल सांगि-

तला आहे. तो फैझाबादपासून घाग्रा आणि गंडक ह्यांच्या संगमापर्यंत त्या दोन नद्यांमधील प्रदेश याच्या घेराशीं मिळतो. ह्या प्रदेशाचा घेर नकाशावर ९९० मैल आहे.

तिबेटांतील बौद्ध ग्रंथांत लिहिलें आहे कीं कपिलवस्तु किंवा कपिलनगर हें गौतमाच्या वंशजांनीं कोसल देशांत रोहिणी नदीच्या जवळ एका सरोवराच्या कांठीं स्थापिलें. सांप्रतचें वर सांगितलेलें नगर हें घाग्रा नदीच्या उत्तरेकडचा जो अयोध्या प्रांताचा भाग त्याच्या उत्तरभागांत, अर्थात् कोसलदेशांत आहे. व तें रापती नदीची एक शाखा कोहान, हिच्या जवळ एका मोठ्या तळ्याच्या कांठीं आहे. कोहान ही नगरच्या पूर्वेस ६ मैलांवर आहे. रोहिणी नदीचें वर्णन निरनिराळ्या बौद्ध ग्रंथांत आहे, त्यावरून कोहान हीच रोहिणी असें म्हणतां येतें. ह्या नदीच्या जवळ लुंबिनी नामक एका बागेमध्यें बुद्धाचा जन्म झाला. ही बाग व बुद्धासंबंधी दुसरीं बरींच स्थानें जीं कपिलवस्तूच्या जवळ होतीं, त्यांचें सांप्रतच्या नगर ह्या जवळील स्थानांशीं ऐक्य कनिंगह्यामनें दाखविलें आहे.

नगर हेंच कपिल असें म्हणण्यास आणखीहि एक प्रमाण आहे. हल्लींचा नगर एथील संस्थानिक गौतम-रजपुत आहे. आणि कपिलवस्तु एथील शाक्य लोक हे गौतम-रजपुत होते. बुद्धासहि गौतम हें नांव होतें.

नगर एथे अवशेष फार नाहींत. फाहिआनच्या वेळीं हें मोडकळीस आलेलें होतें. हुएनच्या वेळीं तर तेथे थोडेसे जती मात्र होते.

## रामग्राम

कपिला एथून दोन्ने चिनी प्रवासी बौद्ध ग्रंथांतील रामग्राम नामक प्रसिद्ध स्थळीं गेले. अंतर, दिशा इत्यादिकांवरून नगर आणि अनोमानदी यांच्या मध्यें, नगरपासून २८ मैलांवर, देवफली म्हणून गांव आहे, तें रामग्राम असें कनिंगह्यम म्हणतो.

## अनोमा नदी

ही बौद्धग्रंथांत प्रसिद्ध आहे. बुद्ध हा यति होण्याचा निश्चय करून कपिला एथून राजगृह एथे जाण्यास निघाला. तो ह्या नदीवर आल्यावर त्यानें आपला सेवक परत पाठविला. व केशवपन करून यतिवेष धारण केला. बुद्धानें तिचें नांव विचारिलें तें अनवमा होतें. एका ग्रंथांत अवमा असाहि पाठ आहे. ललितविस्तरांत कपिलवस्तूपासून तिचें अंतर ६ योजनें (सुमारें ४२ मैल) दिलें आहे. हल्लीं नगरच्या पूर्वेस आमी नांवाची नदी आहे. ती वायव्येकडून आग्नेयीस वहाते. नगरपासून तिचें अंतर ४० पासून ४९ मैलपर्यंत आहे. ही नदी संग्रामपुराच्या खालीं बुद्ध उतरला असावा. नदीच्या पूर्वेचीं स्थलेंहि मिळतात. यावरून बुद्ध उतरला ती आमीच होय. नदी उतरल्यावर त्यानें सेवक छंदक ह्यास परत जाण्यास सांगितलें, तेथे छंदकनिवर्तन नांवाचा स्तूप पुढें बांधण्यांत आला. नदीच्या पूर्वतीरीं छंदोली म्हणून खेडें गोरखपुरच्या दक्षिणेस १० मैल आहे, तें स्तूपाच्या नांवाचें दर्शक दिसतें. बुद्धानें तरवारीनें आपले केश कापिले. ते देवांनीं घेऊन तेथे चूडप्रतिगृह नामक स्तूप बांधिला. छंदवलीच्या उत्तरेस ३ मैलांवर

चुरेय म्हणून खेडें आहे. बुद्धानें पहिलीं वस्त्रें टाकून भगवीं घेतलीं. तेथे लोकांनीं काषायगृह नामक स्तूप बांधिला. छंदोलीच्या आग्नेयीस कासेयर म्हणून एक खेडें सांप्रत आहे.

## पिप्पलवन

अनोमापासून सुमारें ३० मैलांवर एका पिप्पलारण्यांत ( न्यग्रोधारण्य असेंहि कोठे आहे. ) बुद्धाच्या रक्षेवर स्तूप बांधलेला होता. सांप्रतहि या अंतराच्या सुमारें मोठें जंगल आहे, त्यांतच तो असावा. त्या जंगलांत साहनकट नामक एका शहराचे अवशेष गडप झालेले आहेत.

## २०. कुशीनगर

बौद्धग्रंथांवरून दिसतें कीं बुद्ध हा इ० स० पूर्वी ५४३ वे वर्षी वैशाख शुद्ध पूर्णिमेस कुशीनगर एथे निर्वाण पावला. हुएन पिप्पलवनांतील स्तूपापासून ईशान्येस कुशीनगर एथे गेला. त्या दिशेस २८ मैलांवर काशिआ गांव आहे. तें व त्याच्या जवळील अनरुद्धव याच्या जवळ जुने अवशेष आहेत, त्यांत माथकुवारका कोट असें एकास नांव आहे त्याचा अर्थ मृतकुमाराचा स्तूप असा होतो. या दोन नांवांच्या सादृश्यावरून बुद्धाचें निर्वाण एथेच झालें असावें. चिनी प्रवाशांनी लिहिलेल्या अंतरावरूनहि हीच जागा संभवते.

## २१. वाराणसी—बनारस—अविमुक्त क्षेत्र

सांप्रत सर्व भारतवर्षांत वैदिकधर्मसंबंधें अतिपवित्र स्थान हेंच होय. भारतांत वनपर्वांत तीर्थादिकांचें वर्णन

पुष्कळ आहे त्यांत गंगेचें माहात्म्य पुष्कळ आहे. परंतु वाराणसीचें माहात्म्य फारसें वर्णिलें नाहीं. तथापि इतर पुराणांत वाराणसीचें माहात्म्य पुष्कळ सांगितलें आहे. वरणा आणि असी ह्या दोन नद्यांच्या नांवांवरून हें नांव पडलें आहे. ह्या क्षेत्रास काशी असेंहि नांव आहे. हें काशि नामक राजावरून पडलें. अविमुक्त असेंहि याचें आणखी नांव आहे.

सांप्रत बनारस हें शहर भागीरथीच्या डाव्या (पश्चिम) तीरावर वसलेलें आहे. ह्याच्या ईशान्येकडून वरणा नदी वहाते, आणि नैर्ऋत्यभागीं असी हा ओढा आहे. वरणा ही बरीच मोठी नदी आहे. ती अलाहाबादच्या उत्तरेस उगम पावून १०० मैलांवर काशीजवळ भागीरथीस मिळते. असी हा लहानसा ओढा आहे म्हणून तो नकाशांत दाखविला नसतो. दोहोंचा गंगेशीं जेथे संगम होतो तीं स्थानें पवित्र मानिलेलीं आहेत. व त्या स्थलीं पुष्कळ देवालयें आहेत. शहराच्या खालच्या बाजूस वरणेचा गंगेशीं संगम झाला आहे, व वरच्या बाजूस असीचा संगम झाला आहे. सामान्यतः ह्या दोन नद्या वाराणशीच्या उत्तर व दक्षिण भागीं आहेत.

हुएनसंग यानें लिहिलें आहे कीं हें राज्य ६६७ मैल घेराचें आहे. राजधानी भागीरथीच्या पश्चिमतीरावर ३ मैल लांब व एक मैल रुंद आहे. या राज्याच्या मर्यादा अशा असाव्याः—उत्तरेस गोमती नदी. पश्चिममर्यादा गोमतीपासून अलाहाबादेवरून बिल्हारीपर्यंत.

* भारतादिकांत मूळच्या काशिराजानंतरच्याहि काशी एथील सर्व राजांस काशिराज हें नांव सामान्यतः आढळतें.

दक्षिणहद्द बिल्हारीपासून सोमहट. आणि कर्मनाशा व भागीरथी ही पूर्व सीमा.

अबुल्फजल यानें वरणा आणि असी या दोन नद्यांचा उल्लेख केला आहे.

बुद्धानें आपलें मत प्रथम काशी एथे प्रसिद्ध केलें. ( धर्माचें चक्र फिरविण्यास आरंभ केला असें आलंकारिक रीतीनें वर्णन करितात ). बुद्धानें जन्मांत ज्या चार मोठ्या गोष्टी केल्या त्यांपैकीं ही एक मानितात. तिच्या स्मरणार्थ एथे मोठा स्तूप बांधण्यांत आला. त्यास हल्लीं धामेक म्हणतात. तो शहराच्या उत्तरेस ३½ मैलांवर आहे.

## २२. गर्जपतिपुर

हुएन काशीहून पूर्वेस ५० मैलांवर एका शहरास गेला. त्याच्या नांवाचें त्यानें " युद्धाच्या स्वामीचें नगर " अशा अर्थाचें चिनी भाषेंत भाषांतर केलें आहे. सांप्रत सदरहू अंतराच्या सुमारास गाजिपुर शहर आहे. हें नांव मुसलमानांनीं पूर्वींच्या नांवांत थोडासा फेर करून दिलेलें आहे; पूर्वींचें नांव गर्जपतिपुर अशासारखें असावें; याचा वर लिहिलेला अर्थ होऊं शकेल, असें कनिंगह्यॅम म्हणतो. प्रांताचा घेर ३३३ मैल सांगितला आहे. गोमती व घाग्रा ह्यांच्यामधील, पश्चिमेकडील तांडा शहरापासून पूर्वेस घाग्रा आणि गंगा यांच्या संगमापर्यंत प्रदेश सुमारें इतकाच आहे.

या शहरापासून हुएन गंगेच्या उत्तरेस नारायण नामक देवालय होतें तेथे गेला. हें घाग्रा आणि

गंगा यांच्या संगमावर असावें. हें संगमस्थान पवित्र मानलेलें आहे. त्या देवाळयाच्या पूर्वेस अशोकाचा एक स्तूप ५ मैलांवर होता.

## २३. वैशाली-विशाला. २४. व्रज

वर सांगितलेल्या स्थलाहून हुएन वैशाली एथे गेला. त्यानें सांगितलेलें अंतर आणि दिशा इत्यादिकांवरून पाहिलें असतां गंडकीच्या पूर्वेस बेसार म्हणून एक खेडें आहे तेंच वैशाली ( विशाला ) नगर असावें. ह्या स्थलीं अद्यापि एक पडका किल्ला आहे, त्यास ' राजा विशालका कोट ' असें म्हणतात. विशाल नामक राजानें विशाला नगरी स्थापिली. हुएन यानें शहराचा घेर दिला आहे त्याप्रमाणें हल्लीं अवशेषांशीं मिळतो. बेसार गांवाचा उल्लेख अबूलफझल यानें केला आहे, यावरून अकबराच्या वेळीं तें प्रसिद्ध असावें. विशाला एथून दक्षिणेस पाटणा शहरास जातांना हुएन मध्यें गंगा उतरला. तिचें अंतर २० मैल दिलें आहे तेंहि मिळतें. तेव्हां बेसार हेंच विशालानगर होय.

वैशाली ह्या राज्याचा घेर ८३३ मैल लिहिला आहे. परंतु गंगा आणि हिमालय यांमध्यें वैशाली आणि व्रज हीं दोन राज्यें सांगितलीं आहेत. आणि व्रजची राजधानी वैशालीपासून ८३ मैलांवर सांगितली आहे. यावरून, व भोंवतीं दुसरीं राज्यें होतीं त्यांच्या सीमा मनांत आणिल्या असतां, दोन्ही प्रांतांमिळून एकच[1] राज्य असावें. पुढील लेखावरूनहि तसेंच दिसून येईल.

---

१. रामायणांत हीं दोन राज्यें निरनिराळीं सांगितलीं आहेत.

बुद्ध व त्याचा शिष्य आनंद यांचा एकदां संवाद झाला, त्यांत बुद्ध म्हणतो " हे आनंदा व्रजांच्या देशांतील ही विशाला नगरी किती सुंदर आहे ! " बुद्धाच्या वेळीं व पुढें वैशालीच्या लोकांस ' लिछवी ' असें म्हणत असत. त्रिकांडशेषांत लिच्छवि*, तिरभुक्ति, विदेह हीं नांवें समानार्थक दिलीं आहेत. विदेह हा जनकाचा देश रामायणांत प्रसिद्धच आहे. तिरभुक्ति हा सांप्रतचा तिरहूत प्रांत होय. तसेंच सांप्रतच्या मिथारी प्रांतांतील जनकपुर शहर हेंच जनकाचें नगर असें त्या प्रांतांतील सर्व लोकांचें मत आहे. हुएन यानें लिहिलेलें अंतर व दिशा यांवरून व नांवावरून त्याच्या वेळेस व्रजची राजधानी जनकपुर हीच असावी.

हुएन यानें लिहिलें आहे कीं व्रज या लोकांस उत्तरेकडील लोक संव्रज असेंहि म्हणत असत. यावरून असें दिसतें कीं व्रज ही एक मोठी जात असावी. तिच्या निरनिराळ्या शाखा होत्या. म्हणजे विशाला एथील लिचवी, मिथिलेचे ( विदेह देशांतले ) वैदेह, आणि तिरहूत प्रांतांतले तिरभुक्ति इत्यादि. या विवेचनावरून व्रज किंवा वाजी यांच्या देशांतला वैशाली हा एक प्रांत होता असें दिसतें. व्रजांच्या ८ जाती होत्या.

व्रज हें राज्य विशालीचे उत्तरेस हुएननें सांगितलें आहे. ह्याची लांबी पूर्व-पश्चिम होती आणि रुंदी उत्तर-दक्षिण होती असें तो म्हणतो. गंडक आणि माही या नद्यांमधील प्रदेशास हें लागू पडतें. याची लांबी ३००

* निच्छवि असा पाठ आढळतो. " तिरभुक्तिस्तु निच्छविः । विदेहः "

मैल आणि रुंदी १०० मैल आहे. हा व्रज किंवा वाजी लोकांचा देश हें पूर्वी सांगितलेंच आहे. दोहोंमिळून एकच* राज्य होतें.

या दोहों प्रांतांत प्राचीन शहरें पुष्कळ आहेत. (विशाला आणि जनकपुर यांविषयीं वर सांगितलेंच.) त्यापैकीं व्रजांच्या ८ शाखांचीं ८ मुख्य शहरें असावीं. विशाला एथून ३३ मैलांवर वायव्येस एक पडकें शहर होतें तेथे बुद्ध पूर्वजन्मीं चक्रवर्ती राजा होता. व त्या गोष्टीच्या स्मरणार्थ तेथे एक स्तूप बांधिलेला होता असें हुएन लिहितो. हें शहर हल्लींच्या केसरीय शहराच्या जागीं असावें. तेथे जुने अवशेष आहेत. हें राजा वेन याचें नगर असें लोक म्हणतात. दुसरीं शहरें नवंदगड, सिमरून, दरभंग, पूरणिया आणि मोतीहारी हीं आहेत. यांपैकीं शेवटलीं तीन अद्यापि मोठीं शहरें आहेत. सिमरून एथे सुमारें साडेपांचशें वर्षें वस्ती नाहीं. नवंदगड हें सुमारें १५०० वर्षें लोकांनीं सोडिलें असावें. एथे एक मोठा जुना पडका किल्ला आहे. त्याची उंची ८० फूट आहे. आणखी एक जुना दगडी स्तंभ आहे त्यावर अशोकाचा कांहीं लेख आहे.

विशाला आणि मिथिला यांसंबंधें रामायणांत उल्लेख आला आहे, त्यावरूनहि त्यांचीं स्थानें जीं वर निश्चित केलीं आहेत तीं खरीं, असें दिसून येतें. विश्वामित्र रा-

---

* या कारणामुळें व पुढें मिथिला आणि विशाला यांविषयीं रामायणांतील माहिती दिली आहे ती एकत्र देणें सोईकर व ती या दोन्ही प्रांतांच्या संबंधी आहे म्हणून दोन्ही प्रांत एकत्र मीं लिहिले आहेत. कनिंगह्यामच्या पुस्तकांत निरनिराळे लिहिले आहेत.

मादिकांसह सीतास्वयंवराच्या वेळीं आपल्या सिद्ध नामक आश्रमाहून मिथिलेस गेला. तेव्हांचें वर्णन बालकांडांत आलें आहे. प्रसंगोपात्त विश्वामित्र अयोध्येंतून निघाल्यापासून मिथिलेस जाईपर्यंत स्थलादिकांचें वर्णन बालकांडांत * आहे, तें सांगतों. राम, लक्ष्मण, विश्वामित्र हे अयोध्येंतून निघून सरयूच्या दक्षिणतीरानें चालले. दीड योजन गेल्यावर सरयूच्या दक्षिणतीरीं विश्वामित्रानें रामास बलातिबला विद्यांचा उपदेश केला. पुढें रात्रीं सरयूच्या कांठीं शयन करिते झाले. पुढें दुसरे दिवशीं सरयू आणि त्रिपथगा ( भागीरथी ) यांचा संगम त्यांच्या दृष्टीस पडला. संगमाजवळ ऋषींचा आश्रम होता. त्याचें नांव कामाश्रम असें होतें. विश्वामित्रानें कथा सांगितली कीं मदन पूर्वीं सांग होता. या स्थलीं शिव तपश्चर्या करित होता तेवेळीं त्यास मोहित करण्याकरितां तो आला असतां शिवानें त्यास दग्ध केलें. जेथे मदनानें अंगत्याग केला, त्यास अंगदेश असें नांव पडलें. त्या अनंगाचा हा आश्रम होय. रामादिक त्या रात्रीं तेथे राहिले. दुसरे प्रातःकाळीं नावेनें गंगा उतरले. नदीच्या दक्षिणतीरीं उतरून कांहीं मार्ग क्रमिल्यावर एक घोरवन त्यांनीं पाहिलें. विश्वामित्रानें कथा सांगितली कीं इंद्रानें एथे आपला मित्र नमुचि याचा

---

* सर्ग २४, २५, २६, २८, ३०, ३१, ३३, ३४, ३६, ४५, ४७, ४८, ५० पहा. वर दिलेल्यापैकीं कांहीं वर्णनाचें एथे कारण नाहीं, तरी पुढें कारण पडत. म्हणून समग्र एथे दिलें आहे.

१. स चांगविषयः श्रीमान् यत्रांगं स मुमोच ह । बाल० स० २५, श्लो० १४.

वध केला. मित्रद्रोहपातकापासून मुक्त करण्याकरितां देवर्षिगणांनीं त्यास एथे पुण्योदकांनीं स्नान घातलें. तेव्हां त्याचा मल आणि करूष नाहींसा होऊन तो पवित्र झाला. म्हणून या देशांस मलज[1] आणि करूष म्हणतात. हे देश पूर्वी चांगले समृद्ध होते. परंतु सांप्रत ताडका आणि तिचा पुत्र मारीच यांनीं हे देश व्यापून त्यांचा नाश केला. त्या ताडकेचें हें अरण्य होय. ती दीड योजन मार्ग अवरुद्ध करून असते. पुढें रामानें ताडकेचा वध केला. मग तें वन निर्भय झालें. त्या रात्रीं ते तेथे राहिले. दुसऱ्या दिवशीं कांहीं मार्ग क्रमिल्यावर वामनाश्रमीं ते आले. विश्वामित्रानें वामनावताराची कथा सांगितली. व ह्या आश्रमासच सिद्धाश्रम म्हणतात, ह्यांतच मी राहतों, असें सांगितलें. पुढें विश्वामित्राचा यज्ञ समाप्तीस गेल्यावर ते दुसऱ्या ऋषींसह मिथिलेस निघाले. सिद्धाश्रमाहून निघून उत्तरेस चालले. सायंकाळीं शोणनदीच्या तीरीं येऊन त्यांनीं वसति केली. हा देश कोण असें रामानें विचारल्यावरून रात्रीं विश्वामित्रानें कुश आणि त्याचे चार पुत्र इत्यादिकांच्या कथा सांगितल्या. त्यांत सांगितलें कीं कुशाच्या वसु नामक पुत्रानें गिरिव्रज स्थापिलें. ही वसूची भूमि होय. तिच्या समंतात् हे पांच पर्वत आहेत. त्यांमध्यें सभोंवार सुमागधी नामक नदी आहे. इत्यादि. पुढें प्रातःकाळीं रामानें विचारलें हा शोणनद खोल आहे. हा आपण कोठे उतरणार ? तेव्हां विश्वामित्रानें सांगितलें कीं हा मार्ग मीं योजिला आहे. याच मार्गानें महर्षि जातात. असें

१. मलद असेंहि आढळतें.

म्हणून बराच मार्ग चालून गेल्यावर अर्धे दिवस गेल्यावर ते जान्हवीतीरीं आले. त्या रात्रीं तेथे राहिले. विश्वामित्रानें गंगोत्पत्ति इत्यादि कथा सांगितल्या. प्रातःकाळीं नौकेच्या साह्यानें गंगा उतरून उत्तरतीरीं आले. नंतर विशाला नगरी त्यांच्या दृष्टीस पडली. विश्वामित्रानें तीसंबंधी कथा सांगितली. दितीनें या देशांत तप केलें. इंद्र तिची सेवा करित एथे राहिला होता. इक्ष्वाकूचा पुत्र विशाल यानें ही नगरी स्थापिली. त्या वंशांतला ( इक्ष्वाकूपासून १० वा ) सुमति नामक राजा एथे सांप्रत राज्य करितो. आजची रात्र एथे राहूं, उद्यां जनक आपल्या दृष्टीस पडेल. नंतर प्रातःकाळीं तेथून मिथिलेस निघाले. जनकाची पुरी दुरून पाहतांच सर्वांस आनंद झाला. इतक्यांत अहल्यावन दृष्टीस पडलें. तेथे रामानें अहल्योद्धार केला. नंतर ते ईशान्येस जाऊं लागले. नंतर मिथिलेस प्राप्त झाले.

वरील वर्णनावरून दिसून येईल कीं, रामादिक शोण नदीच्या पूर्वतीरानें गंगेपर्यंत गेले. मध्यें शोण नदी उतरून तिच्या डाव्या तीरास ते आले नाहींत हें निःसंशय दिसतें. रामानें प्रश्न केला कीं शोण कोठें उतरणार ? तेव्हां विश्वामित्रानें सांगितलें कीं, ह्या मार्गानें मी जाणार व पुढें ते गंगातीरीं आल्याचें सांगितलें आहे. अर्थात् गंगा त्यांस उतरावयाची होतीच, तेव्हां

---

१. इक्ष्वाकोरत्र राजर्षेः पुत्रः परमधार्मिकः । अलंबुषायामुत्पन्नो विशाल इति विश्रुतः ॥ १२ ॥ तेन चासीदिह स्थाने विशालेति पुरी कृता । बालकां० स० ४७.

२. गंगाकूले निविष्टास्ते विशालां ददृशुः पुरीं । सर्ग ४५.

शोण उतरून पुनः ते गंगा उतरले नसतील. म्हणजे संगमाच्या खालींच ते गंगा उतरले असतील असें संभवतें. आतां विश्वामित्राच्या आश्रमास येतांना शोण उतरून दक्षिणेस आल्याचा उल्लेख नाहीं. परंतु विशेष कारण नसल्यामुळें तो केला नाहीं असें दिसतें. कारण आश्रमांतून उत्तरेस गेल्यावर शोणतीर लागलें असें वर्णन आहे. तेव्हां पूर्वी तिच्या दक्षिणेस ते आलेले असलेच पाहिजेत यांत अगदीं संशय नाहीं. असो. कसेंहि असलें तरी शोणनदाच्या कोणत्या तरी तीरावरून जाऊन त्याचा गंगेशीं संगम होतो त्याजवळ ते गंगा उतरले हें खचीत होय. शोणनदी हल्लीं गंगेस मिळते, त्याच्या खालीं ती पाटणाजवळ पूर्वी गंगेस मिळत असे, असें पुढें (मगध पहा.) दाखविलें आहे. तेव्हां विशाला एथून अहल्यावनांत जाऊन तेथूनई शान्येस वळून मिथिलेस गेले. सांप्रतचें जनकपुर वेसारच्या ईशान्येसच आहे. तेव्हां विशाला नगरीसमीपचा देश व जनकाचा विदेहदेश वर निश्चित केलेला तोच होय. आतां विशालानगर गंगेच्या उत्तरेस २० मैल, व तेथून ८३ मैल जनकपुर असें वर सांगितलें. इतकी मजल दोन दिवसांत गेले कसे ही शंका येते. परंतु तिचें समाधान दोन रीतींनीं करितां येतें. अयोध्येहून सरयू व गंगा यांच्या संगमाचें अंतर १७० मैलांहून कमी नाहीं. आणि वाटेंत फक्त एक रात्र मुक्काम केल्याचा उल्लेख आहे. तेव्हां कांहीं मुक्काम सांगितले नाहींत असें दिसतें. सरयूसंगमापासून आश्रमास जातांना शोण उतरल्याचा उल्लेख नाहीं, हें वर सांगितलेंच आहे.

याहि गोष्टीवरून कांहीं मुक्काम सांगितले नाहींत या म्हणण्यास बळकटी*येते. तेव्हां गंगेपासून पूर्वोक्त मार्गानें मिथिला १०३ मैल होती या गोष्टीस बाध येत नाहीं. किंवा दुसरें समाधान असें कीं अयोध्येपासून गंगासरयूसंमापर्यंत सुमारें १७० मैल जाण्यास दोन दिवस पुरले. तर गंगा उतरल्यापासून विशालानगरीवरून १०३ मैलांवर मिथिलेस दोन दिवसांत जाणें अशक्य नाहीं. गंगेच्या तीरावरून विशाला दिसली असें वर्णन

* गौतमाश्रमांत रामादिक एक रात्र राहिले होते, असें कालिदासानें लिहिलें आहे ( रघु० ११.३३ पहा ). यावरूनहि वरील म्हणण्यास बळकटी येते. विश्वामित्राश्रमापासून मिथिलेस जातांना वाटेंत एकदांच ( गौतमाश्रमीं ) वसति केल्याचा उल्लेख कालिदासानें केला आहे. यावरून " गौतमाश्रम विश्वामित्राश्रमापासून एका दिवसाच्या वाटेवर होता " असें विविधज्ञानविस्तारांत एकानें अनुमान काढिलें आहे, परंतु ती चुकी आहे. मध्यें निदान ३ रात्री ते वसतीस होते, असें वरील वर्णनावरून दिसून येईल. एकाद्या गोष्टीचा विशेष निर्देश नसतां सामान्य वर्णनावरून एकादें अनुमान काढितांना विचार केला पाहिजे हें यावरून दिसून येईल.

१. रामानें धनुष्य भग्न केल्यावर दशरथास तें वर्तमान कळवून आणण्याकरितां दूत मिथिलेहून रथांतून अयोध्येस ३ दिवसांत गेले. ( सर्ग ६८ श्लो० १ पहा ). दशरथ ४ दिवसांत अयोध्येहून मिथिलेस आला. ( सर्ग ६९ श्लोक ७ पहा ). हे दोन्ही विशेष निर्देश आहेत. म्हणून प्रमाण धरलेच पाहिजेत. हल्लींचें जनकपुर हेंच मिथिलानगर नसलें, त्याच्या दक्षिणेस गंगेच्या जवळ कोठे असलें तरी तें गंडकीच्या पूर्वेस होतें, यांत अगदीं संशय नाहीं. तेव्हां अयोध्या आणि मिथिला यांत अंतर २३० मैलांहून कमी

आहे, त्यावरूनहि, गंगातीरापासून उत्तरेस २० मैलांवर असणारें बेसार हीच विशाला असें ठरविण्यास बाध नाहीं. शोणनदाच्या तीरावर रात्रीं कथा सांगत असतां विश्वामित्र म्हणाला कीं हें पहा गिरिव्रज. आणि तें तर शोणनदाच्या प्राचीन प्रवाहापासून तीस मैलांहून कमी अंतरावर नसतें. तेव्हां त्यासारखेंच हें वर्णन आहे. गंगा उतरल्यावर त्यांस विशाला दिसली, एवढाच त्याचा अर्थ घ्यावयाचा. असो; तर विशालानगरीसंबंधें देश आणि विदेह देश यांचा स्थाननिर्णय झाला.

हुएन यानें दिलेलें जनकदेशाचें व्रज हें नांव रामायण व भारत यांत नाहीं. देशाचें नांव विदेह, आणि राजधानीचें नांव मिथिला असें आलें आहे. मिथिलेचें पूर्वीचें नांव वैजयंतनगर होतें. निमि नामक राजानें तें स्थापिलें. निमीला वसिष्ठाचा शाप होऊन तो मरण पावला. त्याच्या मृतदेहा ( विदेह ) चें ऋषींनीं मथन केलें त्यापासून एक पुरुष उत्पन्न झाला. मंथना-

---

( मागील पृष्ठावरून )

नव्हतें. इतकें अंतर ३।४ दिवसांत आक्रमित असत. विराटनगर कोणतें याचा निर्णय पूर्वीं केलाच आहे. तें हस्तिनापुराहून १०५ मैलांहून कमी अंतरावर नव्हतें. तितकें अंतर रथानें क्रमण्यास फार तर २ दिवस लागत. सांप्रतहि अशा गोष्टी असंभवनीय आहेत असें नाहीं. खानदेशांत दिवसांत ५० मैल जाणाऱ्या बैलगाड्या आहेत. घोड्याच्या गाड्याहि दिवसांत ६०, ७० मैल जाणाऱ्या हल्लीं आहेत. रामादिक मिथिलेस जातांना पादचारी होते एवढीच कायती अडचण आहे.

पासून झाला म्हणून मिथि, आणि विदेहापासून झाला म्हणून वैदेह, अशीं त्याचीं नांवें पडलीं. व त्यांवरून देशाचें व नगराचें नांव पडलें. ( वाल्मी० रा० उत्त० स० ५९–५७ ).

## २९. नेपाळ

व्रज या राज्यांतून हुएनसंग नेपाळांत गेला. दोहोंमधील अंतर २३३ पासून २९० मैलपर्यंत सांगितलें आहे. जनकपुराहून नेपाळांत जाण्याचे दोन रस्ते आहेत. कोणत्याहि रस्त्यानें गेलें तरी १५० मैलांहून जास्त अंतर नाहीं. राज्याचा घेर ६६७ मैल लिहिला आहे. परंतु हा कमी दिसतो. सप्तकौशिकी ( कौशिकीच्या सात शाखा ) ह्यांच्या तीरांवरील जो नेपाळचा भाग त्याचा घेर इतका आहे. परंतु गंडकी आणि कौशिकी ह्यांचा प्रदेश नेपाळांत आला पाहिजे. इतक्या सगळ्याचा घेर १००० मैल आहे.

नेपाळचा राजा लिचवी जातीचा अंशुमान् म्हणून होता. हा तद्देशीय इतिहासांतला अंघुवर्मा असावा. अंघुवर्म्यापासून १५ वा राजा राघवदेव यानें नेवार शक इ० स० ८८० मध्यें सुरू केला. तेव्हां अंघुवर्मा हा इ० स० ६२५ च्या सुमारें असावा. हें वर्ष हुएनच्या लेखाशीं मिळतें. तो राजा लिचवी होता. यावरून तो व्रज किंवा विशाला एथील असावा.

तिबेट आणि लदक एथील राजेहि आपणांस लिचवी म्हणवितात.

भारतांत कर्णदिग्विजयांत कर्णानें नेपाळ देशांतले राजे जिंकिले असें वर्णन आलें आहे.

## २६. मगध

नेपाळांतून परत वैशालीस येऊन गंगा उतरून हुएन मगधदेशाच्या राजधानीस गेला. तो लिहितो कीं राजधानीचें जुनें नांव कुसुमपुर होतें. व तें शहर लगतच परंतु मोडलेलें होतें. नवें शहर पाटलिपुत्र हें खेरीज करून त्याचा घेर १२ मैल होता. पाटलिपुत्र हें नांव थोडेसें फिरवून '*पालिबोथ्रा' असें ग्रीक ग्रंथकारांनीं लिहिलें आहे. मेगास्थनीस लिहितो कीं "पालिबोथ्रा हें इंडियाचें मुख्य शहर आहे. तें इरानाबो आणि गंगा यांच्या संगमाजवळ आहे. त्याची लांबी ८० स्टाडिआ व रुंदी १५ स्टाडिआ आहे. भोंवतीं खंदक ३० क्युबिट खोल आहे. शहराभोंवतालच्या कोटास ५७० बुरूज आणि ६४ दरवाजे आहेत." यावरून सेल्यूकस निकेटरच्या वेळीं याचा घेर २१$\frac{1}{8}$ मैल होता. सांप्रतच्या पाटणा शहराचा घेर सुमारें २२$\frac{1}{2}$ मैल आहे. तेव्हां ७ व्या शतकामध्यें फक्त कुसुमपुराचा घेर १२ मैल असणें संभवतें.

वायुपुराणांत लिहिलें आहे कीं कुसुमपुर किंवा पाटलि-

---

* 'पालिबोथ्रा' या नांवावरून पाटलिपुत्र असें युरोपियन लिहितात. परंतु पाटलिपुर हें नांव खरें. कारण आपल्या ग्रंथांत तें आढळतें. पाटलिपुत्र असें आढळत नाहीं. तथापि त्रिकांडशेषांत 'पाटलिपुत्र' असा पाठ आहे.

१. आपला प्रख्यात ज्योतिषी आर्यभट्ट हा कुसुमपुरांत होऊन गेला. "ब्रह्मकुशशिबुधभृगुरविकुजगुरुकोण (शनि) भगणान्नमस्कृत्य । आर्यभट्टस्त्विह निगदति कुसुमपुरेऽभ्यर्चितं ज्ञानम् ॥ १ ॥ आर्यभट्टीये द्वितीयो गणितपादः" दुसरे कोणीं एकानें असेंच सांगितलें आहे.

पुर हें अजातशत्रूचा नातू राजा उदयाश्व यानें स्थापिलें. अजातशत्रु म्हणून एक राजा बुद्धाशीं समकालीन होता. महावंसो ह्या बौद्ध ग्रंथांत लिहिलें आहे कीं उदय हा अजातशत्रूचा पुत्र होता. दुसऱ्या बौद्ध लेखांवरून दिसतें कीं राजगृहाहून बुद्धाचें अगदीं शेवटचें जाणें वैशालीस झालें, तेव्हां अजातशत्रूचे प्रधान पाटलि ह्या खेड्यांत एक किल्ला बांधूं लागले होते. तेव्हां बुद्धानें सांगितलें कीं हें एक मोठें शहर होईल. यावरून असें दिसतें कीं अजातशत्रूच्या वेळींच पाटलिपुर बांधण्याची सुरुवात झाली होती. तें त्याचा मुलगा किंवा नातू याच्या वेळीं ( इ० स० पू० ४५० च्या सुमारें ) पुरें झालें असावें.

ग्रीकांनीं लिहिलेली इरानावो ही गंडकी अशी पुष्कळ दिवस समजूत होती. परंतु शोण नदी हल्लीं गंगेस मिळते तेथे पूर्वीं न मिळतां त्याच्या खालीं म्हणजे पाटणाच्या वर जवळच मिळत असे, असें आतां निर्विवाद सिद्ध झालें आहे. शोण नदीस हिरण्यवाह असें नांव आहे. तेव्हां नांव आणि स्थान यांच्या ऐक्यावरून इरानावो ही शोण असें स्पष्ट होतें.

हुएन यानें प्रांताचा घेर ८३३ मैल लिहिला आहे. ह्याच्या उत्तरेस गंगा, पश्चिमेस बनारस प्रांत, दक्षिणेस किरणसुवर्ण अथवा सिंगभूम, आणि पूर्वेस हिरण्यपर्वत किंवा मोंगीर, हे प्रांत होते. यावरून हा प्रांत पश्चिमेस कर्मनाशा नदीपर्यंत व दक्षिणेस दामुदा नदीच्या उगमापर्यंत असावा. इतक्या प्रदेशाचा घेर नकाशावर ७०० मैल आहे.

धर्मसंबंधें बुद्धाचा प्रथमचा पुष्कळ काळ मगध देशांत गेला यामुळें इतर प्रांतांपेक्षां यांत बौद्ध धर्माचीं पवित्र स्थानें पुष्कळ आहेत. त्यांपैकीं व इतर कांहीं स्थलांचें वर्णन पुढें आहे.

## गया आणि बुद्धगया

पाटलिपुराहून हुएन गया एथे गेला. हें प्रसिद्ध स्थान पाटणाच्या दक्षिणेस ६० मैलांवर आहे. वाटेंत त्यास तिलीत्सेकियाचा विहार लागला. हें स्थान पाटणाच्या दक्षिणेस ३३ मैलांवर फल्गु नदीच्या पूर्वतीरावरील तिलार शहर असावें. पुढें तो, बुद्धानें ज्या पर्वतावर बसून मगधप्रांताविषयीं विचार केला त्या पर्वतावर गेला. हा पर्वत गिर्यक आणि गया यांमधील डोंगरांच्या उंच रांगांत वजीरगंजच्या वायव्येस ३ मैलांवर असावा. पुढें तो ९ मैलांवर गुणमतीच्या मठांत गेला. हें स्थान पेवार नदीच्या पूर्वकांठीं असावें. तेथून तो ३ मैलांवर शिलभद्रविहारांत गेला. पुढें तो नैरंजन नदी उतरून गयेस गेला. सांप्रत गयेसमोरील नदीस फल्गु म्हणतात. आणि लिलाजन ( नैरंजन ) हें नांव गयेच्या वर ९ मैलांवर फल्गूस मिळणाऱ्या एका नदीस आहे. त्यावेळीं गयेंत फारशी वस्ती नव्हती. तरी ब्राह्मणांचीं घरें १००० होतीं. ही वैदिक धर्मी लोकांची गया व बुद्धगया ह्यांमध्यें भेद राखण्याकरितां वैदिकगयेस ब्रह्मगया म्हणतात. तेथून बौद्धगया दक्षिणेस ९ मैल आहे.

गया हें मोठमोठ्या पवित्रस्थानांपैकींच सांप्रत एक मानितात. भारतादिकांत याचें माहात्म्य वर्णिलें आहे.

गय नामक राजानें एथे अनेक यज्ञ करून अपरिमित दानें केलीं. त्याच्या नांवावरून गया हें नांव पडलें. गयानें वानीरमालिनी नदी आणि ब्रह्मसर नामक सरोवर यांसमीप हे यज्ञ केले; आणि ब्रह्मसर हें धर्मारण्यांत आहे असें वर्णन आहे. तेव्हां हीं स्थानें गयेसमीपचींच आहेत. गयेच्या अक्षयवटाचीहि फार प्रसिद्धि आहे. तसेंच गयशिर नामक पर्वत, फल्गु नदी आणि महानदी हींहि गयाप्रदेशांतील पवित्रस्थानें आहेत.

गयेच्या नैर्ऋत्येस एक मैलावर एक पर्वत आहे त्यास सांप्रत ब्रह्मजोनि ( ब्रह्मयोनि ) म्हणतात. हाच किंवा गयेजवळ दुसरे पर्वत आहेत त्यांतला कोणता तरी गयशिर असावा. फल्गूच्या पश्चिमतीरावर गया आहे. गयेच्या पश्चिमेस ९ मैलांवर मुरहार नदी आहे हीच महानदी असेल.

अशोकाचा एक स्तूप एथे होता; त्या जागीं हल्लीं लहानसें देवालय आहे. प्राग्बोधि म्हणून एका पर्वतावर बुद्ध चिंतन करण्यास गेला होता. तो नदीच्या पलीकडे होता. सांप्रतचा मोरापहाड हाच तो होय. शाक्यमुनि ज्या पिप्पलवृक्षाखालीं ९ वर्षें तप करित होता तो बौद्धगया एथे आहे. सांप्रतहि हा वृक्ष आहे.

## कुक्कुटपद इत्यादि

बौद्धगयेहून गंधहस्ति एथील स्तूप पहाण्यास हुएन गेला. ह्याचे अवशेष बौद्धगयेच्या आग्नेयीस एक मैलावर आहेत. नंतर तो कुक्कुटपद पर्वतावर गेला. हें स्थान हल्लींचें कुरकिहार होय. ह्याच्या जवळ तीन टेंकड्या आहेत. तेथून ईशान्येस १७ मैलांवर बुद्धवन नांवाच्या

पर्वताकडे तो गेला. बुद्धेन म्हणून टेंकडी हल्लीं आहे. तोच बुद्धवन होय. पुढें पूर्वेस ९ मैलांवर यष्टिवन लागलें त्यास हल्लीं जखतिवन म्हणतात. त्याच्या नैर्ऋत्येस २ मैलांवर उष्णोदकाचे झरे लागले. जखतिवनाच्या दक्षिणेस २ मैलांवर तपोवन नांवाच्या जागीं हे झरे अद्यापि आहेत. पुढें पूर्वेस सुमारें १२ मैलांवर कुशागारपुर लागलें.

## कुंशागारपुर–राजगृह–गिरिव्रज

गिरिव्रज किंवा राजगृह ही मगध देशाची प्राचीन राजधानी होय. फाहिआन लिहितो कीं गिरिव्रज हें नव्या राजगृहाच्या दक्षिणेस सुमारें पाऊण मैलावर पांच टेंकड्यांमध्यें होतें. हुएन यानें असेंच सांगितलें आहे. तो आणखी सांगतो कीं पांच टेंकड्यांमिळून भोंवतालीं कोटाप्रमाणें होतें. रामायणांत गिरिव्रजाचें वर्णन असेंच आहे. जुनें राजगृह ज्यास हल्लीं पुराण राजगिर म्हणतात, त्यास हें वर्णन सर्वांशीं लागू पडतें. महाभारतांत पांच टेंकड्यांचीं नांवें—वैहार, वराह, वृषभ, ऋषिगिरि, आणि चैत्यक अशीं आहेत. सांप्रत त्यांस बैभारगिरि, विपुलगिरि, रत्नागिरि, उदयगिरि आणि सोनगिरि असें म्हणतात. बैभार टेंकडीवर जैन लेख आहेत, त्यांत बैभार आणि व्यवहार अशीं नांवें आढळतात. बौद्ध लोकांची पहिली पांचवार्षिक सभा इ० स० पू० ५४३ वे वर्षी वेभारो पर्वतावर भरली होती, तो हाच होय.

जुन्या राजगृहाचा ( गिरिव्रजाचा ) घेर चिनी प्रवाशांनीं ९ मैल सांगितला आहे. कनिंगह्यॅमनें स्वतः

मोजिला तो ४$\frac{1}{2}$ मैल भरला. लांबी वायव्य–आग्नेय अशी आहे. टेंकड्यांची एकंदर लांबी ८ मैल आहे.

कुशागरपुर हें हुएननें सांगितलेलें नांव रामायणांत नाहींच. परंतु भारतांतहि नाहीं. राजगृह हें नांव रामायणांत नाहीं परंतु भारतांत वनपर्वांत ( अ० ८४ श्लो० १०३ ) आलें आहे. तेथे एक यक्षिणी आहे म्हणून सांगितलें आहे. तसेंच अश्वमेधाच्या वेळीं अश्व राजगृहास गेला होता ( अ० ८२ श्लो० २ ). गिरिव्रज हें नांव रामायणांत आहे. व भारतांत सभापर्वांत जरासंधवधसंबंधानें व भीमाच्या दिग्विजयांत आलें आहे, कुश राजाचा पुत्र वसु यानें तें वसविलें.

एथे उष्णोदकाचे झरे सरस्वती ओढ्याच्या दोहों-बाजूंस आहेत. बैभार टेंकडीजवळ आहेत त्यांचीं नावें:— गंगायमुना, अनंतऋषि, सप्तऋषि, ब्रह्मकुंड, काश्यप, व्यास, मार्कंडेय. यांपैकीं सप्तर्षि हा सर्वांत जास्त उष्ण आहे. विपुल टेंकडीजवळ सीताकुंड, सूर्यकुंड, गणेशकुंड, चंद्रमाकुंड, रामकुंड, शृंगऋषिकुंड अशीं ६ कुंडें आहेत. हुएन यानेंहि या कुंडांचा उल्लेख केला आहे. ईशान्येस २$\frac{1}{2}$ मैलांवर गृध्रकूट पर्वत होता. तो सांप्रतचा शैलगिरि होय.

## राजगृह

जुन्या राजगृहाच्या उत्तरेस $\frac{2}{3}$ मैलावर नवें राज-

---

१. गिरिव्रज आणि राजगृह यांनंतरची मगध देशाची राजधानी कुसुमपुर किंवा पाटलिपुर हिचें नांव रामायण व भारत यांत नाहीं. रघुकाव्यांत मगधची राजधानी पुष्पपुर हिचा उल्लेख आहे ( ६. २४ पद्य ).

गृह होतें असें हुएन लिहितो. हें नवें शहर झाल्यावर याच्या नांवावरून गिरिव्रजास जुनें राजगृह म्हणूं लागले असावे. नवें राजगृह श्रेणीक राजानें स्थापिलें असें म्हणतात. त्या राजास बिंबसार असेंहि नांव होतें बुद्धाचा समकालीन अजातशत्रु राजा त्याचा हा बाप होय. बुद्ध हा राजगृह एथे बराच काळ होता. हुएन-च्या वेळीं शहराच्या बाहेरील भिंती पडलेल्या होत्या; आंतल्या चांगल्या होत्या.

हें पाटणाच्या दक्षिण—आग्नेयीस सुमारें ४० मैलांवर आहे. हल्लीं एथे राजगिर नांवाचा मोडका किल्ला आहे.

## नालंद

बौद्धधर्मासंबंधें विद्येचें सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्ध असें हें शहर होतें. राजगिरच्या उत्तरेस ७ मैलांवर बारागांव म्हणून खेडें आहे त्यांत जुने अवशेष पुष्कळ आहेत. खोदीव कामाचे उत्तम नमुने आढळतात. नालंद शहर हेंच असावें. चिनी प्रवाशांनीं तीन-चार स्थलांपासून दिलेलीं अंतरें याशीं सर्वांशीं मिळतात. व एथे दोन कोरींव लेख आढळले त्यांत नालंद नांव आढळलें आहे.

## इंद्रशिलागुहा

गयेपासून ईशान्येस ३६ मैलपर्यंत टेंकड्यांच्या दोन समांतर रांगा पंचान नदीपर्यंत गेल्या आहेत. त्यांच्या टोंकाच्या समोर नदीच्या दुसऱ्या तीरास गिर्यक म्हणून स्थान आहे. उत्तरेच्या रांगेच्या शेवटीं दोन शि-

---

१. हीं दोन्ही नांवें भारतांत नाहींत यावरून राजगृह नांव ज्यांत आलें आहे ते श्लोक प्रक्षिप्त असावेत.

खरें आहेत. त्यांतील एकावर विटांची एक इमारत आहे. तीस 'जरासंधकी बैठक' म्हणतात.

इंद्रशिलागुहा एथे इंद्रानें बुद्धास ४२ प्रश्न केले. त्या स्थानाचें वर्णन हुएन यानें केलें आहे त्यावरून तें गिर्यकच असावें.

## २७. हिरण्यपर्वत

पुढें हुएन हिरण्यपर्वत या राज्यांतील राजधानीस गेला. शहराजवळ हिरण्य नामक पर्वत होता. त्यांतून ज्वाला व धूर निघत होता. ह्यावरून, आणि त्यानें दिलेली दिशा व अंतर यांवरून, तें शहर हल्लींचें गंगेच्या कांठचें मोंगीर होय. ह्याच्या जवळच्या डोंगरांतून सांप्रत ज्वाला निघत नाहींत तरी आसपास उष्णोदकाचे झरे आहेत; यावरून पूर्वी तो ज्वालामुखी असावा.

ह्या शहराची जागा सोईची आहे. यावरून प्राचीनकाळापासून हें वसलें असावें असें दिसतें. भीमानें पूर्वदिग्विजयांत मोदागिरि एथील राजाचा युद्धांत वध केला असें वर्णन महाभारतांत आहे. तें राज्य कदाचित् हेंच असेल. मोदागिरि आणि मोंगीर या नांवांमध्येंहि सादृश्य आहे.

हुएनच्या वेळीं हें राज्य नुकतेंच एका जवळच्या राजानें घेतलें होतें. राज्याच्या उत्तरेस गंगा व दक्षि-

---

१. भारतांत ह्या वर्णनांत भीम गिरिव्रज एथून अगोदर [ अंगदेशांत ] कर्णास जिंकून मग मोदागिरीस गेला असें आहे. आणि अंगदेशाची राजधानी चंपा भागलपुराजवळ म्हणजे मोंगिरच्या खालीं असें पुढें दाखविलें आहे. एवढी अडचण मोंगीर हें मोदागिरि म्हणण्यास आहे.

णेस अरण्यांनीं युक्त असे पर्वत होते. घेर ६०० मैल होता. यावरून दक्षिणेकडील प्रसिद्ध पारसनाथ पर्वतापर्यंत तें असावें.

## २८. चंपा

मोंगीर एथून ६० मैलांवर चंपा एथे हुएन गेला. चंपा हें भागलपुर प्रांताचें प्राचीन नांव आहे. राजधानी नदीनें वेष्टिलेल्या एका टेंकडीच्या पश्चिमेस सुमारें २५ मैलांवर भागीरथीच्या कांठीं होती असें हुएन लिहितो. यावरून ती टेंकडी पथरघांटाच्या समोरील खडकाळ बेटांतील होय हें स्पष्ट दिसतें. पथरघांटाच्या पश्चिमेस २४ मैलांवर भागलपुर आहे. यावरून भागलपुर एथेच किंवा त्याच्या जवळ राजधानी असावी. भागलपुरच्या पश्चिमेस जवळच चंपानगर आणि चंपापुर अशीं दोन खेडीं आहेत. यावरून तेथेच प्राचीनकाळचें अंगदेशांतलें चंपानगर होतें असें सिद्ध होतें.

राज्याची मर्यादा ६६७ मैल होती. यावरून याच्या सीमा, उत्तरेस भागीरथी, पश्चिमेस हिरण्यपर्वत हें राज्य, दक्षिणेस दामुदानदी आणि पूर्वेस गंगेची भागीरथी ही शाखा अशा असाव्या. इतक्या प्रदेशाचा घेर नकाशावर ४२० मैल आहे.

मोंगीरचें राज्य एका राजानें घेतल्याचें लिहिलें आहे, तो राजा चंपाचा असावा. असें मानलें म्हणजे ह्या राज्यांत मोंगीर व पूर्वेचें कांकजोल हीं धरून घेर जमतो.

अंगदेश आणि त्याची राजधानी चंपा यांचा उल्लेख

---

१. अंगदेशाची राजधानी चंपा होती याविषयीं रामायण, बालकांड सर्ग ९ श्लोक ११ व सर्ग १७ श्लोक ३५ पहा. तसेंच मार•

रामायण आणि महाभारत या दोहोंतहि पुष्कळ वेळा आला आहे. ही चंपानगरी भागीरथीच्या कांठीं होती.

अंगदेशाचें नांव पडण्याचें कारण इत्यादि रामायणांतील कथा पूर्वीं सांगितली आहे. यावरून सरयू-गंगासंगमाच्या वर अंगदेश न मानिला तरी तेथपासून तो होता असें स्पष्ट आहे. त्या संगमापासून भागलपुरापर्यंत अंतर १६० मैलांहून कमी नाहीं. पांडव तीर्थयात्रा करित अंगदेशांत गेले तेव्हांच्या वर्णनांत दशरथाचा सखा लोमपाद याची कथा आली आहे ती (वनपर्व, अध्याय ११० पासून ११४ पर्यंत पहा.) पाहिली असतां, कौशिकीनदी ही अंगदेशांतच किंवा अं-

( मागील पृष्ठावरून )

वनपर्व, अ० ११३ श्लोक १५ पहा. दशकुमारचरितांतहि अंगदेशाची राजधानी चंपा असें आलें आहे (उत्तरखंड द्वितीयोच्छ्वास).

१. कुंतीला कौमार्यावस्थेंत कर्ण पुत्र झाला तो तिनें पेटींत घालून नदींत सोडून दिला. तो राधेस सांपडला व पुढें अंगदेशाधिपति झाला, इ० कथा प्रसिद्धच आहे. कुंती तेव्हां पिता कुंतिभोज याच्या घरीं होती. त्याच्या नगराजवळील अश्ववती नदींत तिनें पेटी सोडली. ती पुढें कसकशी गेली तें वर्णन चमत्कारिक आहे म्हणून एथे देतों:—"मंजूषा त्वश्वनद्याः सा ययौ चर्मण्वतीं (चंबळा) नदीं । चर्मण्वत्याश्च यमुनां ततो गंगां जगाम ह ॥२५॥ गंगायाः सूतविषयं चंपामनुययौ पुरीं ॥ २६ ॥" (वनप० अ० ३०८). ही कथा कोणी खरी मानो किंवा न मानो परंतु कुंतिभोजाची राजधानी चर्मण्वतीस मिळणाऱ्या अश्ववतीवर होती. चर्मण्वती यमुनेस मिळते. ती गंगेस मिळते. गंगेच्या तीरीं अंगदेश व चंपानगरी होती. इतक्या गोष्टी या वर्णनावरून निश्चित होतात. वनपर्व, अ० ८४. १६३ आणि ८५. १४ यांवरूनहि चंपा गंगेच्या कांठीं होती.

गदेशाच्या अगदीं जवळ तरी होती असें स्पष्ट दिसून येतें. कौशिकीचा गंगेशीं संगम भागलपुरच्या खालीं सुमारें २०।२५ मैलांवर झाला आहे. तेव्हां भागलपुराजवळ चंपानगरी होती असें वर सिद्ध केलें आहे तें आपल्या पुराणांवरूनहि सप्रमाण ठरतें. आतां हुएनच्या वेळीं अंगदेश सरयूसंगमापर्यंत नव्हता, परंतु पूर्वीं कोणा एका वेळीं तो सरयू आणि कौशिकी यांच्या संगमामध्यें गंगेवर होता हें स्पष्ट आहे.

वर मोदागिरि म्हणजे सांप्रतचें मोंगिर असें दाखविलें आहे. आणि भीम गिरिव्रजाहून निघून अंगदेशांत अगोदर जाऊन मग मोदागिरीस गेला असें वर्णन आहे. आणि तो पूर्वेस चालला होता. तेव्हां अंगदेशाच्या पूर्वेस मोदागिरि होता असें मनांत येतें. आणि मोंगिर तर भागलपुरच्या पश्चिमेस आहे. परंतु या शंकेचें समाधान करितां येतें. त्या अध्यायांत देश आहेत ते क्वचित् मागें-पुढें नाहींत असें नाहीं. तसें नसेल तरी गिरिव्रज एथून मोंगिरापेक्षां भागलपुर फार लांब आहे असें नाहीं. आणखी अंगदेशचें राज्य दक्षिणेस जास्त पसरलें असेल यामुळें मगधदेशांतून निघाल्यावर मोदागिरीचें राज्य अगोदर न लागतां अंगदेश अगोदर लागला असेल म्हणून भीम प्रथम त्यांत जाऊन मग थोडा मागें वळून मोदागिरीस गेला असेल असें संभवतें. हीं सर्व प्रमाणें खोटीं मानिलीं तर मोदागिरि आणि चंपा यांचीं स्थानें निर्णीत केलीं आहेत त्यांपैकीं एक खोटें असलें पाहिजे. चंपानगरी भागलपुराजवळ सांप्रतच्या चंपानगराच्या जागीं होती या गोष्टीस नामसा-

दृश्य, भारतादिकांशीं अविरोध, अंतराचा मेळ, इत्यादि जास्त आधार आहेत. तेव्हां मोंगीर हें मोदागिरि यापेक्षां भागलपुराजवळ चंपानगरी होती हें विशेष सप्रमाण होय.

रामाच्या वेळीं अंगदेश सरयूपर्यंत होता परंतु पांडवांच्या वेळेस त्याची पश्चिम मर्यादा त्याच्या खालीं बरीच गेली होती असें दिसतें. कारण विदेहादि देश जिंकून भीम भागीरथीच्या दक्षिणेस आला त्यास प्रथम अंगदेश लागला नाहीं, मगध लागला. सातव्या शतकांतहि अशीच स्थिति होती हें वर स्पष्ट झालेंच आहे.

### २९. कांकजोल

चंपा एथून हुएन कांकजोल नामक लहानशा राज्यांत गेला. हा सांप्रतचा राजमहाल प्रांत होय. यास पूर्वी कांकजल नांव होतें. तें एका गांवावरून पडलें होतें. कांकजोल नांवाचें शहर राजमहालच्या दक्षिणेस १८ मैलांवर हल्लीं आहे. ऐन-अकबरींत या नांवाचा उल्लेख आला आहे. हुएननें या राज्याचा घेर ३३३ मैल सांगितला आहे, परंतु तें शेजारच्या राजाच्या ताब्यांत होतें असें लिहिलें आहे. वर सुचविल्याप्रमाणें तें चंपाच्या राज्यांत असावें.

### ३०. पौंड्रवर्धन

कांकजोल एथून गंगा उतरून पूर्वेस पुंड्रवर्धन ह्या राज्यांत हुएन गेला. अंतर १०० मैल होतें. ज्युलिअन यानें मूळच्या चिनी लिपींतील (Punnapatanna) शब्दाचें रूप पौंड्रवर्धन असें लिहिलें आहे. व तें सांप्रत-

१. पुंड्रवर्धन असा उच्चार भारतांत मिळतो.

चें बरद्वान असें सें० मार्टिन म्हणतो. परंतु तें नदीच्या पलीकडे नाहीं. पुबन म्हणून खेडें १०० मैलांवर गंगेपलीकडे आहे तें पुंड्रवर्धन असें कनिंगह्यामनें सिद्ध केलें आहे. राजतरंगिणींत पौंड्रवर्धन ही गौडच्या जयंत राजाची राजधानी सांगितली आहे ( इ० स० ७८२-८१३ ). हुएन यानें या राज्याचा घेर ६६७ मैल लिहिला आहे. पश्चिमेस महानदी, व पूर्वेस तिस्ता आणि ब्रह्मपुत्र, वं दक्षिणेस गंगा ह्यांमधील प्रदेशाचा घेर इतकाच आहे.

भारतांत अंग आणि मोदागिरि यांमागून पुंड्रदेश घेतला असें वर्णन आहे.

### ३१. जझोटी

उज्जनीच्या ईशान्येस १६७ मैलांवर (Chichito) हें राज्य होतें असें हुएन लिहितो. हें जजूहोटी असावें. अबूरिहान यानें याचा उल्लेख केला आहे. व त्याची राजधानी खाजुराहो लिहिली आहे. त्या शहरांत इबन भतूता १३३९ मध्यें स्वतः गेला होता. तो काजुरा असें नांव लिहितो. व तेथे एक सरोवर व पुष्कळ देवळें आहेत असें सांगतो. अशीच स्थिति खाजुराहो एथे सांप्रतहि आहे. या दोघांच्या लेखांवरून जझोटी म्हणजे सांप्रतचें बुंदेलखंड असें होतें.

बुंदेलखंडांत पश्चिमेकडील बिटवा नदीपासून पूर्वेस विंध्यवासिनीच्या देवालयापर्यंत यमुना व गंगा यांच्या दक्षिणेकडील प्रदेश, दक्षिणेकडे नर्मदेच्या उगमापर्यंत येतो.* यांत चांदोरी, सागर आणि बिल्हारी हे प्रांत ये-

* या प्रदेशांत रामाच्या अरण्यवाससंबंधें प्रसिद्ध असा चित्र-

तात. जझोटिया ब्राह्मणांच्या जुन्या राज्याच्या मर्यादा याच होत्या. तें उत्तरेस यमुना व दक्षिणेस नर्मदा यांपर्यंत व पश्चिमेकडील बिटवा नदीवरील ऊर्चेपासून पूर्वेस बुंदेल नाल्यापर्यंत पसरलें होतें. बुंदेल नाला हा लहानसा ओढा आहे. तो बनारसेजवळ गंगेस मिळतो. कनिंगहॅम म्हणतो कीं मी ह्या प्रांतामधून २९ वर्षेंपर्यंत पुष्कळ वेळां फिरलों आहें. यांत जझोटिआ ब्राह्मण जिकडे तिकडे आहेत. परंतु ते यमुना किंवा बिटवा यांच्या पलीकडे मुळींच नाहींत. चांदेरी एथे जझोटिआ वाणीहि आहेत. यावरून असें दिसतें कीं, जझोटी हें देशाचें नांव असावें. देशावरून ब्राह्मणांचीं नांवें पुष्कळ पडलेलीं आहेत. यावरून हुएन यानें लिहिलेलें जझोटीचें राज्य हें हल्लींचें बुंदेलखंडच होय.

खाजुराहो एथे हल्लीं लोकसंख्या सुमारें १००० आहे. त्यांत जझोटिआ ब्राह्मण व चांदेल रजपुत आहेत. हुएनच्या वेळीं राजधानी हीच असावी. त्यानें दिलेलें अंतर बरोबर मिळत नाहीं, परंतु या प्रांतांतील कोश लहान आहेत, यामुळें असें झालें असावें.

## महोबा

हें शहर खाजुराहोच्या उत्तरेस ३४ मैलांवर व बिटवा आणि यमुना यांच्या संगमावरील हमीरपुरच्या दक्षिणेस ५४ मैलांवर आहे. ह्याचें मूळनांव महोत्सवनगर असें होतें. चांदेल रजपुतांच्या घराण्याचा मूळपुरुष चंद्रवर्मा हा

---

( मागील पृष्ठावरून )

कूट पर्वत होता. या व इतर कांहीं स्थानांबद्दल पुढें ( उज्जनी दशार्ण यांच्या वर्णनांत ) टीप पहा.

एथे मोठा उत्सव करित असे. त्यावरून हें नांव पडलें. शहराच्या पश्चिमेस किरातसागर म्हणून सरोवर दीड मैल घेराचें आहे. तें कीर्तिवर्मा ( इ० स० १०६५–१०८५ ) यानें बांधिलें. दक्षिणेस मदनसागर आहे. त्याचा घेर ३ मैल आहे. तें मदनवर्मा ( इ० स० ११३०–११६५ ) यानें बांधलें. पूर्वेस कल्याणसागर म्हणून एक लहानसें सरोवर आहे व त्याच्या पलीकडे विजयसागर म्हणून ४ मैल घेराचें व पुष्कळ खोल असें सरोवर आहे. तें विजयपाळ ( इ० स० १०४५–१०६५ ) यानें बांधलें. बुंदेलखंडांत सरोवरें पुष्कळ आहेत. त्यांत मदनसागर हें फार सुंदर आहे. पश्चिमेस गोवार नांवाची टेंकडी आहे.

महोबा शहराची स्थापना इत्यादिकांचें वर्णन चांद नांवाच्या एका भाटानें केलें आहे. बनारसचा गाहिरवार राजा इंद्रजित ह्याचा ब्राह्मण पुरोहित हेमराज याची मुलगी हेमावती हिच्यापासून चांदेल रजपुत झाले. ती फार सुंदर होती. ती एके दिवशीं सरोवरावर स्नानास गेली असतां चंद्र मोहित होऊन त्यानें तिला दर्शन दिलें. त्याजपासून तिला गर्भ राहिला. चंद्रानें सांगितलें कीं तुझा मुलगा पृथ्वीपति होईल. त्यापासून १००० कुळें उद्भवतील. कर्णावती ( सांप्रतची कयान किंवा केण ) हिच्या कांठीं तूं प्रसूत होशील. पुत्र होईल तो खाजुराय ह्यास नेऊन दे. तो महोबा एथे राज्य करील. कालिंजर पर्वतावर किल्ला बांधील. तो १६ वर्षांचा झाल्यावर तूं काशी सोडून कलिंजर पर्वतावर रहाण्यास जा. त्याप्रमाणें तिला वैशाख शुद्ध ११ स पुत्र झाला.

त्याचें नांव चंद्रवर्मा ठेविलें. चंद्रानें त्यास राजनीति इत्यादिकांचा उपदेश केला. नंतर त्यानें कलिंजर किल्ला बांधला. नंतर खजुरपुरास राजाकडे गेला. पुढें त्यानें महोत्सव ( महोबा ) ही राजधानी केली.

ह्या गोष्टीचे शक निरनिराळे सांगतात. परंतु कोरींव लेखांवरून चांदेल घराणें व महोबा यांची स्थापना इ० स० ८०० च्या सुमारें झाली असावी.

काळंजर पर्वताचा उल्लेख भारतांत आला* आहे. तो पर्वत वर सांगितलेलाच असावा.

## ३२. महेश्वरपुर

जाझोटी राज्यांतून उत्तरेस १५० मैलांवर महेश्वरपुर एथे हुएन गेला. ही दिशा दक्षिण समजली पाहिजे. दक्षिणेस १५० मैलांवर नर्मदेवर मंडला शहर आहे त्यास पूर्वी माहिष्मतीपुर असें म्हणत असत. नर्मदेचा जो वरचा भाग त्याजवळच्या प्रदेशाची ही पूर्वी राजधानी होती. मागाहून हिच्या जागीं त्रिपुरी ही राजधानी झाली. त्यास हल्लीं तेवर म्हणतात. तें जबलपुरापासून ६ मैल आहे. मंडल हें नांव जुनें आहे. महावंसो ग्रंथांत महेशमंडल असा याचा उल्लेख आहे. हुएन लिहितो कीं ह्या प्रांतांतील उत्पन्न उज्जनीप्रमाणें होतें. यावरूनच स्पष्ट होतें कीं महेश्वर हें जझोटीच्या उत्तरेस नसावें. कारण ग्वाल्हेरच्या भोंवतालची व गंगाय-

---

* वनपर्व, अ० ८७ श्लो० २१. पितृवर्ती इत्यादि सात ऋषिपुत्र सात व्याध झाले व पुढच्या जन्मीं कालंजर पर्वतावर ७ मृग झाले इत्यादि कथा आहे, तींतील कालंजरहि हाच असें पूर्वापरसंबंधावरून दिसतें.

मुना ह्यांमधील दुआबांतली जमीन उज्जनी मोंवतालच्या काळ्या जमिनीपेक्षां निराळी आहे. ह्यावरून वरच्या नर्मदेवरील माहिष्मती ( मंडला ) हेंच हुएनचें महेश्वरपुर असावें. या राज्याचा घेर ९०० मैल होता यावरून हें पश्चिमेकडील दमोह आणि सेवणी यांपासून पूर्वेस नर्मदेच्या उगमापर्यंत असावें.

कार्तवीर्याची राजधानी माहिष्मती ही नर्मदेच्या कांठीं किंवा जवळच होती असें विष्णुपुराण ( ४. ११. ४ ) आणि रामायण ( उत्तरकां० स० ३१, ३२ ) यांवरून दिसून येतें. कालिदासानें तर ती नर्मदेवर होती असें स्पष्टच सांगितलें आहे ( रघु० स० ६ श्लो० ३७–४३ पहा ). ती अनूप देशाची राजधानी सांगितलेली आहे. सहदेवास दक्षिणदिग्विजयांत माहिष्मती लागली होती. तेथे नील राजा होता. ही व कार्तवीर्याची माहिष्मती[२] एकच असें अग्निसा ह्याच्या वर्णनावरून निःसंशय दिसतें. वर सांगितलेलें मंडला शहर हेंच माहिष्मती असावें.

## ३३. उज्जनी

उज्जनी शहराचा घेर हुएन यानें ९ मैल लिहिला आहे. हल्लीं याहून थोडाच जास्ती आहे. राज्याचा घेर १००० मैल होता. त्याच्या पश्चिमेस माळव्याचें

१. भागवतांतहि माहिष्मती नर्मदेवर असें स्पष्ट आहे. " रेवामगत् यत्र माहिष्मती पुरी " स्कं० १० अ० ७९ श्लो० २१—बलदेवतीर्थयात्रावर्णन.

२. भा० प्रा० ऐ० को० चे कर्ते यांनीं निरनिराळ्या ४ माहिष्मती सांगितल्या आहेत. परंतु त्या सर्व एकच होत. त्यांतल्या दोन तर निःसंशय एकच आहेत.

राज्य होतें त्याची राजधानी धारानगर होतें. तें उज्जनीपासून ५ मैलांच्या आंतच आहे, यावरून पश्चिमेकडे उज्जनीचें राज्य चंबळेच्या पलीकडे नसावें. परंतु उत्तरेस मथुरा आणि जझोटी या राज्यांपर्यंत, पूर्वेस महेश्वरपुरच्या राज्यापर्यंत, आणि दक्षिणेस सातपुड्यापर्यंत असावें. म्हणजे पश्चिमेकडे रणथंभावर आणि ब्ऱ्हाणपुर यांपासून पूर्वेस दमोह आणि सेवनीपर्यंत असावें. इतक्या प्रदेशाचा घेर ९०० मैल आहे. शेजारच्या जझोटी आणि महेश्वरपुर एथील दोन राजांप्रमाणें एथील राजाहि ब्राह्मण होता. परंतु जझोटी एथील राजा बौद्धधर्माचा होता आणि बाकी दोघे वैदिक धर्माचे होते. पश्चिमेकडील माळवा या राज्याचा राजा बौद्ध होता. परंतु प्राचीन माळवा प्रांताचें पश्चिमेकडील अर्ध मात्र हुएन यानें लिहिलेल्या माळव्याच्या राज्यांत येत होतें. आणि पूर्वेकडील अर्ध उज्जनीच्या राज्याखालीं येत होतें. यावरून असें दिसतें कीं धर्मभिन्नत्वामुळें राजकीय विभाग निराळे झाले असावे. उज्जनीचा राजा स्वतः धर्मग्रंथांत प्रवीण होता असें हुएन लिहितो.

उज्जयिनी हें नांव रामायण व भारत यांत नाहीं. अवंती असें आहे. हें उज्जयिनीचेंच नांव होय याविषयीं पुष्कळ प्रमाणें आहेत. देशाचेंहि तें नांव होतें. एथील महाकाल हें शिवस्थान प्रसिद्ध आहे. शिवाच्या द्वादश ज्योतिर्लिंगांपैकीं हें एक आहे. भारतांत क्षेत्रादि वर्णनांत महाकाल आलें आहे. स्कंदपुराणादि-

---

१ वनपर्व, अ० ८२ श्लो० ४९. परंतु यांत हें अवंतींत आहे असें स्पष्ट नाहीं.

कांतहि याचें वर्णन आहे. उज्जयिनी ही शिप्रा नदीच्या कांठीं आहे. हल्लींहि ह्या नदीचें हेंच नांव आहे. ही चंबळेस मिळते. अवंती, महाकाल, शिप्रा यांचा उल्लेख कालिदासानें रघुवंशांत केला आहे. मेघदूतांत उज्जयिनी, महाकाल आणि शिप्रा यांचा उल्लेख आला आहे ( श्लोक २८–३९ ). तेथे तिचें विशाला असें दुसरें एक नांव दिलें आहे. आपला प्रख्यात ज्योतिषी वराहमिहिर हा उज्जनीस होता.

## दशार्ण–विदिशा

कालिदासानें मेघदूतांत मेघास उत्तरेस जाण्यास मार्ग सांगितला आहे त्यांत नर्मदा आणि विंध्या यांच्या पलीकडे दशार्ण देश लागेल असें सांगितलें आहे. त्याची राजधानी वेत्रवती नदीच्या कांठीं विदिशा नामक होती. वेत्रवती ही सांप्रतची विंध्यपर्वतापासून निघून माळवा आणि बुंदेलखंड यांतून वाहत जाऊन ईशान्येस यमुनेला मिळणारी बिटवा होय. तेंव्हां दशार्णदेश हा सांप्रतच्या माळव्याचा व वर सांगितलेल्या उज्जनी प्रांताचा ( म्हणजे माळव्याचाच ) भाग होय. ह्यास आणखीहि एक प्रत्यंतर आहे तें असें कीं, सांप्रत दशान नांवाची एक नदी वेत्रवतीच्या जवळूनच

१. आकाशे तारकं लिंगं पाताले हाटकेश्वरं । मर्त्यलोके महाकालं दृष्ट्वा कामितमाप्नुयात् ॥ स्कंदपुराण.

२. सर्ग ६ श्लो० ३२–३५.

३. बृहज्जातक २८.९. त्यास कपित्थ नामक ग्रामांत सूर्यप्रसाद झाला होता. त्याचें कुल मूळचें मगध देशांतलें होतें.

४. मेघदूत, श्लोक २४, २५.

पूर्व बाजूनें वहात जाऊन बिटवानदीस मिळते. दशान हा दशार्णा या नांवाचा अपभ्रंश होय. मत्स्यपुराणांत ( अ० ११३ ) ऋष्यवान् पर्वतापासून निघालेल्या मं-

१. ऋष्यवान् पर्वत कोठे आहे याचा निश्चय करितां येत नाहीं, असें पूर्वी पहिल्या भागांत लिहिलें आहे. परंतु आतां जास्त शोधाअंतीं त्याचें स्थान ठरविण्याजोगी माहिती मिळाली आहे. राम वनवासास निघाल्यावर गंगा-यमुनासंगमासमीप भरद्वाजाश्रम होता तेथे आला. ऋषीनें सांगितलें, एथून दहा कोशांवर दक्षिणेस चित्रकूट पर्वत आहे तेथे जा. ( अयोध्याकांड सर्ग ५४ पहा ). या स्थानीं हल्लींहि चित्रकूट नामक स्थान आहे. चित्रकूटाजवळ मंदाकिनी नदी होती. तिचा उल्लेख रामायणांत पुष्कळ वेळां आला आहे. राम दाक्षिणेस अत्रि, शरभंग यांच्या आश्रमीं गेला. तेथून दक्षिणेस सुतीक्ष्णाश्रमास जाण्याचा मार्ग शरभंगानें सांगितला त्यांतहि मंदाकिनीचा उल्लेख आहे (अरण्यकांड, सर्ग ५ पहा). तसेंच तमसा नामक नदीसमीप वाल्मीकीचा आश्रम होता आणि ती जान्हवीच्या समीप होती ( बालकांड, सर्ग २ श्लोक ४ ). वाल्मीकीचा आश्रम भागीरथीच्या दक्षिणेस होता असें उत्तरकांड सर्ग ४७, ४८ यांवरून निःसंशय सिद्ध होतें. लक्ष्मण अयोध्येहून सीतेस घेऊन गोमती व भागीरथी उतरून दक्षिणेस आला आणि तेथे भागीरथीच्या दक्षिणतीरीं वाल्मीकीच्या आश्रमाजवळ सीतेस सोडून परत गेला. यावरून सांप्रत प्रयागाच्या खालीं २० मैलांवर भागीरथीस दक्षिण अंगानें तानसा नामक नदी मिळते तीच ही तमसा होय ( अयोध्येच्या दक्षिणेस जवळच तमसा नदी होती ती निराळी ). ही तमसा, रेवा प्रांतांतील डोंगरांत उगम पावून ईशान्येकडे वहात जाऊन भागीरथीस मिळते. तेव्हां सांप्रतच्या रेवा प्रांतांत तानसा नदीच्या उगमाच्या आसपास जे पर्वत आहेत त्यांस ऋष्यवान् हें नांव होतें असें सिद्ध होतें.

या विवेचनावरून चित्रकूट, ऋष्यवान्, मंदाकिनी, तमसा आणि दशार्णा इतक्यांचा स्थानादि निर्णय झाला.

दाकिनी, तमसा, इत्यादि नद्या लिहिल्या आहेत त्या ह्याच प्रदेशांत होत्या असें सिद्ध करितां येतें. तेव्हां त्याच पर्वतापासून निघालेली दशार्णा ही सांप्रतची दशाननदी होय हें स्पष्ट होतें. दशार्णा हें नांव अर्थातच दशार्ण देशावरून पडलें असावें.

रामायणांत किष्किंधाकांडांत दक्षिणचे देश आले आहेत त्यांत दशार्णदेश आला आहे.[1]

भारतांत दक्षिणेस दशार्णदेश आला नाहीं. पूर्व व पश्चिम या दिशांस भीम आणि नकुल यांस दशार्णदेश लागल्याचें वर्णन आहे. यावरून तेव्हां कदाचित् दक्षिणच्या दशार्णदेशाचें नांव लोपलें असावें.

हुएनसंगच्या वर्णनांतहि कोठे दशार्णदेश आला नाहीं.

दशार्णदेशाची राजधानी विदिशा वेत्रवतीच्या कांठीं होती, असें कालिदासानें लिहिल्याचें वर सांगितलेंच आहे. बिटवा नदीच्या कांठीं भिलसा म्हणून शहर भोपाळच्या ईशान्येस सुमारें ३० मैलांवर आहे तें विदिशा असावें. तेथून उत्तरेस जातांना उज्जयिनी वांक-

---

१. रामायणांत दक्षिणेकडील देशादिकांचें वर्णन आहे त्यांत फार घोंटाळा आहे. त्याविषयीं विशेष विचार पुढें येईल. तथापि किष्किंधा कांड, सर्ग ४१ यांत जे देश आले आहेत त्यांवरून चित्रकूटाच्या दक्षिणेस एक दशार्ण देश होता असें निर्विवाद आहे.

२. मेघदूत, श्लोक २८ पहा. ह्या श्लोकावर टीका करितांना मल्लीनाथ म्हणतो कीं " विंध्यादुत्तरवाहिन्याः निर्विंध्यायाः प्राग्भागे कियत्यपिदूरे स्थिता उज्जयिनी. उत्तरपथस्तु निर्विंध्यायाः पश्चिमे इति वक्तव्यं." परंतु पूर्वापरसंबंध पाहिला असतां ही अगदीं चुकी आहे असें दिसून येतें.

डी आहे असें कालिदास वर्णितो. भिलसा एथून चंबळेकडे जातांना उज्जनी डाव्या बाजूस राहते. भिलसाच्या उत्तरेस विदिशा या नांवाशीं जुळण्याजोगें एकादें शहर वेत्रवतीवर नाहीं. आहे असें मानलें तरी तेथून उज्जनी अगदीं मार्गे राहते. तेव्हां "बाजूस राहते" हें कालिदासाचें वर्णन जुळणार नाहीं. तेव्हां भिलसा हीच विदिशा असावी. रामस्वर्गारोहणाच्या वेळीं शत्रुघ्न मथुरेहून अयोध्येस गेला तेव्हां त्यानें आपल्या पुत्रांपैकीं सुबाहूची मथुरा एथे व शत्रुघातीची वैदिश नामक नगरामध्यें स्थापना केली असें वर्णन आहे ( रामा० उत्तरकां० स० १०८ ). कालिदासानें तें नांव विदिशा असें लिहिलें आहे ( रघु, सर्ग १५ श्लो० ३६ ). तेव्हां तें वैदिश किंवा विदिशानगर वर सांगितलेलेंच होय.

विदिशा ही मालवदेशांत वेत्रवतीच्या कांठीं होती असा कादंबरींत उल्लेख आहे.

### ३४. माळवा

माळव्याची राजधानी भडोचच्या वायव्येस (२००० ली ) ३३३ मैलांवर महीच्या आग्नेयीस होती असें हुएन लिहितो. यांत दिशा व अंतर हीं दोन्ही चुकलीं आहेत. कारण माळवा प्रांत भडोचच्या ईशान्येस आहे. व भडोच एथून महीचा उगम फक्त १५० मैलांवर आहे. तेव्हां भडोचच्या ईशान्येस १००० ली (१६६ मैल ) असें घेतलें पाहिजे. याच ठिकाणीं धारानगर आहे. हें शहर माळवा प्रांताच्या प्राचीन राजधान्यांपैकीं आहे. राज्याचा घेर १००० मैल सांगितला आहे.

माळव्याच्या पश्चिमेस खेडा आणि आनंदपुर हीं मांडलिक राज्यें होतीं. त्यांचा घेर अनुक्रमें ५०० व ३३३ मैल होता. शिवाय १००० मैल घेराचें वडारी हें स्वतंत्र राज्य पश्चिमेस होतें. आणि पश्चिमेकडे कच्छ आणि पूर्वेस उज्जनी तसेंच उत्तरेस गुजराथ आणि वैराट हीं राज्यें आणि दक्षिणेस वल्लभी आणि महाराष्ट्र; यांच्या मधल्या प्रदेशांत वरच्या चार राज्यांचा समावेश केला पाहिजे. इतक्या प्रदेशाचा घेर फक्त १३५० मैल आहे. यावरून दिसतें कीं हुएन यानें सांगितलेला माळव्याचा घेर हा मांडलिक राज्यांसुद्धां असावा. वर सांगितलेल्या प्रदेशाचें उत्तरेकडील अर्ध वडारीचें राज्य, आणि दक्षिणेकडील अर्ध तें माळव्याचें राज्य, असें असावेंसें दिसतें. म्हणजे माळव्याच्या मर्यादा उत्तरेस वडारी, पश्चिमेस वल्लभी, दक्षिणेस महाराष्ट्र, आणि पूर्वेस उज्जनी, अशा होतील. म्हणजे चंबळा नदीजवळील मंदिसोरपासून बनासच्या मुखापर्यंत उत्तर हद्द; आणि दमानपासून मालेगांवपर्यंत दक्षिण हद्द. इतक्या प्रदेशाचा घेर सुमारें १००० मैल आहे.

अबूरिहानच्या लेखावरून धारचें राज्य दक्षिणेस तापीपर्यंत होतें असें दिसतें.

बौद्धधर्मासंबंधें विद्येचे फार प्रसिद्ध असे प्रांत मगध आणि माळवा हे दोन होत असें हुएन लिहितो. त्याच्या अगोदर ६० वर्षांपूर्वी माळव्याचा राजा शिलादित्य हा होता. त्यानें ५० वर्षें राज्य केलें.

भारतांत इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेस मालव देश सांगि-

तलेला नाहीं. पश्चिमेस एक सांगितलेला आहे. वराह-मिहिरानें उत्तरेस मालव सांगितला आहे.

### ३५. खेडा

खेडा म्हणून एक संस्थान हुएन यानें सांगितलें आहे. त्यानें लिहिलेल्या अक्षरांचा उच्चार 'कच्छ' होतो असें जुलिअन आणि सें० मार्टिन म्हणतात. परंतु तें खेडाच होय असें कनिंगहॅम ह्यानें दोन प्रमाणांनीं सिद्ध केलें आहे. खेडा हें गुजराथेंत अमदाबाद आणि खंभात यांच्या मध्यें मोठें शहर आहे. ह्या राज्याचा घेर हुएन यानें ५०० मैल सांगितला आहे. ह्यावरून ह्याची मर्यादा पश्चिमेस साबरमतीपासून ईशान्येस महीपर्यंत व दक्षिणेस बडोद्यापर्यंत असावी.

### ३६. आनंदपुर

वल्लभीच्या वायव्येस ११७ मैलांवर आनंदपुर म्हणून एक शहर हुएन सांगतो. जैनांच्या कल्पसूत्रावरून हें बडनगर असें मार्टिन यानें सिद्ध केलें आहे. परंतु तें वल्लभीच्या ईशान्येस १५० मैलांवर आहे.

ह्या प्रांताचा घेर ३३३ मैल होता व तो माळव्यांचा मांडलिक होता असें हुएन सांगतो.

### ३७. वडारी किंवा इदर

हुएन माळव्याहून नैर्ऋत्येकडे दोन समुद्रांच्या संगमावर गेला. हें खंभातचें अखात असावें. तेथून पुढें तो (Ochari) वडारी एथें गेला. अंतर व दुसरीं एक-दोन प्रमाणें ह्यांवरून हें इदरचें राज्य असें कनिंगहॅम म्हणतो. ह्याचा घेर १००० मैल होता. ह्यावरून उत्तरेस वैराट, वायव्येस गुर्जर, पूर्वेस उज्जनी आणि द-

क्षिणेस माळवा ह्यांमधील सर्व प्रदेश यांत येत असावा. म्हणजे ह्याच्या मर्यादा अशा होतील:—उत्तरेस अजमीर आणि रणथंभोर, पश्चिमेस लुनी, पूर्वेस चंबळा आणि दक्षिणेस कच्छच्या रणांतील बनास नदीच्या मुखापासून मंदोसरजवळील चंबळा नदीच्या भागापर्यंत माळव्याची हद्द. ह्यांतील प्रदेशाचा घेर ९०० मैल ( नकाशावर )* आहे.

---

* कनिंगह्यॅमचें म्हणणें आहे कीं सौवीर नामक जो पुराणांत सांगितलेला देश तो हाच होय. विष्णुपुराण ( २.३ ) यांत पश्चिमेस सौराष्ट्र, शूर, आभीर, अर्बुद, पारियात्रपर्वताजवळचे कारुष, आणि मालव हे देश तसेच सौवीर, सैंधव, हूण, शाल्व, शाकल, मद्र हे देश सांगितले आहेत. यांत इदरच्या चारी दिशांकडील प्रांतांचा उल्लेख आहे. परंतु वडारी, खेडा, खंबात, अन्हलवाडा, या प्रदेशांचा उल्लेख नाहीं; यावरून सौवीर या नांवांत ते सर्व येतात असें त्याचें म्हणणें आहे. कापटिक नांवाच्या लोकांनीं हिंदुस्थानास सोफीर असें नांव दिलें आहे. त्या लोकांचा व्यापार प्राचीनकाळीं हिंदुस्थानाच्या ह्याच भागाशीं चालत असे ( खंबाताच्या आखातांतून ). तेव्हां या भागाच्या सौवीर या नांवावरून त्यांनीं सोफीर हें नांव दिलें असावें. ओफीर एथील सोन्याची बायबलांत फार प्रसिद्धि आहे. सालोमनच्या लोकांनीं ओफीर एथून सोनें वगैरे जिन्नस नेले होते, ते त्यांनीं हिंदुस्थानांतून नेले होते असें बहुधा सर्वसंमत आहे. ह्या ओफीर शब्दाचें बायबलाच्या एका प्राचीन भाषांतरामध्यें सोफीर असें रूप लिहिलें आहे. यावरून सोफीर आणि ओफीर एकच. आणि तें नांव सौवीर यावरून पडलें असावें. कारण हिंदुस्थानांत सोनें वर लिहिलेल्या प्रांतांत सांपडतें. निदान पश्चिमेकडचे प्राचीन व्यापारी तें एथूनच नेत. हीं दोन प्रमाणेंहि वडारी म्हणजे सौवीर या म्हणण्यास दिलीं आहेत. परंतु याविषयीं मला पक्की खात्री वाटत नाहीं. पांडवांच्या वेळीं

# पूर्वेकडील हिंदुस्थान

हुएनसंग यानें पूर्वहिंदुस्थान हा जो भाग सांगितला आहे त्यांत आसाम, बंगाला, गंगेच्या मुखाजवळील प्रदेश, संभलपुर, ओरिसा, आणि गंजाम इतके हल्लींचे प्रांत येत असत. यांचे त्यानें ६ भाग सांगितले आहेत. त्यांचीं नांवें कामरूप, समतट, ताम्रलिप्ति, किरणसुवर्ण, उड्र आणि गंजम हीं होतीं. त्यांचें अनुक्रमें वर्णन करूं.

## १. कामरूप

पुंड्रवर्धन एथून पूर्वेस १५० मैलांवर मध्यें एक नदी उतरून कामरूप देशांत हुएन गेला. कामरूप हें

---

(मागील पृष्ठावरून)

सिंधुदेशाचा राजा जयद्रथ याजकडे शिबि, सौवीर हे देश होते (कश्चिदेकः शिबीनाढ्यान्सौवीरान्सह सिंधुभिः। अनुतिष्ठासि...। वनप० २६७.११ ). शिबि हा देश सिंधूच्या पश्चिमेस बराच उत्तरेकडे होता असें दिसतें. सौवीर सिंधूच्या पूर्वेस फार दूर नसावा. परंतु हुएननें लिहिलेले वडारी हें सौवीर म्हणणें अगदीं असंभव आहे असें नाहीं. भागवतांत, कृष्ण हस्तिनापुराहून द्वारकेस आल्याचें वर्णन आहे त्यांत ( १.१०.३५ ) "मरुधन्वमतिक्रम्य सौवीराभीरयोः परान्। आनर्तान् भार्गवोपागात्... " असें आहे. तसेंच द्वारकेहून पांडवांकडे गेल्याचें एकदां वर्णन आहे त्यांत "आनर्तसौवीरमरूंस्तीर्त्वा विनशनं हरिः। ...( १०.७१.२१ ) " असें आहे. यावरून तें खरें असें संभवतें. [ हल्लीं बलुचीस्थानांत सिबी एथे इंग्रज सरकारची छावणी आहे त्याच्या मोंवतालचा प्रदेश हाच पांडवांच्या वेळचा शिबी देश असावा. **दाभोळकर.** ]

ज्यांत द्वारका आहे तो आनर्त देश असें ह्या भागवतांतील व इतर प्रमाणांवरूनाह सिद्ध होतें.

आसाम देशाचें संस्कृत नांव आहे. प्रांताचा घेर१६६७ मैल सांगितला आहे. यावरून त्यांत ब्रह्मपुत्रा नदीचा सर्व प्रदेश, व कुचाबिहार आणि भुतान हीं येत असावीं. ब्रह्मपुत्रा-प्रदेशाचे पूर्वी तीन भाग होतेः—सदिया, आसाम आणि कामरूप. ह्यांस पूर्वेचा, मधला आणि पश्चिमचा असें म्हटलें तरी चालेल. कामरूप हें संस्थान सर्वांत बलिष्ठ म्हणून सर्व प्रदेशास त्याचेंच नांव पडलें. कुचाबिहार हा मुख्य कामरूपचा पश्चिमभाग होता. तो प्रदेश फार समृद्ध असल्यामुळें राजे त्यांत रहात असत. व त्याची राजधानी कामतीपुर होती. तीवरून सर्व प्रदेशास नांव पडलें. परंतु ब्रह्मपुत्रा नदीवरील गोहती शहर ही कामरूपची जुनी राजधानी असें म्हणतात. कामतीपुर हें पुंबनपासून बरोबर १५० मैलांवर आहे परंतु उत्तरेस आहे. आणि गोहती हें ३१७ मैलांवर ईशान्येस आहे. कामतीपुरचें अंतर मिळतें यावरून ७ व्या शतकांत तीच राजधानी असावी. भाषा हिंदुस्थानांतल्या सारखीच होती असें हुएन लिहितो. यावरूनहि गोहतीपेक्षां जवळचें जें कामतीपुर तीच राजधानी होती असें म्हणतां येतें. हुएन मोठी नदी उतरला ती तिस्ता होय. ह्या राज्याच्या पूर्वेस चिनी शू प्रांत होता. आग्नेयीस अरण्य होतें, त्यांत पुष्कळ रानहत्ती होते, त्याप्रमाणें हल्लींहि आहेत. राजा भास्करवर्मा नांवाचा ब्राह्मण होता. तो आपणास नारायणाचा वंशज म्हणवित असे. तो बौद्ध धर्माचा होता. इ० स० ६४३ मध्यें हर्षवर्धनाच्या स्वा-

१. ऐन अकबरी २.३. २. मागें पुंड्रवर्धनचें वर्णन पहा.



शीबरोबर पाटलिपुर एथून कनोजपर्यंत तो होता.

कामरूप हें नांव भारतांत कोठें आढळत नाहीं. रघुवंशांत दोन-तीन वेळां आलें आहे. ( ४.८३,८४ आणि ७.१७ पहा ). रघु हा दिग्विजयाच्या वेळीं प्रथम पूर्वेस जाऊन, दक्षिण व पश्चिम या दिशांकडून उत्तरेस वळला. लौहित्या नामक नदी उतरून प्राग्ज्योतिष[1] देशांत जाऊन त्यापलीकडे कामरूप देशांत गेला. तेथे त्याचा दिग्विजय समाप्त झाला. तेव्हां हा कामरूप देश ईशान्येस किंवा पूर्वेसाहि असणें संभवतें. तेथील राजानें रघूस हत्ती दिले असें वर्णन आहे. यावरून तो देश ( कामरूप ) हत्तींविषयीं प्रसिद्ध होता असें दिसतें. तेव्हां दिशा व वर्णन आसामशीं जुळतें.

## २. समतट

याची राजधानी कामरूपच्या दक्षिणेस सुमारें २०० मैल व ताम्रलिप्तीच्या पूर्वेस १५० मैल सांगितली आहे. पहिल्या अंतरावरून जसार हें गांव येतें. तामलुकपासून तें १०० मैल आहे. परंतु रस्ता वाईट असल्यामुळें व तामलुकमध्यें पूर्वेकडून येणें तर कांहीं पाण्यांतून यावें लागतें यामुळें हुएन यानें लिहिलेलें १५० मैल अंतर संभवतें.

समतट याचा उल्लेख अलाहाबाद एथील स्तंभावरील समुद्रगुप्ताच्या लेखांत कामरूप आणि नेपाळ यांबरोबर आला आहे. वराहमिहिरानेंहि तो पूर्वेकडेस सांगितला आहे. ( बृहत्संहिता, अ० १४ श्लो० ६ ). हा सखल प्रदेश समुद्रकांठीं आहे. एथील लोक काळे

१. प्राग्ज्योतिष हें कामरूपचेंच नांव असें त्रिकांडशेष-कोशांत आहे.

आणि ठेंगणे आहेत असें हुएन लिहितो. हें खालील बंगाल्याच्या स्थितीशीं हल्लीं सर्वांशीं मिळतें. यावरून हा समतट देश म्हणजे गंगेचा डेल्टा होय. याचा घेर ५०० मैल होता. यावरून गंगेचा मुख्य प्रवाह व तिची भागीरथी ही शाखा ह्यांमधील त्रिकोणाकृति सर्व प्रदेश यांत येत असावा.

हुएनसंग ह्यानें ह्याच्या पूर्वेचे बरेच देश लिहिले आहेत. परंतु त्यांचीं अंतरें दिलीं नाहींत. पहिला श्रीक्षेत्र हें सांप्रतचें सिलहट्ट ( श्रीहट्ट ) असें सें० मार्टिन म्हणतो. दुसरा एक सांगितला आहे तो हल्लींचा कोमिल्ला ( तिपरा ) प्रांत असावा. तिसरा एक लिहिला आहे त्याचा उच्चार तलिंगावटि असा होईल. म्हणजे तो तलैंग लोकांचा देश म्हणजे पेगू होय. वटी हा ब्रह्मदेशांतील भाषेंतला एक साधारण प्रत्यय आहे. हे सर्व देश पूर्वे पूर्वेस होते. त्यांच्या पूर्वेकडे इशान्नपुर, त्याच्या पूर्वेस महाचेनूपो, त्याच्या नैर्ऋत्येस यमनचेउ होता. या तिहींपैकीं पहिला शान लोकांचा लाओ, दुसरा अनाम किंवा कोचीनचायना आणि शेवटचें यमनद्वीप असें जुलियन म्हणतो. यमनद्वीप हें यवनद्वीप म्हणजे जावा बेट होय.

पांडव तीर्थयात्रा करतांना गंगा सागरास मिळते तेथे आले होते.[1]

### ३. ताम्रलिप्ति

याचा घेर २५० मैल सांगितला आहे. तो समुद्र-

---

१. स सागरं समासाद्य गंगायाः संगमे नृप । नदीशतानां पंचानां मध्ये चक्रे समाप्लवं ॥ २ ॥ ( वनप० अ० ११४. )

किनाऱ्यावर होता, व त्याची जमीन सखल व दमट होती. राजधानी एका उपसागरांत होती. तिकडे जाण्यास जलमार्गानें व खुषकीनें वाट होती. ताम्रलिप्ति हें हल्लींचें तामलूक शहर होय. हें कलकत्त्याच्या नैर्ऋत्येस सुमारें ४२ मैलांवर रूपनारायण नदीवर, तिचा हुगळीशीं संगम होतो तेथून वर १२ मैल आहे. या प्रांतांत हुगळीच्या पश्चिमेकडील सुपीक प्रांत उत्तरेस बरद्वान आणि कलना यांपासून दक्षिणेस कुसई नदीपर्यंत येत असावा.

भारतांत, भीमानें वंगदेशच्या राजास जिंकल्यावर ताम्रलिप्त राजा जिंकला असें वर्णन आहे. हें नांव देशाबद्दलच असावें असें दिसतें. कारण भीष्मपर्वांत जे देश आले आहेत त्यांत ताम्रलिप्त आहे. वराहमिहिरानेंहि पूर्वेकडच्या देशांत ताम्रलिप्तिक सांगितला आहे (बृ० सं० १४.७).

## ४. किरणसुवर्ण

किरणसुवर्ण देशाची राजधानी ताम्रलिप्तीच्या वायव्येस ११७ मैलांवर व उडू (ओरिसा) च्या ईशान्येस तितक्याच अंतरावर सांगितली आहे. ओरिसा प्रांताची राजधानी सातव्या शतकांत वैतरणी नदीवरील जाजीपुर ही होती. तेव्हां किरणसुवर्णची राजधानी सिंगभूम आणि बीरभूम या जिल्ह्यांच्या सुमारास सुवर्णरेखा नदीवर कोठे तरी असली पाहिजे. ह्या प्रदेशाची फारशी माहिती नाहीं. परंतु बीरभूमचें मुख्य शहर बंडाबाजार हें वरील अंतरावर आहे, यावरून ह्याच सुमारास कोठे तरी राजधानी असावी. राज्याचा घेर

सुमारें ७५० मैल होता यावरून पूर्वेस मेदिनीपुर, पश्चिमेस शिरगुज, उत्तरेस दामुदा नदीचा उगम आणि दक्षिणेस वैतरणीचा उगम ह्यांमधील डोंगरी संस्थानें यांत येत असावीं.

ह्या मोठ्या प्रदेशांत हल्लीं निरनिराळ्या जातींच्या जंगली लोकांची वस्ती आहे, त्या सर्वांस सामान्यतः कोल्हान किंवा कोल म्हणतात. परंतु अगदीं भिन्न अशा दोन भाषांच्या पोटभाषा ते बोलतात. यावरून त्यांत मुख्य दोन भेद आहेत. त्या प्रत्येकांत ज्या जाती आहेत त्यांत मंड आणि उरोन ह्या मुख्य मानल्या तरी चालतील. डाल्टन लिहितो कीं मुंड हे प्रथमचे राहणारे व दुसरे मागाहून आले असावे. दोन्ही आतां अगदीं मिसळले आहेत तरी त्यांचा विवाहसंबंध होत नाहीं. उरोन यांची भाषा तामिळ वर्गातली आहे. व मुंड हे हिमालय व विंध्याद्रि व सिंधु आणि बंगालचा उपसागर यांत जे डोंगरी लोक आहेत त्या वर्गातले आहेत.

सातव्या शतकांत या देशाचा राजा शशांक नामक होता तो बौद्धधर्माचा छलक अशी त्याची प्रसिद्धि आहे.

## ५. उड्र—ओढिया

हुएनसंग यानें ओड म्हणून राज्य लिहिलें आहे. हा उड्र म्हणजे सांप्रतचा ओढिया प्रांत होय. ताम्र-

१. एशिआटिक सो० बंगाल इ० सन १८६६ चें पुस्तक.

२. या व इतर प्रांतांतील डोंगरी लोकांचें वर्णन आणि त्या सर्वांची तुलना इ० पुष्कळ विवेचन कनिंगह्यॅमच्या पुस्तकांत केलेलें आहे. परंतु विस्तारभयास्तव एथे देत नाहीं.

लिह्मीपासून नैर्ऋत्येस ७०० ली ( ११६ मैल ) अंतरावर त्याची राजधानी होती. हें अंतर जाजिपुरशीं बरोबर मिळतें. राज्याचा घेर ११६७ मैल होता. त्याच्या आग्नेयीस समुद्र होता. चरित्रपुर नामक एक बंदर होतें. सांप्रत पुरी एथे जगन्नाथाचें देवालय आहे तें पुरी, हेंच चरित्रपुर असावें. कनिंगह्यॅम म्हणतो कीं त्या शहराबाहेर पांच स्तूप होते; त्यांपैकीं एक स्तूप हाच हल्लींचें जगन्नाथाचें देवालय आहे असें वाटतें; त्या देवळांतील मुख्य ज्या तीन मूर्ति ( मुख्य मूर्ति व बलराम, सुभद्रा अशा दुसऱ्या दोन ) त्यांस कांहीं एक विशेष आकार आहे असें नाहीं. त्या बुद्धधर्मांतील बुद्ध, धर्म, आणि संघ ह्यांच्याच मूर्ति असाव्या. ह्या त्रयीपैकीं धर्म ही स्त्री मानितात.

ओढियाप्रांतांतील बलिष्ठराजांच्या वेळीं या देशाची हद्द उत्तरेस हुगळी आणि दामुदा ह्या नद्यांपर्यंत व दक्षिणेस गोदावरीपर्यंत होती असें म्हणतात. परंतु प्राचीन उड्र देशांत महानदीचा प्रदेश व सुवर्णरेखानदीच्या खालच्या भागावरील प्रदेश इतकाच प्रदेश येत होता. यांत हल्लींचे कटक आणि संबलपुर हे जिल्हे व मेदिनीपुरचा कांहीं भाग इतके येतात. याच्या पश्चिमेस गोंडवण, उत्तरेस सिंगभूम व जशपुरच्या टेंकड्या, पूर्वेस समुद्र, आणि दक्षिणेस गंजमप्रांत आहे. हुएनच्या वेळीं याच मर्यादा असाव्या, कारण घेर मिळतो.

ह्या देशाची प्राचीन राजधानी महानदीवर कटक ही होती. परंतु सहाव्या शतकाच्या आरंभीं ययातिकेसरी राजानें वैतरणी नदीवर ययातिपुर ( जजातिपुर ) रा-

जधानी केली. तिचें हल्लींचें नांव जाजपुर हें आहे. एथील लोकांची भाषा व उच्चार हीं मध्यहिंदुस्थानांतल्यापेक्षां निराळीं होतीं असें हुएन म्हणतो. सांप्रतहि अशीच स्थिति आहे.

पश्चिमेस पुष्पगिरि नांवाचा डोंगर होता त्यावर एक स्तूप व विहार होता. हे डोंगर सांप्रतचे उदयगिरि आणि खंडगिरि हेच असावे. ह्यांत हल्लीं बौद्धांच्या गुहा व लेख पुष्कळ सांपडले आहेत. ह्या टेंकड्या कटकच्या दक्षिणेस १० मैलांवर आहेत. भुवनेश्वर एथे अतिशय देवालयें आहेत, तीं ह्यांच्या पूर्वेस ५ मैलांवर आहेत.

सहदेवाच्या दक्षिणादिग्विजयांत उड्रदेशाचें नांव आलें आहे. वराहमिहिरानेंहि पूर्वेकडे उड्रदेश सांगितला आहे. वैतरणीनदी फार प्रसिद्ध आहे. पांडव तीर्थयात्रा करितांना या नदीवर आले होते. परंतु ही नदी कलिंगदेशांत होती असें सांगितलें आहे. गंगा-सागरसंगमीं स्नान केल्यावर ते कलिंगदेशास आले. त्यांत वैतरणीनदी होती. यावरून असें दिसतें कीं कलिंगदे-

* " [ गंगा-सागरसंगमीं स्नान करून ] ततः समुद्रतीरेण जगाम वसुधाधिपः । भ्रातृभिः सहितो वीरः कलिंगान् प्रति भारत ॥ ॥३॥ एते कलिंगाः कौंतेय यत्र वैतरणी नदी॥ (वनपर्व, अ० ११४). याच्या पुढील वर्णनावरून वैतरणी ही नदी महेंद्रपर्वताजवळ होती असें दिसतें. दाक्षिण हिंदुस्थानांतील पूर्व किनाऱ्याच्या डोंगरांच्या रांगा महानदीपलीकडे नाहींत. महेंद्रपर्वतहि महानदीच्या दक्षिणेस होता असें पुढें ( कलिंगदेशाच्या वर्णनांत ) दाखविलें आहे. वैतरणीची उत्पत्ति मत्स्यपुराणांत विंध्याद्रीपासून सांगितली आहे.

शाचें राज्य कोणा एका काळीं उत्तरेस वैतरणीनदीच्या पलीकडेहि कांहींसें पसरलें असावें; त्यामुळें तेथपर्यंत प्रांतास कलिंगच म्हणत असतील; उत्कल, उड्र यांचा समावेश त्यांतच होत असावा. तथापि मुख्य कलिंगदेश याच्या दक्षिणेस होता असें भारतादिकांवरून दिसतें. हुएनसंग याच्या वर्णनावरूनहि तसेंच दिसतें.

त्रिकांडशेष-कोशांत उत्कल आणि ओड्र हीं एकाचींच नांवें आहेत. तथापि, भारत भीष्मपर्व अध्याय ९ यांत व बृहत्संहितेंत उत्कल आणि ओड्र हे निरनिराळे देश सांगितले आहेत. परंतु भारतांत दिग्विजयाच्या वर्णनांत उड्रदेश आला आहे, उत्कल नाहीं. कों-

( मागील पृष्ठावरून )

महानदी विंध्याद्रीच्या पूर्वशाखांतून निघाली आहे. हल्लींची वैतरणी विंध्याद्रीपासून निघालेली नाहीं, व तिच्यापेक्षां महानदी मोठी आहे. यावरून भारतांतील वैतरणी नदी ही हल्लींची महानदी असावी असें एकदां मनांत येतें. वैतरणी हें नांव अजून चालत आहे व तें हल्लीं महानदीस नाहीं, दुसरीसच आहे, ही मात्र अडचण आहे. पांडव वैतरणीवर आले तेव्हांच्या वर्णनांत एक चमत्कारिक कथा सांगितली आहे. स्वयंभू विश्वकर्मा यानें या प्रदेशांत यज्ञ करून कश्यपास पृथ्वी हीच दक्षिणा दिली. मर्त्यांस दिल्यामुळें पृथ्वी कोपली व रसातळांत जाऊं लागली. तेव्हां कश्यपानें तपानें ती तुष्ट केली. तेव्हां वेदीरूपानें ती बाहेर आली. ती वेदी समुद्राजवळ होती. पांडव तेथे गेले तेव्हांहि ती तेथे होती. तिजवर चढलें म्हणजे ती समुद्रांत जात असे, परंतु कांहीं एक मंत्र म्हणत असलें म्हणजे ती समुद्रांत बुडत नसे. धर्म तिजवर बसून समुद्रांत गेला होता.

१. ओड्रा उत्कलनामानः ... ॥ ११ ॥ भूमिवर्ग.

२. वंगानुत्खाय तरसा नेतानौसाधनोद्यतान् । निचरवान जयस्तं-

लिदासानें रघुदिग्विजयांत वंग आणि कालिंग यांच्या मध्यें उत्कल देश मात्र सांगितला आहे, उड्र सांगितला नाहीं. यावरून असें दिसतें कीं हे दोन देश निरनिराळे होते. परंतु कधीं कधीं एकाच्याच स्वाधीन असल्यामुळें दोन्ही एकाचींच नांवें समजूं लागले असावेत.

हुएन यानें समतट, ताम्रलिप्त, उड्र हे भागीरथीच्या मुखांपासून महानदीपर्यंत समुद्रकिनाऱ्यावर सांगितले आहेत. कालिदासानें भागीरथीच्या पूर्वेच्या भागापासून दक्षिणेकडे समुद्रतीरानें सुह्म, वंग, उत्कल हे वर्णिले आहेत. भारतांत वंग, ताम्रलिप्त, कर्वट, आणि सुह्म असा क्रम आहे. ताम्रलिप्त हा वंगदेशाच्या पश्चिमेस होता हें हुएनच्या वर्णनावरून स्पष्ट आहे. व सुह्म वंगाच्या पूर्वेस होता हें कालिदासाच्या वर्णनावरून स्पष्ट आहे. भीम वंगदेश घेऊन प्रथम दक्षिणेस येऊन मग पूर्वेस गेला असावा. वंग हाच हुएनचा समतट हें वर्णनसाम्यावरून स्पष्ट आहे. वराहमिहिरानें ते दोन निराळे सांगितले आहेत. यावरून असें दिसतें कीं गंगेच्या मुखाकडच्या भागास समतट आणि वरच्या भागास वंग नांव असावें.

यावरून पूर्वेकडून क्रम असा ठरतोः—सुह्म, वंग किंवा समतट, ताम्रलिप्त, उत्कल, उड्र, आणि यांच्या दक्षिणेस कलिंग.

---

( मागील पृष्ठावरून )

भान् गंगास्रोतोंतरेषु च ॥ ३६ ॥ स तीर्त्वा कपिशां सैन्यैर्बद्धद्विरदसेतुभिः । उत्कलादर्शितपथः कलिंगाभिमुखो ययौ ॥ ३८ ॥

रघु० सर्ग ४.

कालिदासानें सांगितलेली कपिशा ही सांप्रत ताम-लूकच्या आग्नेयीकडून जवळूनच वहाणारी कुसई होय.

### ६. गंजम

उडूच्या राजधानीहून नैर्ऋत्येस २०० मैलांवर हुएन-संग (Kongyuto) एथे गेला. या नांवाचें कशाशीं साम्य दिसत नाहीं. परंतु सें० मार्टिन यानें याचें स्थान चिलका सरोवराजवळ ठरविलें आहे. तेव्हां गंजम हीच जुनी राजधानी असावी. गंजम जाजिपुरापासून १५० मैलांवर आहे. परंतु हुएन वरच्या राज्यांत सांगितलेल्या दोन पर्वतांकडे गेला असावा; म्हणून त्याचें अंतर जास्त भरलें.

प्रांताचा घेर १६७ मैल होता. यावरून ऋषिकुल्या नदीवरील प्रदेश मात्र यांत असावा. प्रांत लहान होता तरी लोक शूर होते, राजा बलिष्ठ होता असें हुएन लिहितो. यावरून ओढिया प्रांताच्या इतिहासांत लिहिलेला ललितेंद्रकेसरि, ज्यानें इ० स० ६१७ पासून ६७६ पर्यंत राज्य केलें, तोच ह्यावेळीं राजा असावा. परंतु पुढें ४ वर्षांनीं हर्षवर्धनानें तें राज्य घेतलें असें हुएन यानें लिहिलें आहे. ललितेश्वर हा वैदिकधर्माचा होता यामुळें युद्धाचें कारण उद्भवलें असावें.

एथील लिपि मध्यहिंदुस्थानांतल्यासारखी होती. परंतु भाषा व उच्चार हीं निराळीं होतीं असें हुएन लिहितो. ह्यावरून १२०० वर्षांपूर्वीं हिंदुस्थानच्या पुष्कळ प्रदेशांत एकच लिपि चालत होती असें दिसतें.

---

1. हुएन एथे आला होता त्यानंतर.

# दक्षिण हिंदुस्थान

नर्मदा आणि महानदी यांच्या दक्षिणेकडील भारतवर्षाच्या भागांतील देशादिकांचें वर्णन करण्यास पुराणादि ग्रंथांतील वर्णन फारसें उपयोगीं पडण्यासारखें नाहीं. रामायणादिकांत दक्षिणेकडील वर्णन आहे, तें फार घोंटाळ्याचें आहे. सुग्रीवाशीं सख्य झाल्यावर किष्किंधेहून सुग्रीवानें सीतेच्या शोधास वानर पाठविले, त्यांत जे दक्षिणेस पाठविले, त्यांस सुग्रीव म्हणतो कीं, विंध्यपर्वत, नर्मदा नदी, मेकल, उत्कल, दशार्ण हे देश, व आब्रवंती आणि अवंती ह्या नगरी तुम्हीं शोधा. पुढें ते शोधण्यास गेले त्यासंबंधी वर्णनांत विंध्यपर्वताचें नांव तर पुष्कळच वेळां आलें आहे. याप्रमाणें पाहिलें असतां किष्किंधा, ऋष्यमूक, पंपा, दंडकारण्य, पंचवटी, अगस्त्याश्रम हीं स्थानें वरील स्थलांच्या उत्तरेस होतीं असें झालें. राम चित्रकूटाहून निघाला तेंव्हांपासून पंचवटीस जाईपर्यंत वर्णन पाहिलें असतां असें दिसतें कीं तो चित्रकूटाहून निघून अत्रीच्या आश्रमास आला. वाटेंत मुक्काम केला नव्हता असें पूर्वापरसंदर्भावरून दिसतें. ( अयोध्याकांड, स० ११७, ११९ ). पुढें दंडकारण्यांत प्रवेश केला. ( किष्किंधाकांड, सर्ग १ ). पुढें ऋषींच्या आश्रमांत एक रात्र राहिला. दुसरे दिवशीं निघाल्यावर विराध राक्षसाची गांठ पडली. (किष्किं० कां० स० १,२). त्याचा वध केला. तेथून ६ कोशांवर शरभंगाचा आश्रम होता. (किष्किंधाका० स० ४). तेथे रात्रीं गेला. त्या ऋ-

१. किष्किंधाकांड, सर्ग ४१.

षीनें सांगितलें कीं एथून सुतीक्ष्ण ऋषीचा आश्रम जवळच आहे. ह्या मंदाकिनीला प्रतिस्रोतस् करून तूं जा. ( किष्किं० सर्ग ५ ). शरभंगाश्रमीं दंडकारण्यांतील ऋषींनीं राक्षसवधाविषयीं प्रार्थना केली. पुढें सुतीक्ष्णाश्रमास आला. वाटेंत मुक्काम केला नव्हता असें दिसतें. ( किष्किं० सर्ग ७ ). तेथून निघून अनेक आश्रमीं गेला. असा दहा वर्षे फिरून परत सुतीक्ष्णाश्रमास आला. मग तेथून ४ योजनांवर अगस्त्याचा बंधु इध्मवाह याचा आश्रम होता तेथे गेला. पुढें तेथून एक योजनावर अगस्त्याश्रम होता तेथे गेला. ( किष्किं० सर्ग ११ ). अगस्त्यानें सांगितलें कीं एथून दोन योजनांवर पंचवटी देश आहे. तो गोदावरीच्या समीप आहे. तेथे जा. ( किष्किं० सर्ग १३ ). पुढें राम पंचवटीस गेला.

या वर्णनावरून चित्रकूटाच्या दक्षिणेस जवळच दंडकारण्य होतें असें दिसतें. चित्रकूटाहून सुतीक्ष्णाश्रमास येण्यास फक्त ४ दिवस लागले. व असा जरी स्पष्ट निर्देश नाहीं, तरी मंदाकिनी सुतीक्ष्णाश्रमापासून फार दूर नव्हती असें स्पष्ट आहे. हल्लीं चित्रकूटास मंदाकिनी दाखवितात ती अगदीं लहान नदी आहे. तथापि मोठी होती अशी कल्पना केली तरी मंदाकिनी, तमसा, दशार्णा इत्यादि नद्यांचें उत्पत्तिस्थान जो ऋष्यवान् पर्वत तो, दशान, तानसा, यांच्या उगमावरून पाहिला असतां प्रयागापासून फार तर १२० मैलांवर दक्षिणेस होता. त्याच्या पलीकडे मंदाकिनी नव्हती हें स्पष्ट आहे. तेव्हां सुतीक्ष्णाश्रमाचें अंतर प्रयागापासून फार तर १२० मैल होतें. तेथून ७ योजनांपलीकडे पं-

चवटी होती. योजनाचे १० मैल धरिले तरी प्रयागापासून २०० मैलांच्या आंतच पंचवटी होती असें होतें. प्रयागापासून नर्मदेचें अतिशय कमी अंतर म्हटलें तरी २०० मैल आहे. वर जी मैलांची संख्या धरिली आहे ती तीहून जास्त संभवणारच नाहीं, अशी धरिली आहे. वस्तुतः ती बरीच कमी असली पाहिजे. तेव्हां चित्रकूटापासून पंचवटीपर्यंत प्रवासवर्णन वर सांगितलें आहे, त्यांतल्या गोदावरीविषयीं विचार केला नाहीं, म्हणजे, तें वर्णन, आणि सुग्रीवानें सांगितलेल्या किष्किंधेच्या दक्षिणेकडील देशांवरून अनुमित होणारें किष्किंधादिकांचें स्थान, यांचा मेळच आहे. महाभारतांतील सहदेव-दिग्विजयावरूनहि किष्किंधा माहिष्मतीच्या उत्तरेस होती असें ठरतें, माहिष्मती ही नर्मदेवर होती हें पूर्वी सांगितलेंच आहे.

कादंबरींतील वैशंपायनाच्या हकीकतींत असा उल्लेख आहे कीं विंध्याटवीमध्यें दंडकारण्य नांवाचा प्रदेश आहे. त्यांत अगस्त्यमुनीचा आश्रम आहे. त्यामधून कावेरी नदी वहाते. त्याच आश्रमस्थानांत पंचवटींत राम राहिला होता. हें वर्णन कादंबरींतलें आहे, तरी आधारावांचून कपोलकल्पित कांहीं तरी लिहिलें आहे असें नाहीं. रामायण वाचून साहजिक जें दिसतें तेंच यांत आहे.

लंकेंत जाण्याच्या वेळीं मारुतीनें महेंद्रपर्वतावरून उड्डाण केलें असें वर्णन आहे. (किष्किं० स० ६७). महेंद्रपर्वत तर कलिंग देशांत सांगितलेला आहे.

---

१. पूर्व किनाऱ्यावरील पर्वतांच्या रांगेस महेंद्र हें नांव असण्या-

आतां दुसऱ्या पक्षीं पाहिलें असतां दंडकारण्य हें विंध्याद्रि आणि शैवलपर्वत यांमध्यें होतें. याविषयीं अशी कथा आहे कीं कृतयुगांत मनूचा पुत्र इक्ष्वाकु यास १०० पुत्र झाले त्यांत शेवटचा दंड यास इक्ष्वाकूनें विंध्य आणि शैवल यांमधील देश दिला. त्यानें मधुमंत नामक पुर वसविलें आणि चांगल्या रीतीनें राज्य केलें. एके दिवशीं पुरोहित भार्गव याची कन्या अरजा एकांतीं पाहून काममोहित होऊन तिचा यानें बलात्कारानें उपभोग केला. तेव्हां शुक्रानें शाप दिला कीं शंभर योजनें विस्ताराचा दंड राजाचा देश ७ दिवसांत नाश पावेल. त्याप्रमाणें झालें. त्यांत कोणीहि प्राणी राहिले नाहींत. त्या देशास दंडकारण्य नांव पडलें. शैवलपर्वत विंध्याद्रीच्या दक्षिणेस जवळच होता असें रामायणांतच आहे. ( उत्तरकांड, सर्ग ७९ ).

पंचवटी गोदावरीच्या कांठीं होती हें वर आलेंच आहे. जनस्थान, पंचवटी हीं सांप्रतचीं नाशिक, पंचवटी, याविषयीं प्रसिद्धि आहेच. गोदावरीच्या मुखाकडील भागीं पंचवटी, जनस्थान हीं स्थानें आहेत. तिकडे राम गेला होता असेंहि मत आहे. पंचवटीच्या दक्षिणेस ऋष्यमूक, पंपा, किष्किंधा हीं स्थानें होतीं. तुंगभद्रेवरील आनागोंदी म्हणून जें प्राचीन शहर ती किष्किंधा असा लोकप्रवाद आहे. आणि रामेश्वर, सेतु,

---

( मागील पृष्ठावरून )

चा संभव आहे. ताम्रपर्णीची उत्पत्ति महेंद्रापासून सांगितली आहे. ती पांड्य देशांत होती असे उल्लेख पुष्कळ आहेत.

१. वाल्मीकि रामायण, उत्तरकांड, सर्ग ७९–८१.

कुमारी हीं रामायणादिकांतलीं स्थानें हल्लीं प्रसिद्धच आहेत. रामायण ही सर्व कल्पित कादंबरी आहे असें कांहीं युरोपियन पंडितांचें मत आहे. परंतु तें मत आमच्या लोकांस ग्राह्य आहे असें नाहीं. निदान त्यांतले देशादिक सर्वच काल्पनिक नाहींत. आमच्या जुन्या शास्त्र्यांचें मत आहे कीं रावणाची लंका आतां सांपडावयाची नाहीं. परंतु त्यांतहि फारसा अर्थ नाहीं. हल्लीं हिंदुस्थानचे दक्षिणेस जवळच मोठें बेट आहे तेंच लंकाद्वीप होय. परंतु मध्यें शंभर योजनें अंतर असल्याचें रामायणांत लिहिलें आहे.

भारतांत ( सभापर्व, अ० ३१ ) किष्किंधेच्या दक्षिणेस पुष्कळ देश सांगितले आहेत. त्यांत माहिष्मती, शूर्पारक, तालीकट, दंडक, कोलगिरि, सुरभीपत्तन, ताम्रद्वीप, केरल, संजयंतीपुरी, पांड्य, द्रविड, उड्र, आंध्र, कलिंग, लंका हे आहेत ( यांत मूळांतला क्रम फिरविला नाहीं ). यांतून पुष्कळ देशांत सहदेव स्वतः गेला नव्हता. दूतद्वाराच कर घेतला असें वर्णन आहे. या क्रमावरून व वर्णनावरून निर्णय करण्यास याचा फारसा उपयोग नाहीं, हें स्पष्ट दिसतें. भारत ( वनपर्व ), भागवत ( स्कंध १० अ० ७९ ) यांत दक्षिणेंतील नद्या, तीर्थें आलीं आहेत. त्यांत फारसा घोंटाळा नाहीं, तरी देशवर्णनास त्यांचा फारसा उपयोग नाहीं.

एकंदरींत नर्मदा किंवा तापी आणि महानदी यांच्या दक्षिणेकडील देशादिकांचें पुराणांतील वर्णन पूर्ण विश्वसनीयच असें म्हणतां येत नाहीं. अर्थातच तें निर्णयास फारसें उपयोगीं नाहीं.

हुएनसंग यानें तापी आणि महानदी यांच्या दक्षिणेकडील सर्व भागास दक्षिण-हिंदुस्थान असें नांव दिलें आहे. यांत नऊ राज्यें होतीं असें तो लिहितो. तो या सर्व राज्यांतून गेला होता, परंतु एवढ्या मोठ्या प्रदेशांत इतकींच राज्यें असावीं असें दिसत नाहीं. बाकी हिंदुस्थानच्या इतर भागांत जसा त्याचा प्रवास पुष्कळ झाला व त्यांचें जसें त्यानें बारकाईनें वर्णन केलें आहे तसें ह्या भागाचें केलेलें नाहीं, यावरून त्यानें ही लिहिलेली माहिती अपुरती आहे असें मला वाटतें.

असें आहे तरी बरेच अंशीं अशा अपूर्ण माहितीवर अवलंबून राहणें सध्यां भाग आहे.

असो; हुएनसंग यानें जे देश सांगितले आहेत त्यांचें क्रमानें वर्णन करितों.

### १. कलिंग

सातव्या शतकांत कलिंगदेशाची राजधानी गंजामच्या नैर्ऋत्येस २३३ पासून २५० मैलांवर होती. दिशा आणि अंतर यांवरून गोदावरी नदीवरील राजमहेंद्री किंवा समुद्रकिनाऱ्यावरील कोरिंगा हीं दोन स्थानें संभवतात. पहिलें २५१ मैल व दुसरें २४६ मैल आहे. परंतु राजमहेंद्री ही पुष्कळ कालपर्यंत या प्रदेशाची राजधानी होती यावरून हुएनच्या वेळीं तीच असावी. कलिंग देशाची मूळ राजधानी श्रीकाकोल

---

१. कनिंगह्यॅमनें स्वतः याविषयीं कांहीं मत दिलें नाहीं. तो स्वतः या भागांत मुळींच फिरला नव्हता.

२. इंडियन आंटिकेरी हीं पुस्तकें, एशियाटिक सोसैटीचीं पुस्तकें यांवरून कांहीं माहिती मिळण्यासारखी आहे.

( चिकाकोल ) ही होती. ती राजमहेंद्रीच्या ईशान्येस सुमारें १६० मैलांवर कलिंगपट्टणच्या नैर्ऋत्येस २० मैलांवर आहे. राज्याचा घेर ८३३ मैल होता. त्याच्या सीमा सांगितल्या नाहींत तरी पश्चिमेस आंध्र आणि दक्षिणेस धनककट हीं राज्यें होतीं. यावरून नैर्ऋत्येस गोदावरीपलीकडे व वायव्येस इंद्रावतीनदीची शाखा गोलिया हिच्या पलीकडे हें राज्य नसावें.

ह्या राज्यांत महेंद्रपर्वताची ओळ आहे. ह्याचें प्राचीन नांव अद्यापि आहे. ह्याविषयीं पूर्वी थोडेंसें सांगितलेंच आहे. विष्णुपुराण, मत्स्यपुराण ह्यांत ह्यापासून ऋषिकुल्या नदी निघते असें सांगितलें आहे. ऋषिकुल्या हें गंजाम एथील नदीचें प्रसिद्ध नांव आहे. यावरून महानदीच्या प्रदेशापासून गंजाम प्रांत वेगळा करणारा हल्लींचा महेंद्रमाले हाच महेंद्रपर्वत होय हें स्पष्ट आहे. कानडी आणि तामिळ या भाषांत माले हा शब्द पर्वतवाचक आहे.

वेंगी एथील चालुक्य घराण्यापैकीं धाकट्या घराण्याची राजमहेंद्री ही राजधानी होती. त्याची सत्ता ओढिया प्रांतापर्यंत पसरली होती. वेंगीचें राज्य वेंगिपुर ही जुनी राजधानी जिंकून तेथे इ० स० ५४० च्या सुमारें स्थापित झालें. वेंगिपुरचे अवशेष एलूरच्या उत्तरेस ५ मैल व राजमहेंद्रीच्या नैर्ऋत्य-पश्चिमेस ५० मैलांवर वेंगी एथे आहेत. इ० स० ७५०च्या सुमारें कलिंगदेश वेंगीच्या राजानें जिंकला. त्यानें लवकरच राजमहेंद्री ही राजधानी केली.

कलिंगदेश हिंदुस्थानच्या पूर्व किनाऱ्यावर मालेन

पर्वताच्या आणि मंडी व माली ह्या लोकांच्या दक्षिणेस आहे असें प्लिनीनें सांगितलें आहे. हा मालेन पर्वत ऋषिकुल्या नदीजवळील महेंद्रपर्वत असावा. याच्या दक्षिणेकडे कलिंगान भूशिरापर्यंत आणि दंडगुड किंवा दंडगुल ह्या शहरापर्यंत कलिंगप्रांत होता. तें शहर गंगेच्या मुखापासून १४७ मैल ( ६२९ रोमन मैल ) अंतरावर होतें. नांव व अंतर यांवरून गोदावरीच्या मुखावरील कोरिंगा बंदर हें स्थान येतें. दंडगुड हें शहर व बुद्ध इतिहासांतलें दंतपुर हें एकच असावें. दंतपुर हें कलिंगची राजधानी होतें. यावरून तें राजमहेंद्रीच म्हणतां येईल. राजमहेंद्री हें कोरिंगाच्या वायव्येस ३० मैल आहे. ग्रीक शब्दाचा उच्चार दंतपुल असाहि संभवेल. परंतु तें दंतपुर असें म्हणण्यास बुद्धाचा दांत प्लिनीच्या पूर्वींच तेथे आलेला असला पाहिजे. तो बुद्धाच्या निर्वाणानंतर लागलाच आणला होता असें बौद्ध ग्रंथांत आहे. दंतपुर हें एका मोठ्या नदीवर होतें असें सांगितलें आहे. ही गोदावरीच असली पाहिजे. कारण कृष्णा असण्याचा संभवच नाहीं. या गोष्टीवरूनच दंतपुर हें राजमहेंद्री असें म्हणतां येईल.

कलिंगच्या ह्याहून प्राचीनतर राजधानीचें नांव सिंहपुर होतें. सिंहलद्वीपाच्या माहित असलेल्या राजांपैकीं पहिला राजा विजय ह्याचा बाप सिंहबाहु ह्यानें तें वसविलें. गंजमच्या पश्चिमेस ११५ मैलांवर ह्या नांवाचें एक शहर आहे तेंच हें असावें.

चेदीच्या हैहय घराण्याच्या संबंधें कोरींव लेख सां-

पडले आहेत, त्यांत त्रिकलिंग असा उल्लेख आहे. प्लि-
नीनें तीन कलिंग निरनिराळे सांगितले आहेत. भारत,
भीष्मपर्व अ० ९ यांत कलिंग तीन वेळां आला आहे.
ऐर राजाच्या खंडगिरि एथील लेखांत कलिंग तीनदां
आला आहे ( हा लेख इ० स० पू० २०० च्या सु-
माराचा आहे ). ह्यावरून 'त्रिकलिंग' यापासून
तेलिंगण शब्द झाला असावा असें कनिंगह्यमचें मत
आहे. त्रिलिंग (तीन लिंगें—शंकराचीं ) यावरून तेलिं-
गण याची व्युत्पत्ति करितात.

पुराणादिकांतील या देशाच्या उल्लेखाविषयीं मागें
सांगितलेंच आहे. भारतांत याची राजधानी राजपुर
असा एके ठिकाणीं उल्लेख आला आहे.

## २. कोसल

कलिंगाच्या राजधानीपासून ३००—३१७ मैलांवर
कोसलदेशाच्या राज्यांत हुएनसंग गेला. अंतर व दि-
शा यांवरून त्या सुमारास विदर्भ म्हणजे वऱ्हाड प्रांत
येतो. त्यांतलेंच सांप्रतचें नागपुर शहर आहे. या
प्रांतास गोंडवण असेंहि म्हणतात. या प्रदेशांत कोस-
ल म्हणून देश होता याविषयीं विवेचन मागें केलेंच
आहे. राजधानीचें नांव हुएन यानें सांगितलें नाहीं.
सांप्रत या प्रांतांत मोठालीं शहरें चांदा, नागपुर, अ-
मरावती आणि एलिचपुर हीं आहेत.

चांदा हें पैनगंगा आणि वर्धा यांच्या संगमाजवळ
आहे. ह्याचा घेर ६ मैल आहे. हें राजमहेंद्रीच्या वा-
यव्येस २९० मैलांवर आहे. आणि कृष्णेवरील धर-

णीकोटापासून २८० मैल आहे. यावरून कोसलची राजधानी एथेच असावी.

नागपुर शहराचा घेर ७ मैल आहे. परंतु तें चांदाच्या उत्तरेस ८९ मैल आहे. राजमहेंद्रीपासून सांगितलेलें अंतर जमत नाहीं. अमरावती सुमारें तितक्याच अंतरावर आहे. एलिचपुर त्याच्याहि उत्तरेस ३० मैल आहे. तेव्हां चांदा हीच ७ व्या शतकांत राजधानी असावी. तेथून पुढें धनककट (धरणीकोट) एथे हुएन गेला. त्यांमधील लिहिलेलें अंतर मिळतें.

कोसलदेशाचा घेर १००० मैल सांगितला आहे. पूर्वापरसंगतीवरून याच्या उत्तरेस उज्जनी, पश्चिमेस महाराष्ट्र, दक्षिणेस आंध्र आणि कलिंग, व पूर्वेस ओढिया हे प्रांत होते. म्हणजे तापीवरील बऱ्हाणपुर आणि गोदावरील नांदेड यांपासून छत्तीसगडमधील रतनपुर आणि महानदीच्या उगमाजवळील नवगड यांपर्यंत या देशाची हद्द असावी असें सामान्यतः म्हणता येईल. ह्या प्रदेशाचा घेर १००० मैलांहून जास्त आहे

रामायणांत दक्षिणेकडे सांगितलेल्या ह्या देशाची राजधानी कुशावती होती. तेथून अयोध्येस येतांना वाटेंत विंध्यपर्वत लागला व मार्गांत बरेच दिवस लागले असें कालिदासानें सांगितलें आहे (रघु० १६-३१,३९).

अज हा स्वयंवराकरितां अयोध्येहून विदर्भ देशास गेला तेव्हांच्या वर्णनांत मध्यें नर्मदा नदी लागल्याचें कालिदासानें सांगितलें आहे ( रघु० ५-४२ ). विदर्भ देशास क्रथकैशिक असेंहि नांव होतें. ( रघु० ५-३९,

४० पहा ). विदर्भ देशाची राजधानी कुंडिनपुर होती हें प्रसिद्धच आहे. दमयंतीनें दुसरें स्वयंवर आरंभिलें आहे असें ऐकून ऋतुपर्ण राजा आपल्या अयोध्यानगरीहून एका दिवसांत कुंडिनपुरास आला तेव्हांच्या वर्णनांत, हा राजा शंभरांहून जास्त योजनें व्यर्थ कशास आला असा भीमकराजास विस्मय झाला असें भारतांत वर्णिलें आहे ( वनपर्व अ० ७३ श्लो० २६ ). यावरून अयोध्येहून कुंडिनपूर शंभरांहून जास्त योजनें ( सुमारें ७०० मैल ) होतें असें दिसतें. अयोध्येहून नर्मदेच्या अतिसमीप भागाचें अंतर सरळ रेषेनें ३०० मैल आहे. तें पायवाटेनें फार तर ४०० होईल. यावरून नर्मदेपासून बऱ्याच अंतरावर कुंडिनपुर असलें पाहिजे. अयोध्येपासून नागपुरचें अंतर ४४० मैल आणि चांदा शहराचें ५०० मैल आहे. परंतु यांच्या पश्चिमेस कुंडिनपुर असावें असें दिसतें.

भारत, सभापर्व अ० ३१ यांत, भोजकट एथे भीष्मकराजास सहदेवानें जिंकलें, पुढें कोसलाधिपतीस व नंतर वेणातटाधिपतीस जिंकिलें, असें क्रमानें वर्णन आहे. यांतील भीष्मक हा विदर्भदेशाचा राजा असें अन्य स्थलावरून दिसतें. वेणा ही हल्लींची वाइनगंगा होय. वेणा विंध्यापासून निघालेली आहे ( मत्स्यपु० अ० ११३ ). वाइनगंगा ही विंध्याद्रीच्या पूर्वभागाजवळून निघाली आहे. परस्परांशीं संबंध नाहीं अशा दोन ठिकाणच्या ( भारत, मत्स्यपुराण ) वर्णनावरून स्थल मिळतें; आणि नामसादृश्यहि आहे. यावरून वैनगंगा हीच वेणा होय. तेव्हां भारतांतील क्रमावरून पश्चिमेस

विदर्भ[1], त्याच्या पूर्वेस कोसल, त्याच्या पूर्वेस वेणा-नदीसमीपचें राज्य असें दिसतें. कधीं कधीं एकाच नां-वांत या सर्वांचा समावेश होत असेल.

प्रसंगोपात्त चेदि आणि निषध या देशांविषयीं थो-डासा विचार करूं. निषध देशाचें नांव भारतांत नळ-राजाच्या कथेखेरीज इतरत्र कोठे आढळत नाहीं. द्यू-तांत राज्य गेल्यावर नळराजा वनांत गेला. तेथे दम-यंतीस निजल्याजागीं सोडिल्यावर ती उठून फिरत फि-रत चेदि देशास आली (वनपर्व अ० ६५ श्लो० ४५). तेथून पुढें विदर्भ देशास गेली. चेदि देश भीमदिग्विज-यांत पूर्वेस आला आहे. पूर्वापर संदर्भावरून तो आग्ने-यीस होता ( इंद्रप्रस्थाच्या ) असें दिसतें. यावरून विदर्भ देशाच्या बराच पूर्वेस किंवा ईशान्येस चेदिदेश होता व त्याच्या पूर्वेस निषध देश होता असें दिसतें. धौम्यानें पूर्वेकडचीं तीर्थादि सांगितलीं आहेत त्यांत कुंडोद[2] पर्वतावर नळ तृषित झाला असतां उदक मि-ळून तृप्त झाला असें वर्णन आहे. ही गोष्ट राज्य गे-ल्यावर वनांत गेला तेव्हांचीच असली पाहिजे. नळ दमयंतीस सोडल्यावर दहा दिवसांत अयोध्येस गेला असें वर्णन आहे ( वनपर्व, ६६-१ ). यावरून अयो-ध्येच्या आग्नेयीस बरेच अंतरावर निषध देश होता असें दिसतें. नळानें दमयंतीस जे देश[3] सांगितले त्यां-

---

१. बिदर ( बेदर ) हा विदर्भ याचाच कदाचित् अपभ्रंश असेल.

२. कुंडोदः पर्वतो रम्यो बहुमूल्यफलोदकः । निषधस्तृषि-तो यत्र जलशर्म च लब्धवान् ॥ २५ ॥ वनपर्व, अ० ८७.

३. एते गच्छंति बहवः पंथानो दक्षिणापथं । अवंतीमृक्षवंत

वरूनाहि तसेंच दिसतें. चेदि देशाची राजधानी शुक्तिमती नामक होती.

### ३. आंध्र

कोसल देशाहून दक्षिणेकडे १५० मैलांवर आंध्र देशांत हुएन गेला. हे सांप्रतचें तैलिंगण होय. राजधानी लिहिली आहे ( Pingkilo ) तिचा उच्चार जुलिअन यानें विंगखिल असा लिहिला आहे. परंतु ती कोणती हें अद्यापि ठरलें नाहीं. सातव्या शतकानंतर पुष्कळ शतकें वारंगूळ ही राजधानी होती. परंतु तिचें अंतर मिळत नाहीं. चिनी प्रवाशानें लिहिलेल्या अक्षरांचा उच्चार वंकोल असाहि करितां येईल. भिमगल असाहि होईल. अबूलफजल यानें या नांवाचें एक शहर लिहिलें आहे. परंतु त्याचेंहि अंतर मिळत नाहीं. भिमगल आणि वारंगुळ यांच्या मध्यें एलगंडेल म्हणून शहर आहे. तें चांदापासून १३० मैल आहे व धरणीकोटापासून १७० मैल आहे. हीच राजधानी असावी असें कानिंगह्यमचें मत आहे.

घेर ९०० मैल सांगितला आहे. मर्यादा सांगित-

---

( मागील पृष्ठावरून )

च समतिक्रम्य पर्वतं ॥ २१ ॥ एष विंध्यो महाशैलः पयोष्णी च समुद्रगा ।...२२॥ एष पंथा विदर्भाणामसौ गच्छाति कोसलान् । अतः परं च देशोऽयं दाक्षिणे दक्षिणापथः॥२३॥ (वनपर्व अ० ६१). एथे कोसल हा विदर्भाजवळचा ( म्हणजे दक्षिणकोसल ) घ्यावयाचा. ( ऋक्षवान्पर्वत अवंति देशाच्या पूर्वेस होता असें यावरूनहि दिसतें.—' ऋक्षवंतमातिकम्य अवंतीं गच्छंति ' असा अन्वय. ऋक्षवान् म्ह० ऋष्यवान्. )

ल्या नाहींत. तरी गोदावरी नदी ही सांप्रत उत्तरची व पूर्वेची सीमा आहे तीच पूर्वींहि असावी. तैलंगी भाषेची उत्तरसीमा तीच आहे. पश्चिमेस महाराष्ट्र देशाचें मोठें राज्य होतें यावरून तिकडील हद्द गोदावरीची शाखा मांजरा नदी हिच्या पलीकडे नसावी.

आंध्रदेशाचा उल्लेख प्लिनीनें केला आहे. हें मोठें बलाढ्य राष्ट्र असें सांगितलें आहे.

हुएन लिहितो कीं आंध्रची भाषा मध्यहिंदुस्थानांतल्या भाषेहून निराळी होती, तरी लिपि बहुतेक सारखीच होती. यावरून असें दिसतें कीं उत्तरहिंदुस्थानांतून आलेली नागरी लिपि तेंव्हांहि चालू होती व दहाव्या शतकांत चालू असलेली चमत्कारिक पद्धतीची तैलंगी लिपि तेंव्हां प्रचारांत आली नव्हती.

**४. धनककट** ( चिनी Tonakietsekia )

आंध्रदेशाहून जंगलांतून व ओसाड मैदानांतून १९७ मैलांवर हुएन शिरोभागीं लिहिलेल्या देशांत गेला. त्यानें लिहिलेल्या अक्षरांचें रूप जुलिअन यानें धनकचक असें लिहिलें आहे. परंतु तें धनकटक असें होय असें कनिंगह्यामचें मत आहे. कान्हेरी आणि कारली एथील गुहांतील कोरींव लेखांत चार ठिकाणीं धनककट असें आलें आहे. तें व हें एकच होय. त्या लेखांतील तें नांव झेनोक्र्याटिस या ग्रीक मनुष्याचें आहे असें स्टीवन्सन म्हणतो. परंतु तें देशाचें किंवा शहराचें नांव असें कनिंगह्यामनें सविस्तर प्रतिपादनानें सिद्ध केलें आहे. डॉक्टर भाऊ दाजी यांनींहि हुएन यानें लिहिलेलें नांव व पूर्वोक्त कोरींव लेखांतलें नांव यांचें ऐक्य

दाखविलें आहे. (मुं० एशि० सोसै० पु० ७ पृ० १८).

धनककट आणि कृष्णानदीवरील धरणीकोट किंवा अमरावती यांचें ऐक्य कनिंगहॅम यानें पुष्कळ प्रमाणांनीं सिद्ध केलें आहे. त्यांत आंध्र आणि कोसल यांपासूनचें अंतर जमतें हें एक प्रमाण आहे.

सिलोन आणि सयाम एथील बौद्ध दंतकथांत अशी एक कथा आहे कीं गंगेचें मुख आणि सिंहलद्वीप यांमध्यें माजेरिका देशांत नाग रहात होते. त्यांस मिळालेले बुद्धाचे एक किंवा दोन द्रोण अवशेष त्यांनीं एका अति भव्य व सुंदर अशा स्तूपांत ठेविले. हें स्थान हिरे सांपडतात त्या प्रदेशाच्या जवळ होतें. माजेरिका देश गोदावरीवरील दंतपुराच्या दक्षिणेस हिऱ्यांच्या प्रदेशाजवळच होता असें एका बौद्ध ग्रंथावरून दिसतें. या दोन प्रमाणांवरून तें स्थान कृष्णानदीवरील धरणीकोटाच्या जवळ होतें. हिऱ्यांच्या खाणीचा प्रदेश धरणीकोटाच्या अगदीं जवळ उत्तरेस आहे. बौद्ध ग्रंथांत माजेरिका एथील स्तूपाचें अतिशय वर्णन केलें आहे. हें धरणीकोट एथील स्तूपास मात्र लागतें. हुएनसंगहि तो पाहून चकित झाला होता. हल्लींहि त्याचे अवशेष आहेत त्यांचें काम फार सुंदर आहे. आणखी धरणीकोट ही त्या प्रांताची एकदां राजधानी होती अशी तेथील लोकांत दंतकथा आहे. या प्रमाणांवरून हुएन यानें लिहिलेलें स्थान हेंच असें कनिंगहॅम म्हणतो. सदरील स्तूप सुमारें इ० स० च्या दुसऱ्या शतकांतला आहे.

---

* विस्तारभयास्तव तीं सर्व सविस्तर एथें सांगत नाहीं, परंतु त्यांतील कांहीं विवेचन केवळ हास्यास्पद आहे.

ह्या देशाचा घेर १००० मैल सांगितला आहे. मर्यादा सांगितल्या नाहींत, परंतु तैलंगी भाषेच्या मर्यादांप्रमाणेंच त्या असतील. म्हणजे पश्चिमेस कलबुर्गा आणि पेन्नाकोंडा, दक्षिणेस त्रिपति आणि पलिकत सरोवर, उत्तरेस आंध्र आणि कलिंग व पूर्वेस समुद्र. ह्या प्रदेशाचा घेर १००० मैल आहे.

## ५. चोरिय किंवा जोरिय.

धनककट एथून नैर्ऋत्येस १६७ मैलांवर चुलिय एथे हुएन गेला. तो प्रांत लहान (४०० मैल घेराचा) होता. तेथून पुढें तो २६० मैलांवर कांचीपुर (कांजेवरम) एथे गेला होता. कृष्णानदीपासून कांचीपुर हें २४०–२६० मैल आहे. तेव्हां कृष्णेवर कोठे तरी धरणीकोटच्या नैर्ऋत्येस १६७ मैलांवर चोलिय असलें पाहिजे. या सुमारास कर्णुल शहर हल्लीं आहे.

चुलिय हें चोल (चोलमंडल) असावें असें लासन, मार्टिन इत्यादिकांचें म्हणणें आहे. परंतु तें द्रविड देशाच्या पलीकडे आहे. आणि हुएन यानें चुलिय हें आलीकडे सांगितलें आहे. हुएन याच्या वर्णनाच्या स्पष्टीकरणार्थ चिनी व जपानी भाषेंत नकाशा तयार केला आहे त्यांतहि तें द्रविडच्या उत्तरेस दाखविलें आहे. व दुसऱ्याहि हरकती आहेत.

कर्णुलाजवळ झोरा किंवा जोरा म्हणून जुनें शहर आहे. याच नांवावरून हुएन यानें जोरिय हें नांव लिहिलें असावें. टालमीनें लिहिलेलीं 'सोरा, रेजिआ, अर्कोटी' यांतील सोरा व जोरा हीं एकच असावीं. अर्को-

टी हें हल्लींचें अर्काट असें म्हणतात, परंतु अर्काट हें नांव अर्वाचीन आहे.

चुलिय हें चोलमंडल असें मानलें तर त्यांत सांप्रतचा तंजावर प्रांत येईल. म्हणजे वायव्येकडे सालेमजवळील संकेरीदुर्गपासून ईशान्यकडे कावेरीच्या मुखापर्यंत व नैर्ऋत्येकडे दिंदीगलपासून आग्नेयीस कालिमेर भूशिरापर्यंत प्रदेश येईल. इतक्याचा घेर ४०० मैल आहे.

### ६. द्रविड

सातव्या शतकांत ह्या प्रांताचा घेर १००० मैल होता. त्याची राजधानी कांचीपुर ही होती. कांचीपुर हें कांजेवरमचें संस्कृत नांव होय. हें मद्रासच्या नैर्ऋत्येस जवळच आहे. ह्या राज्याच्या पश्चिमेस व पूर्वेस दुसरे देश सांगितले नाहींत. यावरून हें दोन्ही समुद्रांपर्यंत पसरलेलें असावें. ह्याची उत्तर सीमा पश्चिम किनाऱ्यावरील कुंडापुरपासून कडूर आणि त्रिपाती यांवरून पलिकत सरोवरापर्यंत आणि दक्षिण सीमा कालिकोटपासून कावेरीच्या मुखापर्यंत असावी. इतक्या प्रदेशाचा घेर १००० मैल आहे.

द्रविड देशाचें नांव भारतांत आलें आहे. कांचीचा उल्लेख वराहमिहिरानें केला आहे.

### ७. मलकूट—मधुरा

कांची एथून हुएन मलकूट एथे गेला. ह्या देशाच्या दक्षिणभागांत समुद्रकिनाऱ्याकडे मलयपर्वत होता. त्यांत चंदन होत असे. यावरून हा देश अगदीं दक्षिणेकडे होता. याच्या कांहीं भागास अद्यापि मलयलम आणि मलयवार ( मलबार ) म्हणतात. यावरून मल-

कूट हा मलयकूट याचा संक्षेप असावा. ह्याचा घेर ८३३ मैल होता. उत्तरेस द्रविड देश होता. कावेरीच्या दक्षिणेकडील सर्व भागाचा घेर इतकाच आहे. यावरून मलयकूटच्या राज्यांत हल्लींचें तंजावर आणि मधुरा हे पूर्वेकडील प्रांत आणि कोइंबतुर, कोचीन, त्रावणकोर हे पश्चिमेकडील प्रांत येत होते.

मलयकूटची राजधानी कांचीपासून ५०० मैलांवर हुएन यानें सांगितलेली आहे. म्हणजे हें स्थान दक्षिणेकडे कुमारी-केपापलीकडे येतें. तेव्हां अंतरांत कांहीं तरी चुकी आहे. टालमीच्या वेळीं मधुरा ही राजधानी होती. तीच सातव्या शतकांत असावी.

अबूरिहान लिहितो कीं मारय आणि कूटल असे दोन निरनिराळे प्रांत होते. दुसरा पहिल्याचे दक्षिणेस होता. तेव्हां मलयकूट हें नांव दोन देशांमिळून असेल. त्यांत माल्य हें कदाचित् पांड्य आणि कूटल हें त्रावणकोर असेल. यांत पहिल्याची राजधानी मधुरा आणि दुसऱ्याची कोचीन होती.

हुएन यानें चोलचा उल्लेख मुळींच केला नाहीं. टालमीनें तें लिहिलें आहे.

पांड्यदेशाचें नांव भारतांत आलें आहे. परंतु मधुरानगरीचें आलें नाहीं. कालिदासाच्या वर्णनांत तो देश दक्षिणेकडे होता, त्यांत मलयपर्वत होता, व राजधानी उरगपुर होती, असें आहे (रघु० ६.५९–६४). भागवतांत मधुरानगरीचा उल्लेख ( कांची, कावेरी यांच्या दक्षिणेस ) आला आहे ( स्कंध १० अ०७९ ). पांड्य देशांतील ताम्रपर्णी नदी पुराणांत प्रसिद्ध आहे

भारतांत तिचा उल्लेख आला आहे. कालिदासानें तिच्या मुखाजवळ मोत्यें होतात असें वर्णन केलें आहे ( रघु० ४. ५० ). वराहमिहिरानेंहि तिच्या जवळ मोत्यें सांपडतात असें सांगितलें आहे.[1]

## ८. कोंकण*

मलयकूट देशांतून द्रविडमधून ३३३ मैलांवर कोंकणपुर एथे हुएन गेला. दिशा आणि अंतर यांवरून तुंगभद्रेच्या उत्तरतीरावरचें आनागोंदी हें शहर येतें. मुसलमानांपूर्वी हें राजधानीचें शहर होतें. मार्टिन म्हणतो कीं टालमीनें लिहिलेलें बनौसी शहर, ज्याचें हल्लींचें नांव बनवासी आहे, तें हुएनचें कोंकणपुर असावें. परंतु अंतर फार येतें. आनागोंदी हें प्राचीन स्थान आहे. त्याच नदीवर दक्षिणेस विजयनगर शहराची स्थापना होण्यापूर्वी तें यादवघराण्याचें राजधानी शहर होतें.

हॅमिल्टन लिहितो कीं एतद्देशीय लोक कोंकण ह्या नांवामध्यें पश्चिमघांटाच्या पूर्वेकडील बऱ्याच प्रदेशाचा समावेश करितात.

अबूरिहान यानें दंडका ह्या प्रदेशांत कोंकणचीं मैदानें लिहिलीं आहेत. हें वर्णन घांटावरील सपाट जमिनीस लागेल. यावरून हुएनच्या वेळींहि याप्रमाणेंच प्रचार असेल.

राज्याचा घेर ८३३ मैल लिहिला आहे. परंतु सा-

---

१. बृ० सं० अध्याय ८१ श्लोक २.

* हल्लींचे उत्तर व दक्षिण कोंकण प्रांत, याच्या पुढील महाराष्ट्र या विभागांत येत होते.

२. Wilks Mysore 1.14.

तव्या शतकांत समुद्रकिनाऱ्यावरील पट्टीचा उत्तर भाग महाराष्ट्रदेशांतील चालुक्य राजांकडे होता. तेव्हां घांटावरील पुष्कळ भाग त्या वेळच्या कोंकण ह्या राज्यांत आला पाहिजे. तेव्हां सदरहू घेर खरा मानिला तर किनाऱ्यावर वेंगुर्ल्यापासून• बेदनुराजवळील कुंडापुरपर्यंत, व आंतल्याभागीं कलबुर्ग्यापासून मदगिरीच्या प्राचीन किल्ल्यापर्यंत प्रदेश यांत येत असावा. याचा घेर ८०० मैल आहे. हेंच पूर्वीं कादंबांचें•राज्य होतें. हें कांहीं काल चालुक्यांचे प्रतिस्पर्धी होते.

कोंकण हें नांव भारतांत भीष्मपर्व अ० ९ यांत आहे. वराहमिहिरानेंहि कोंकण याचा उल्लेख केला आहे. सह्याद्रीच्या पश्चिमेकडील प्रदेश समुद्रापासून परशुरामास मिळाला त्यास शूर्पारक नांव होतें. ( शांतिपर्व, अ० ४९ ). वनपर्वांतहि शूर्पारक आणि परशुरामाची वेदी यांचा उल्लेख आहे. सहदेवाच्या दक्षिणदिग्विजयांतहि हें नांव आहे.

### ९. महाराष्ट्र

कोंकणपुर एथून ४००. मैलांवर हुएन महाराष्ट्रामध्यें गेला. राजधानीच्या पश्चिमेस मोठी नदी होती. यावरून राजधानी प्रतिष्ठान ही असावी असें कदाचित् वाटतें. प्रतिष्ठान हें टालमीनें बैथन या नांवानें लिहिलें आहे. पेरिप्लस ग्रंथांत प्लिथन हें नांव आलें आहे. परंतु हुएन यानें महाराष्ट्राच्या राजधानीपासून भडोचचें अंतर १६७ मैल लिहिलें आहे. मार्टिन म्हणतो कीं देवगिरि ही राजधानी असावी. परंतु तेथूनहि अंतर २०० मैल आहे. व तें नदीवर नाहीं. हुएननें लिहि-

लेली राजधानी कल्याण असावी असें कनिंगह्यमचें मत आहे. ही चालुक्य राजांची प्राचीन राजधानी होती. आनागोंदीपासून कल्याण ४०० मैल व भडोचेहून १८० मैल आहे. व कल्याण हें नदीवरहि आहे. कल्याणाचा उल्लेख कासमास यानें ६ व्या शतकांत केला आहे. व पेरिप्लस ग्रंथांत २ ऱ्या शतकांत आला आहे. तें प्रख्यात बंदर असें लिहिलें आहे. कान्हेरी एथील लेखांतहि कल्याणचें नांव पुष्कळ वेळां आलें आहे.

देशाचा घेर १००० मैल होता. उत्तरेस माळवा, पूर्वेस कोसल आणि आंध्र, दक्षिणेस कोंकण, आणि पश्चिमेस समुद्र ह्या मर्यादा होत्या. म्हणजे याची पश्चिम हद्द किनाऱ्यावर दमणपासून वेंगुर्ल्यापर्यंत व आंत एदलाबादपासून हैद्राबादेपर्यंत असावी.

राज्याच्या पूर्वसीमेवर एक मोठा बुद्धविहार होता. त्याचें हुएन यानें बारकाईनें वर्णन केलें आहे. एलूरा एथील देवालयें वैदिक धर्माचीं आहेत. अजिंठा एथील लेण्यांस तें वर्णन कदाचित् लागेल. परंतु हुएन यानें इतकें बारकाईनें वर्णन केलें आहे कीं त्यानें तीं स्वतः पाहिलीं असावीं असें दिसतें. पूर्व ह्याबद्दल पश्चिम असें मानलें तर कल्याणाजवळचीं कान्हेरी एथील लेणीं संभवतात. व तीं तेथून जवळ असल्यामुळें त्यानें स्वतः पाहिलीं असतील. दरवाज्याबाहेर दोन हत्ती होते असें तो लिहितो. ते कान्हेरी एथील अवशेषांत कदाचित् सांपडण्याचा संभव आहे.

महाराष्ट्र हें नांव महाभारतांत नाहीं. वराहमिहिरानेंहि तें लिहिलें नाहीं.

शूर्पारकाविषयीं वर लिहिलेंच आहे. वसईजवळ सोपारें म्हणून गांव आहे. हें प्राचीन आहे असें लोकांचें म्हणणें आहे. व जमिनींत गडप झालेला एक स्तूप नुकताच एथे सांपडला आहे. त्यांत पुष्कळ अमोलिक वस्तु फार जपून ठेविलेल्या सांपडल्या आहेत वगैरे गोष्टी प्रसिद्ध झाल्याच आहेत. यावरून हें निःसंशय प्राचीन स्थान आहे. सोपारें हा शूर्पार याचा अपभ्रंश असें मला वाटतें.

---

## सिंहलद्वीप

हें सातव्या शतकांत याच नांवानें प्रसिद्ध होतें. तेथून आलेले यात्रेकरू हुएन यास कांची एथे भेटले. त्यांपासून मिळालेल्या माहितीवरून त्यानें त्याचें वर्णन लिहिलें आहे. सिंहलद्वीपाचा भारतवर्षांत अंतर्भाव होत नाहीं, परंतु त्याचा त्याशीं धर्मसंबंध व राजकीय संबंध पुष्कळ आहे; म्हणून त्याचें वर्णन करणें इष्ट आहे.

सिंह नामक मनुष्याचा पुत्र सिंहल यावरून हें नांव पडलें, त्याचा मुलगा विजय यानें बुद्ध जन्मला त्याच दिवशीं (इ० स० पू० ५४३) हें घेतलें असें म्हणतात. त्याचें मूळ नांव रत्नद्वीप अशा अर्थाचें होतें. शिकंदराच्या स्वारीपासून तें युरोपियन लोकांस माहित झालें. टालमीनें त्याचें नांव 'सलिक' असें लिहिलें आहे. हा सिंहलक याचा अपभ्रंश असावा. अबूरिहान त्यास सिंगलदिव किंवा सिरिंदिव म्हणतो. यापासून आरबी झिलन आणि युरोपियन लोकांच्या प्रचारांतलें सिलोन हें नांव पडलें.